# विधवा कुमारी

[ स्वतंत्र सामाजिक कादंबरी ]

: लेखक :

भार्गवराम विठ्ठल वरेरकर

रामकृष्ण प्रकाशन मंडळ, मुंबई १४

# विधवा कुमारी

कोणाच्या डोक्यांतून केव्हां काय कल्पना निघेल, आणि तीपासून समाजाचा केवढा फायदा होणार असेल, हें अगोदर कधींही सांगतां येण्यासारखें नाहीं. ज्या मतांस आपण तऱ्हेवाईक मतें असें म्हणतों, तीं त्यांच्या नवीनत्वामुळें बहुधा तऱ्हेवाईक वाटतात. तीं पुन्हां पुन्हां कानावर पडूं लागलीं म्हणजे त्यांचा धाक वाटेनासा होऊन, हळू हळू त्यांतील गुणावगुणांचा विचार करण्याची बुद्धि होऊं लागते, आणि अखेरीस...तीं अंगिकारण्याची इच्छा होते.

# कैफियत

कादंबरीला प्रस्तावनेची वास्तविक पाहातां जरुरी नाहीं. पण प्रस्तुत कादंबरी ज्या परिस्थितींत निर्माण झाली त्या परिस्थितीकडे लक्ष देतां दुसऱ्या आवृत्तीच्या वेळीं मी थोडक्यांत माझी कैफियत दिली होती. या तिसऱ्या आवृत्तीच्या वेळीं या कादंबरीच्या निर्मितीच्या इतिहासाची पूर्वपीठिका देत आहें.

१९०४ सालीं दापोली इथें तारमास्तर असतांना मी ज्या घरांत राहात होतों, त्याच्याच एका बाजूला ताई दातार या नांवाच्या एक विधवा बाई आपल्या दोन मुलांसह राहात होत्या. या बाई लोकमान्य टिळकांच्या नात्याच्या होत्या.

ही बाई स्वभावानें मोठी अभिमानी होती. गरिबी आली तरीही कुणाचे उपकार न घेतां हालअपेष्टांत दिवस काढून आपल्या मुलाचें शिक्षण करीत होती. तिचें दुसरें अपत्य एक मुलगी होती. ती तेरा चौदा वर्षें वयाची मुलगी विधवा होती. विधवा असूनही ती अंगावर सर्व दागिने घालून मिरवीत असे आणि कुंकू कां लावूं नये म्हणून आपल्या आईबरोबर रोज भांडत असे. इतक्या अल्प वयांत मुलीला आलेलें वैधव्य पाहून त्या बाईच्या डोळ्यांना आसवांचा झरा लागला होता. मुलीच्या या रोजच्या हट्टामुळें तर तिच्या डोळ्याचें पाणी केव्हांही खळत नसे, त्याचमुळें तिची दृष्टीही अधू झाली होती.

मुलीनें कुंकूं लावायचा हट्ट रोज धरावा आणि आईनें तिच्याशीं हुज्जत घालावी हा अगदीं नित्यक्रम होऊन बसला होता. एकदां तिनें मला मुलीची समजूत घालायचा आग्रह केला, पण त्या मुलीचे मुद्दे मला खोडून काढतां येईनात. मी हार खाऊन स्वस्थ बसलों आणि तेव्हांपासून हें कथानक माझ्या डोक्यांत सारखें घोळूं लागलें.

मुलीएवढी आई आणि आईएवढी मुलगी असल्याचें एक उदाहरण माझ्या नजरेसमोर होतें. या दोन्ही प्रसंगांचा मेळ घालून एक नाटक लिहिण्याची कल्पना माझ्या मनांत फार दिवस घोळत होती, पण माझें पहिलें नाटक 'कुंजविहारी' हें १९०८ सालीं रंगभूमीवर आलें, त्यावेळीं नाटकांतील प्रमुख भूमिका अल्पवयी व्यक्तीला देण्याचा प्रसंग योजल्यामुळें ज्या अडचणी मला अनुभवाव्या लागल्या

त्यामुळें हें नाटक लिहायची कल्पना मी बाजूला सारली. ठराविक वयाचें मूल प्रमुख भूमिका करण्यासाठीं—विशेषतः लहान मुलीच्या भूमिकेसाठीं—सदोदित मिळणें अशक्य असतें आणि भूमिका वारंवार बदलणें प्रयोगाच्या दृष्टीनेंही इष्ट नसतें, हें ध्यानीं घेऊन त्यावेळीं तरी तें कथानक मी बाजूला टाकलें.

नाटकलेखनाला कादंबरीलेखनाचें वावडें असतें असा माझा पहिल्यापासून समज होता. कादंबरींत अवश्य असलेला पाल्हाळ नाटकाला अनुपयुक्त असतो. एकदां या पाल्हाळाची संवय लागली, कीं ती नाटकाच्या रचनेला सदोदित विघातक ठरते. हरिभाऊ आपट्यांसारखा अत्यंत प्रभावी कादंबरीकार, पण त्यांनाही कथालेखनाच्या-पायीं नाटकलेखन कांहीं काळ तरी अशक्य झालें होतें. शेवटीं त्यांचें 'संत सखू' हें एकच नाटक यशस्वी झालें. पण दुसरें 'पिंगला' नाटक लिहितांना त्यांना आपली लेखणी आवरतां आली नाहीं आणि त्याचमुळें प्रयोगदृष्ट्या तें अयशस्वी ठरलें. आजच्या बहुतेक कादंबरीकारांच्या बाबतींतही हाच अनुभव आला आहे.

नाटकलेखन ही साहित्यदृष्ट्या केलेल्या वाङ्मयनिर्मितीची परिसीमा आहे. नाटक-लेखनांत जो सिद्धहस्त झाला, त्याला कादंबरीलेखन म्हणजे हातचा मळ आहे असें मी वारंवार म्हणत असें, पण तें माझ्या 'सुविद्य' मित्रांना पटत नसे. मला कादंबरी लिहितांच येणार नाहीं असा त्यांचा दावा होता. नाट्यलेखनाची कला सर्वस्वीं हस्तगत होईपर्यंत कादंबरी लिहायला हात घालायचा नाहीं, असा मी निश्चय केलेला असल्यामुळें या लेखनासाठीं मला नाटक लिहिल्यापासून वीस वर्षें थांबावें लागलें.

माझे मित्र नारायणराव कुळकर्णी यांनीं आपल्या 'महाराष्ट्र कुटुंब माले'साठीं एक कादंबरी लिहिण्याचा मला आग्रह केला. 'चिमणी' ही कादंबरी त्यांच्या-साठींच लिहिली गेली. तीच माझी पहिली कादंबरी.

ही कादंबरी प्रसिद्ध झाल्यानंतर माझ्या पूर्वीच्या त्या सुविद्य मित्रांना अवसान चढलें. त्या कादंबरीची यशस्विता त्यांना जाणवली. त्यांचें भविष्य खोटें झालें होतें. त्यांनीं चिडीला येऊन 'महाराष्ट्र फकीर माला' नांवाची एक माला 'महाराष्ट्र कुटुंब माले'चें विडंबन करण्यासाठीं निर्माण केली. 'चिमणी' वर चोंच मारण्यासाठीं 'कावळा' हें चोपडें त्यांनीं त्या मालेतर्फे प्रसिद्ध केलें. या

' कावळा ' पुस्तकाच्या कर्त्याचें नांव ' गोस्वामी मानवप्रकाशं ' असें देण्यांत आलें होतें. या मालेच्या जनकांच्या नांवाचीं आद्याक्षरें घेऊन हें नांव बनवण्यांत आलें होतें. कवि माधव ज्यूलियन यानीं आपल्या ' नकुलालन्कार ' या काव्यांतील एका टीपेंत या नांवांची फोड केलेली आहे.

लेखक ' काय लिहितो ' हें पाहाण्यापेक्षां 'कोण लिहितो' हें पाहाण्याकडे मराठी भाषेच्या चिकित्सकांची दृष्टि असते. त्या ' कावळा ' पुस्तकानें उडवलेली राळ मला पुष्कळच जाणवली. माझे मित्र नरहरपंत जोशी यांनीं ज्यावेळीं एक कादंबरी लिहिण्याची मला सूचना केली, त्यावेळीं लेखकाचें नांव कांहीं काळपर्यंत प्रसिद्ध करायचें नाहीं अशी अट म्हणूनच मी घातली. प्रस्तुत कादंबरींतील विषय मला फार जिव्हाळ्याचा वाटत होता आणि तो विषय केवळ मी हातीं घेतला आहे म्हणून त्याची उपेक्षा किंवा उपहास होऊं नये अशी माझी आंतरिक इच्छा होती. हरिभाऊ आपटे यांचें उदाहरण माझ्यासमोर होतें. ' मघली स्थिति ' ही त्यांची पहिली कादंबरी प्रसिद्ध झाली त्यावेळीं त्यांच्यावरही अशीच धूळफेंक झाली होती. ' पण लक्षांत कोण घेतो ? ' ही कादंबरी लिहितांना त्यांनीं आपलें नांव प्रसिद्ध केलें नाहीं तें याच कारणामुळें असावें, असा माझा समज होता. तो त्यांचा प्रयोग यशस्वी झाल्याचें उदाहरण नजरेसमोर असल्यामुळें मीही या कादंबरीच्या लेखकाचें नांव ' गतभर्तृका, पुणें ' असें दिलें. नुसतें ' गतभर्तृका ' असें नांव दिल्यानें कार्यभाग झाला नसता. त्या नांवाशीं ' पुणें ' जोडण्याचा अवश्य तो परिणाम झाला आणि त्यामुळेंच केसरीचे संपादक दे. भ. न. चिं. केळकर यांनीं खालीलप्रमाणें अनाहुत अभिप्राय लिहून प्रकाशकांकडे पाठवलाः—

सा. न. वि. वि.

' विधवा कुमारी ' हें पुस्तक आज सकाळीं माझ्या हातीं आलें. दोन प्रहरीं सहज तें हातीं घेतलें व त्यात नवींन पद्धतीप्रमाणें कांहीं ठराविक प्रणयकथा असेल अशा दूषित पूर्वग्रहानें पानें चाळण्यास प्रारंभ केला. पण दोनतीन पाने उलटण्यापूर्वीच माझे मन पुस्तकानें इतकें ओढून घेतलें कीं, सर्व कामें टाकून मी तें ५॥ वाजेपर्यन्त वाचून संपविलें. मी खरोखर सांगतों कीं, इतकी सरळ व

उदात्त अशी सामाजिक गोष्ट मी फार वर्षांत वाचली नाहीं. वर्णित चरित्र प्रत्यक्ष संसारांत घडून येण्याइतकें साधें व संभाव्य; पण गोष्टीच्या दृष्टीनेंही अत्यन्त सुरस असेंच आहे. पुस्तक वाचीत असतां डोळ्यांतून कितीतरी पाणी गेलें असेल! पूर्वी ह. ना. आपटे यांची 'पण लक्षांत कोण घेतो?' ही कादंबरी करमणुकीतून प्रसिद्ध होत असतांना विद्यार्थीदशेंत मी वाचली, व त्यानन्तर आज ही. पण आपट्यांच्या त्या कादंबरीपेक्षां ही कादंबरी मला चटकदार वाटली. आपटे आपल्या कादंबऱ्या ग्रंथाप्रमाणें न लिहितां, वर्तमानपत्री लेखाप्रमाणें लिहीत, त्यामुळें त्यांत पाल्हाळ असे. या कादंबरींत आटोपशीरपणा फार साधल्यामुळें थोडक्यांत उत्कृष्ट परिणाम होतो. भाषेच्या दृष्टीनेंही मी म्हणेन कीं, या कादंबरीची भाषा निदान आपटे यांच्या भाषेसारखी आहे. एकच उदाहरण देतों. पृष्ठ १३९ वरील * पहिल्या चार ओळींतील मजकूर सांगण्याला आपट्यांनीं दोन पानें घेतलीं असतीं! या चार ओळी वाचतांच 'शाबास' असे उद्गार माझ्या तोंडानें आपोआप उच्चारले. भाषेंत साधेपणा, प्रसाद व ठसठशीतपणा किती वाटला म्हणून सांगूं? ग्रंथकार स्त्री म्हणून जेन ऑस्टिनची आठवण झाली. स्वभावचित्रें उत्कृष्ट साधलीं आहेत. काका, ताई, चन्दू सर्वच पात्रें कशीं रेखीव आहेत! सावत्र आई, सावत्र लेक यांचे संबंध उलटसुलट कितीतरी कुशलतेनें रंगविलेले आहेत. ग्रन्थकर्त्रीच्या वाङ्मयनैपुण्यामुळें मी तरी तिला पहिल्या वर्गांत बसविण्यास तयार होईन. सामाजिक नाजुक विषय इतक्या कुशलतेनें व निरपवाद रीतीने रंगविल्याबद्दल मी त्यांना मनापासून धन्यवाद देतों. विधवांसम्बन्धानें अनुकम्पा तर उत्पन्न केलीच, पण ती अत्यन्त ग्राह्य, उदात्त. भावनांनीं. पुराणमतवादी मनुष्यहि ही गोष्ट वाचून आपले विचार बदलणें जरूर आहे किंवा नाहीं याचा विचार करूं लागेल.

असो. पुस्तक खालीं ठेवतांच हें पत्र लिहीत आहे.

पुणें, २४ एप्रिल १९२८ **न. चिं. केळकर**

---

* (प्रस्तुत आवृत्तींतील पान १२५ च्या शेवटच्या तीन व १२६ ची पहिली ओळ.)

हें पत्र फारच मोठें होतें. पत्रलेखकांनीं त्यांतला मंजूर केलेला तेवढाच भाग वर दिला आहे. पण सर्वच पत्र जर प्रसिद्ध करतां आलें असतें तर बऱ्याच चिकित्सक परीक्षकांना जबरदस्त धक्का बसला असता.

या कादंबरीच्या लेखिकेबद्दल त्यावेळीं मोठमोठ्या साहित्यिकांनाही तळमळ वाटण्याइतकी जिज्ञासा उत्पन्न झाली होती. वेगवेगळे तर्क करण्यांत येत होते. या संशयास्पद परिस्थितीचा फायदा घेऊन एक गतभर्तृका लेखिका ही कादंबरी आपणच लिहिली असें सांगण्याचें धाष्टर्यही करीत होत्या. कांहीं काळपर्यंत याच नांवाखालीं कादंबऱ्या लिहिण्याची माझी इच्छा होती, पण पुढें अशीच कांहीं चमत्कारिक परिस्थिति निर्माण झाली आणि या तोतया लेखिकेच्या नांवानें या कादंबरीची दुसरी आवृत्ति प्रसिद्ध होत आहे असें ज्यावेळीं मला कळलें, त्यावेळीं श्री. रांगणेकर यांच्या 'अरुण' या मासिकांत मला माझें नांव प्रसिद्ध करणें भाग पडलें.

नांव प्रसिद्ध झाल्यावर मात्र जिकडे तिकडे खळबळ उडाली. कुणी म्हणत, कीं ही कादंबरी पुरुषानेंच लिहिली होती हें आम्ही आधींच ओळखलें होतें. न. चिं. केळकर यांच्यासारख्या कसलेल्या साहित्यिकाला जें उमगलें नाहीं तें शोधून काढण्याचा अभिमान सामान्य टीकाकारांनीं मिरविणें हास्यास्पद होतें. कसें का असेना, माझा उपाय सर्वस्वी यशस्वी झाला होता. मात्र माझें नांव प्रसिद्ध झाल्यामुळें या कादंबरीची दुसरी आवृत्ति निघणें कठीण झालें आणि आतां ही तिसरी आवृत्ति तर दुसऱ्या आवृत्तीनंतर साधारण एकवीस वर्षांनीं निघत आहे ती हें पुस्तक बी. ए. च्या अभ्यासक्रमांत लावलें गेलें म्हणूनच.

प्रस्तुत कथानक वाचतांना आजच्या वाचकाला पदोपदीं खटकल्यासारखें वाटेल. हरिभाऊ आपटे यांच्या कादंबऱ्या ज्यांनीं अभ्यासल्या असतील त्यांना महाराष्ट्रांतल्या या विशिष्ट कालखंडाची थोडीबहुत कल्पना करतां येईल. हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्यांचें कार्यस्थळ पुणें आहे. क्वचित् मुंबईही त्यांत आली आहे, पण कोंकणच्या परिस्थितीचें निदर्शन या काळांतल्या कथांतून क्वचितच झालें होतें.

ही कोंकणची मनोभूमि आजच्या पिढीच्या फारशी परिचयाची नाहीं. पूर्वीच्या काळीं पुष्कळांना तिचा परिचय होता, पण साहित्याच्या क्षेत्रांत कोंकणची दखल घेतली जात नव्हती. आजसुद्धां, आजच्या युगाचे एकमेव कादंबरीकार श्री. ना. पेंडसे या सिद्धहस्त लेखकाखेरीज, कोंकणचें निदर्शन कथासाहित्यांतून सहसा कोणी केलेलें नाहीं. दक्षिण कोंकणच्या कांहीं कथा वि. स. खांडेकर आणि ना. ग. गोरे यांनीं लिहिल्या आहेत खऱ्या, पण त्या लघुकथा आहेत. 'दोन ध्रुव' या कादंबरीचें कार्यक्षेत्रही दक्षिण कोंकणांतच दाखविलें गेलें आहे, पण दक्षिण कोंकणची मनोवृत्ती आणि वातावरण तींत पुरेसें आलेलें नाहीं.

दक्षिण कोंकण आणि उत्तर कोंकण—विशेषतः रत्नागिरी जिल्ह्याचा उत्तर भाग—यांच्या संस्कृतींत आणि मनोवृत्तींत बराचसा फरक आहे. प्रस्तुत कथाही त्या रत्नागिरी जिल्ह्याच्या उत्तर भागांतील—म्हणजे चिपळूण तालुक्यांतील आहे. लोकमान्यांची मातृभूमि असलेल्या या तालुक्याचें ऐतिहासिक महत्त्व त्या काळांत फार मोठें मानलें जात होतें. चिपळूण आणि दापोली या दोन तालुक्यांत जन्मलेल्या व्यक्तीच महाराष्ट्राच्या सांस्कृतिक, राजकीय आणि धार्मिक क्षेत्रांत महान ठरल्या होत्या आणि याचा अभिमान या दोन तालुक्यांतील लोकही मोठ्या अभिमानानें मिरवीत असत. आज नांव होत आहे पुण्याचें, पण चिपळूण दापोली तालुके सर्वांच्याच नजरेआड झाले आहेत.

लहानपणापासून मला हरिभाऊंच्या कादंबऱ्यांचें मोठें वेड होतें. करमणूक साप्ताहिकांतून त्या क्रमशः प्रसिद्ध होत असतांना मी आधाशासारखा त्या वाचीत असें. हरिभाऊंच्या त्या लेखनशैलीप्रमाणेंच त्यांच्या विशिष्ट दृष्टीकोणाचा माझ्यावर जो फार मोठा परिणाम झाला होता, त्याचा परिणाम प्रस्तुत कादंबरीवर दिसणें अपरिहार्य होतें.

प्रस्तुत कथेंतील कांहीं कांहीं प्रसंग या विशिष्ट कालखंडांतील परिस्थितीचे द्योतक आहेत. मथू पहिल्यानेंच आपल्या सासरीं आली त्याचवेळीं लोकमान्य टिळकांवर राजद्रोहाचा खटला भरला गेला होता—म्हणजे १८९७ सालीं ती सुमारें बारा वर्षांची होती. हा काल ध्यानीं घेतला म्हणजे त्या वेळची सांस्कृतिक परिस्थिती कोणत्या प्रकारची होती याची कल्पना करतां येईल. महर्षि कर्वे यांच्या कार्याला

त्यावेळीं सुरवातसुद्धां झाली नव्हती. आगरकरांच्या ‘ सुधारक ’ पत्राचा नुकता कुठें परिणाम होत होता. ‘ सुधारक ’ या संज्ञेबद्दलदेखील बहुसंख्य महाराष्ट्रीयांना तिटकारा वाटत होता. सनातनी मुखंडांचें अधिष्ठान पुण्यांत असल्यामुळें जें एक वातवरण तिथें निर्माण झालें होतें त्याची छाया उभ्या महाराष्ट्रावर जेवढ्या प्रमाणांत पडली होती, तेवढ्याच प्रमाणांत रानडे, आगरकर आणि पुढें गोखले यांच्या सुधारकी वृत्तीला त्या सनातनी वातावरणाच्या पायीं पुढें पाऊल टाकणें अशक्य होत होतें.

या सनातनी वृत्तीच्या पुणेरी जुलुमांतूनच सुधारकांची निर्मिती झाली. बहुसंख्य सनातनी लोकांपुढें अल्पसंख्य सुधारक साऱ्या समाजावर नव्या मतांचा परिणाम करण्यासाठीं झगडत होते. त्याचवेळीं राजकारणाच्या क्षेत्रांतही तशाच प्रकारची परिस्थिति निर्माण झाली होती—म्हणजे तत्कालीन सरकारचा अभिमान धरणारे बहुसंख्य होते आणि सरकारविरुद्ध झगडणारे अल्पसंख्य होते. या सामाजिक आणि राजकीय झगड्याचा हा काल सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीनें फार महत्वाचा होता. प्रस्तुत कथेंत राजकीय वातावरणाचें निदर्शन येणें चरित्रनायिकेच्या विशिष्ट परिस्थितीमुळें शक्य नव्हतें. अर्थात् धार्मिक समजल्या जाणाऱ्या सामाजिक वातावरणापुरताच इतिहास या कालखंडांत येणें क्रमप्राप्त झालें.

या कथेंतील कांहीं व्यक्ति प्रत्यक्षांतून घेतलेल्या आहेत. कथेच्या विकासाला या नामनिर्दिष्ट झालेल्या व्यक्ती जरी उपयोगी पडत नसल्या, तरीही त्यांचें या कथेंतील अस्तित्व हा कालखंड निर्दिष्ट करण्यासाठींच मी बुद्धिपुरःसर उपयोजलें आहे.

सामाजिक कादंबरी ही आधुनिक इतिहासाची एक प्रकारची बखर असते—निदान ती तशी असली पाहिजे. कथेंतील व्यक्ती निर्माण करण्यासाठीं कल्पनेचा आश्रय करावा लागला तरीही तें वातावरण ऐतिहासिकच राहिलें पाहिजे. पुढल्या काळांतील इतिहाससंशोधकाला विशिष्ट कालखंडांतील परिस्थिती निश्चित करण्यासाठीं कोणत्याही कादंबरींतील प्रसंगानें घोंटाळ्यांत पाडतां कामा नये. कल्पनेच्या भरारीला एवढी मर्यादा घातली नाहीं तर ती कादंबरी प्रातिनिधिक होणार नाहीं.

ही कादंबरी लिहितांना हीच नजर ठेवण्यांत आली आहे. या कथेंतील व्यक्ती

काल्पनिक असल्या तरी त्यांचें सर्वसाधारण स्वरूप वास्तवावर आधारलेलें आहे. आजच्या अभ्यासकानें ही कादंबरी वाचतांना एवढी गोष्ट तरी विसरतां कामा नये.

एक गोष्ट खरी, कीं कादंबरी प्रसिद्ध झाल्यानंतर कांहीं काळानें कांहीं महाराष्ट्रीय विधवांनीं कुंकु लावायला सुरवात केली आणि आतां तर ही प्रथा सार्वत्रिक होणार असें वाटूं लागलें आहे.

कोण म्हणतो साहित्याचा परिणाम होत नाहीं म्हणून ?

हाजीकासम वाडी,
मुंबई ७
ता. ३ ऑगस्ट १९५४

भा. वि. वरेरकर.

## प्रकरण पहिलें  सत्यकाम जाबाल

लहानपणच्या आठवणी फार गोड. कुणीहि आपलें आत्मचरित्र हातीं लिहा-वयास घेतलें तरी लहानपणच्या आठवणी ज्या सुंदर स्वरूपांत नजरेसमोर उभ्या रहातात तशा प्रौढ वयांतील आठवणी रहात नाहींत. माझें चरित्र मी कां लिहावें ? जन्माला येऊन मी जितकी स्वतःला तितकीच इतरांनाहि दुःखदायक झालें होतें. ज्यांचा ज्यांचा म्हणून माझ्याशीं संबंध आला त्यांना त्यांना माझ्यासारख्याच हालअपेष्टा भोगाव्या लागल्या. गोड आठवणी काय त्या बालपणींच्या—इतर सर्व आयुष्यावर जसे कांहीं पेटलेले निखारेच पसरलेले ! आज अंतःकरणाला आंतून-बाहेरून चटके लागत असतांना नुसत्या बालपणींच्या गोड आठवणी आठवून मनाला थोडा तरी विरंगुळा व्हावा म्हणून लेखणी हातीं घेतली.

आमच्या महाराष्ट्रांत काय, कुठल्याही मुलीचें आयुष्य बहुतेक सारखेंच असतें. साऱ्याच मुली जर आपलें चरित्र लिहूं लागतील तर त्यांतील शेंकडा ऐशीं चरित्रें एका सांच्याचीं निपजतील. जन्माला आली, लहानपणीं खेळली, क्वचित् शाळेंत गेली, लग्न झालें, मुलें झालीं, मुलांमुलींचीं लग्नकार्यें केलीं आणि मेली—किंवा लग्न झालें, विधवा झाली, दुसऱ्याच्या घरीं राबली आणि दुसऱ्याचे शिव्याशाप घेत मेली. आम्हां मुलींचें हेंच काय तें जीवनचरित्र !

कुणाच्याहि चरित्रांत कांहींच असामान्य नसतें. आम्हीं त्याच्यावर असामान्य-पणाचा आरोप करतों. ज्याला आपण असामान्य म्हणतों तें सामान्यतेची शेवटची मजल असते. त्या शेवटच्या मजलेच्या टप्प्याला मी कुठें तरी गांठलें आहे असें कुणा वाचकाला वाटलें तर त्याला तरी दोष कशाला देऊं ? पण माझें हें चरित्र वाचणार कोण ?

तुम्हीं म्हणाल, बालपणच्या गोड गोष्टी सांगण्याचा आव आणून आरंभालाच ही बाई तात्विक विवेचनांत शिरली! पण असें विवेचन ओघाओघानेंच लेखणीच्या टोंकाशीं आलें त्याला मी तरी काय करूं ? मी कांहीं कादंबरी रचण्यासाटीं बसलें नाहीं. अमुक एक प्रसंग आणायचे, त्या प्रसंगांतून नायिकेला हिंडवायचें, त्यांतल्या कांहीं प्रसंगांतून तिला पार पाडायचें आणि कांहीं प्रसंगाखालीं तिला चिरडून टाकायचें—असा अधुऱ्या जिवाचा निर्दय खेळ खेळायला कांहीं मी निघालें नाहीं! जशा गोष्टी घडल्या, जशा त्या आठवल्या आणि त्या आठवत असतांना जे जे विचाराचे तरंग मनांत आले, ते ते—तसेच्या तसेच—मी ह्या कागदांवर टिपून ठेवणार आहें.

माझ्या जन्मभूमीच्या गांवचें नांव जर मी येथें सांगितलें तर शोधक वाचकाला माझा पत्ता सहज लागण्याचा संभव आहे. कारण माझ्या आयुष्यांत अशाच कांहीं चमत्कारिक गोष्टी घडल्या आहेत, कीं माझ्या जन्मभूमीच्या गांवीं माझ्या बऱ्या-वाईट नांवाची दोन्ही प्रकारची हाकाटी झाली आहे. म्हणून एवढेंच लिहून ठेवतें, कीं माझ्या जन्मभूमीचें गांव चिपळूण तालुक्यांत आहे. त्या गांवांत एक नदी आहे. त्या नदीच्या पाण्याला पाट काढलेले आहेत आणि त्या पाटाचें पाणी ज्या ज्या भागांतून खेळवलें आहे त्यांतील एका जागीं माझें माहेरघर आहे.

ह्या असल्या खेड्यांतल्या लहानपणच्या आठवणी आजच्या सुशिक्षित मुलींना काय रुचणार ? झिम्मा, फुगडी, छापापाणी, हरतालिका, मंगळागौर हीं नांवें, मला वाटतें, हल्लींच्या मुलींना ठाऊकसुद्धां नसतील ! कालच ट्रॅममधून येतांना मला एक पंधरा वर्षांची मुलगी भेटली होती. ती कॉंग्रेसच्या राजकारणाबद्दल आपल्या सोबतिणीबरोबर जोरजोरानें वाद करीत असल्याचें मी ऐकत होतें. स्वार्थत्यागाच्या गोष्टी तिच्या तोंडून निघूं लागल्या त्या वेळीं माझा अनोळखीपणा टाकून हळूच मीं एक शब्द मध्यें टाकला आणि म्हणालें, “ रन्तिदेवची गोष्ट तुला माहीत आहे का ? ” ती मुलगी चटकन् चमकून माझ्याकडे वळली आणि तिच्या सोबतिणीला डोळा घालून खुदखुदून हंसूं लागली. मीं म्हटलें, “ बरं. श्रियाळचांगुणा तरी ? ” दोघीहि मुलींना माझ्या ह्या प्रश्नानें हंसूं लोटलें आणि ती धिटुकली मुलगी व्रात्यपणानें मला म्हणाली, “ बाई, इतक्या लवकर तुम्हीं म्हाताऱ्या कशा झालांत ? ” दोघीहि मुलींनीं माझ्याकडे पाहून माझी टर करण्यास सुरवात केली. पण मी उत्तर दिलें, “ मुली, मी जन्मापासूनच म्हातारी आहें. ” त्या मुलीच्या

मनांत मला कांहीं उत्तर द्यायचें होतें, पण त्यांची उतरण्याची जागा आल्या-मुळें हातांतील टेनिस्–रॅकेट गरगर फिरवीत, त्या दोघीहि माझ्याकडे पाहात निघून गेल्या! आणि म्हणूनच मला वाटतें, कीं ईश्वर करो आणि माझें हें चरित्र हल्लींच्या मुलींच्या हातीं न पडो.

अगदीं लहानपणची आठवण म्हणजे माझे बाबा मला कडेवर घेऊन देवळांत कीर्तनाला घेऊन जात असत. मला आठवतें, कीं एके दिवशीं कीर्तन संपल्यावर हरिदासबुवांना नमस्कार करण्यासाठीं ज्या वेळीं माझे बाबा गेले त्यावेळीं क्षणभर त्यांनीं मला बाजूला उभें केलें. बुवांना नमस्कार करण्यासाठीं श्रोत्यांची एकच झुंबड उडाली होती. बाबा नमस्कार करून उठले आणि इतक्यांत चारदोघांनीं मला जोरानें धक्का दिला. त्यासरशीं मीं बुवांच्या पायांवर पडलें. बुवांना वाटलें, कीं मी नमस्कार केला. त्यांनीं वांकून प्रेमानें माझ्या डोक्यावरून हात फिरविला. धक्का बसल्याचा मला राग आला होता. त्याचें उट्टें काढण्यासाठीं बुवांचा तोच हात धरून मी त्याला कडकडून चावलें. बुवा बाबांना म्हणाले, “ काय पोरटी पहा, मी हिला आशीर्वाद देतों अन् ही माझा हात चावते ! ”

ह्या वेळीं माझें वय बहुतेक चारपांच वर्षांचें असेल! बाबांनीं रागानें माझा कान धरून पिरगळला आणि पोटाला एक सडकून चिमटा घेतला. मी मोठ्यानें भोकाड पसरलें पण ‘ सीताकान्तस्मरण जयजयराम’च्या नामगजरांत माझ्या त्या ओरडण्याचें चीज झालें नाहीं.

घरीं येतांच बाबांनीं मला आईच्या समोर नेऊन आदळलें. आईनें विचारल्यावरून बाबा म्हणाले, “ काय तरी दुष्ट कार्टी ! बुवांनीं आशीर्वाद दिला, तर त्यांचा हातच चावते ! ” आई म्हणाली, “ असं कसं करील ती ? दुसरंच कांहीं तरी कारण झालं असेल. ” बाबा संतापून म्हणाले, “ अशानं शेवटीं तूं ह्या पोरीला बिघडवून टाकणार. एव्हांपासून काळजी घेतली नाहींस, तर ही पोरगी माझे बेचाळीस पूर्वज नरकाला पाठवील. ” आईनें हळूच मला उचलून कडेवर घेतलें तेव्हां मी माझ्या मोडक्यातोडक्या भाषेंत झालेली हकीकत सांगितली. बाबा संतापानें ओरडून म्हणाले, “ मी प्रत्यक्ष पहात होतों. कुणी नाहीं धक्का दिला तिला ! एव्हांपासूनच कार्टी खोटं बोलूं लागली आहे–पुढं काय दिवे लावणार आहे देव जाणे ! ”

माझ्या मनांत प्रश्न उभा राहिला–हें खोटें म्हणजे काय ? माणसांची झुम्बड येऊन त्यांनीं मला लोटून दिलें. बाबा म्हणतात, मला कुणीच लोटून दिलें नाहीं

म्हणून !' मग खोटें म्हणजे काय ? मी हळूच आईच्या गळ्यांत हात घातला, डाव्या हातानें तिची हनुवटी वर उचलली आणि म्हटलें,

" आई, खोटं म्हणजे काय ? "

आई हंसत हंसत माझ्या डोक्यावरून हात फिरवून म्हणाली,

" जें झालं नाहीं तें सांगणं. "

मी पुन्हां आईच्या गळ्यांत दुसराहि हात टाकला, आईच्या कानाजवळ तोंड नेलें आणि पुटपुटून सांगितलें, " तर मग आई, बाबा खोटं बोलले. "

आईची खात्री पटली. तिनें दोन्हीं हातांनीं माझे कान दाबून धरून माझा एक पापा घेतला.

मी आईला पुन्हां विचारलें, " आई, खोटं कां बोलतात ? "

आई म्हणाली, " तें तुला एव्हां कळायचं नाहीं. पण मथू, बाळ, तूं मात्र केव्हांही खोटं बोलूं नकोस हो. "

मी म्हणालें, " बाबा खोटं बोलले ते ! "

आई म्हणाली, " मोठ्यांच्या गोष्टी आपण बोलूं नयेत. पण माझं एक सांगणं ध्यानांत ठेव, कुणी कांहीं केलं तरी केव्हांहि खोटं म्हणून बोलूं नकोस. "

मी एक क्षणभर विचार करून पुन्हां आईला विचारलें, " खोटं नसतं त्याला काय म्हणतात आई ? "

आईनें उत्तर दिलें, " त्याला खरं बोलणं म्हणतात. "

आई हळुहळू मला थोपटीत होती आणि माझा डोळा लागत होता. माझ्या डोक्यांत एकच विचार चालला होता—खोटें आणि खरें. त्या वेळीं माझे काय विचार चालले होते, कोणत्या प्रकारानें चालले होते—ती बालभाषा आतां लिहून काढण्याइतका कोमलपणा माझ्या अंगीं राहिला नाहीं. आतां आठवतें तें ऐवढेंच, कीं खरें आणि खोटें या विषयावर त्या रात्रीं माझ्या डोक्यांत सारखें काहूर चाललें होतें. खऱ्याखोट्याची छाननी करण्यासाठीं आज जर कुणी मला सांगितलें तर मी तासच्या तास त्यावर बोलूं शकेन, पण ती त्या दिवशींची विचारसरणी मात्र मला आज उच्चारतां येणार नाहीं. त्या दिवशीं मला काय वाटलें ह्याचा मीं आज विचार करूं लागलें तर मला आज एवढेंच सांगतां येईल, कीं जगांत एकच अनर्थ आहे—आणि तो म्हणजे खोटें बोलणें.

माझ्या जीवनाचें पान कोरें होतें आणि त्याच्यावर एक लहानशी काळी रेघ काढली गेली होती–आणि ती म्हणजे–खोटें बोलणें. माझ्या आयुष्यांत इतर कोणत्याहि गोष्टी घडल्या नव्हत्या. बऱ्यावाईटाची जाणीव त्या वेळीं मला झालेली नव्हती. पापपुण्याची भीति नव्हती. जग आणि जीवन ह्यांची आठवणही नव्हती अशा वेळीं आयुष्याच्या संथ पाण्यावर एक अगदीं बारिकशी झुळुक आली आणि तिनें एक लहानशीच लहर निर्माण केली–ती म्हणजे खोटें बोलणें. सत्य आणि असत्य यांच्या जाणीवेनें मी पहिल्यानें जगाकडे पाहिलें. जन्माला आल्यापासून नऊ दिवसांनन्तर कुत्र्या-मांजराच्या पोरांना जशी नजर येते तशी त्या दिवशीं मला दृष्टि आली. दोन अज्ञात वस्तु त्या दिवशीं माझ्या ओळखीच्या झाल्या—एक, माझे बाबा आणि आई आणि दुसरी, खोटें व खरें. माझ्या आयुष्यांतील जाणिवेचा हा पहिला श्वास मीं घेतला.

त्या दिवसापासून जगाकडे पहाण्याची नजर मला मिळाली आणि हजारों प्रश्नांनीं मीं आईला भंडावून सोडूं लागलें. आई पूजेला बसली होती. मी मागून जाऊन दोन्ही हात तिच्या मानेभोंवतीं टाकले आणि विचारलें :

" आई, काय करते आहेस ? "

आईनें देवाची पूजा करीत असल्याचें सांगतांच मी तिला प्रश्न केला :

" आई, देव खरा कीं खोटा ? "

आई माझ्याकडे पाहून नुसती हंसली. मीं आईला विचारलें :

" सांग ना आई, देव खरा कीं खोटा ? पूजा खरी कीं खोटी ? "

आई म्हणाली, " दोन्हींही खरीं–देवही खरा आणि पूजाही खरी. "

मी विचारलें, " कां ? "

आई म्हणाली, " आपले वाडवडील सांगत आले, कीं देव खरा आहे आणि त्याची पूजा करावी आणि मीही तुला तेंच सांगतें."

त्याबरोबर मी आईच्या मानेवर हात टाकून तिच्या मांडीवर बसलें. आई पूजा कशी करीत असे तें मीं पाहिलें होतें, पण पूजेचा अनुक्रम मला माहित नव्हता. मी फुलें, अक्षता, गंध ह्यांची उलटापालट करून देवाला वाहिलीं, निरांजन ओवाळलें आणि पेल्यांतील पाणी घेऊन देवावर ओतलें. आई हंसून म्हणाली,

" काय केलंस हें पोरी ? साऱ्या पूजेवर पाणी ओतलंस ! "

मी हंसून दोन हातांनीं टाळ्या वाजवतांच आईनें मला उराशीं घट्ट कवटाळून धरलें आणि नैवेद्याचा गुळाचा खडा ' हा घे नैवेद्य ' असें म्हणून माझ्या तोंडांत घातला. आईनें नैवेद्य देवाला दाखवला होता काय ? मी आईला म्हटलें,

" आई, तूं देवाला नैवेद्य दाखवला नाहींस ! "

आई म्हणाली, " तुझ्या तोंडीं गेला तो देवालाच पावला."

मीं पुन्हां आईला विचारलें, " नैवेद्य खरा काय ? "

आई म्हणाली, " देवानं जेवढं कांहीं उत्पन्न केलं आहे तें सारं खरं आहे."

मीं विचारलें, " मग, खोटं काय ? "

आई म्हणाली, " जें माणसाला सुचतं, पण देवाला रुचत नाहीं तें खोटं."

अजूनही हें आईचें वाक्य मला आठवतें. साऱ्या वेदान्ताचें, साऱ्या तत्त्वज्ञानाचें सार आईच्या ह्या एका वाक्यांतच सांठवलेलें माझ्या पोरनजरेला दिसलें. खऱ्या-खोट्याचा निवाडा करण्याचा ध्यास मला तेव्हांपासूनच लागला. अजूनहि ह्याच ध्यासानें माझी पाठ पुरवली आहे आणि ह्याच ध्यासामुळें माझ्या आयुष्याचा सत्यानाश झाला आहे. बेमालून खोटें न बोलण्याच्या पायीं माझ्या आयुष्यांत माझ्यावर अनेक आपत्ति कोसळल्या. अजूनहि माझ्या मनांत तो एकच प्रश्न आहे :

" खरं काय आणि खोटं काय ? "

खऱ्याखोट्याच्या ह्या जाणिवेमुळें माझ्या बालपणांतही मला फार त्रास झाला. माझ्या बरोबरीच्या मुलामुलींना मी पदोपदीं अप्रिय होऊं लागलें. आमच्या गांवांत एक शाळा होती. ती नुसती मुलांचीच शाळा होती. मुलींची शाळा असण्याइतकी आमच्या गांवची परिस्थिति नव्हती, तेव्हां पांढरपेशा मंडळींच्या कांहीं मुली ह्याच मुलांच्या शाळेमध्यें शिकावयास जात असत. साऱ्या शाळेंत अशा मुली फार तर पांच सहा होत्या, पण मुलगे मात्र सुमारें दोनशें होते. आमच्या शेजारीं गोंदू नांवाचा एक मुलगा होता. तो अगदीं बावळा असल्यामुळें शाळेंत सर्वच त्याची थट्टा करीत असत. आमच्या शेजारची एक मुलगी बनी माझ्याबरोबरच शाळेंत जात असे. ती फार खट्याळ मुलगी होती. कोणाच्याही खोडी काढण्यांत तिचा अगदीं हातखंडा असे. एके दिवशीं एक लहानसें बेटकुळीचें पोर घेऊन तिनें तें गोंदूच्या पुस्तकांच्या पिशवींत सोडून दिलें. गोंदू वर्गांत जाऊन पुस्तकें काढण्या-

साठीं पिशवींत हात घालतो तोंच आंतून बेटकुळीनें बाहेर उडी मारली. भित्रा गोंदू मोठमोठ्यानें ओरडूं लागला. बेटकुळी ह्याच्या दप्तरावरून त्याच्या दप्तरावर अशा उड्या मारीत जाऊं लागतांच वर्गांत सगळी पांगापांग झाली. कुणी ओरडूं लागले तर कुणी हंसूं लागले! शेवटीं एकदांची बेटकुळी वर्गाबाहेर निघून गेली. त्या पांगापांगीमुळें मास्तर अगदीं संतापून गेले आणि टेबलावर छडी मारून मोठ्यानें ओरडून म्हणाले,

"गोंदूच्या पिशवींत बेटकुळी कुणी घातली?"

कोणीच कांहीं बोलेना.

मास्तर म्हणाले, "अपराधी माणसानं बऱ्या बोलानं कबूल व्हावं, नाहीं तर सर्वांनाच मी सरसहा मार देईन."

बनी कांहीं बोलेना. बेटकुळी गोंदूच्या पिशवींत टाकतांना मी तिला पाहिलें होतें. बनीला हळूच मी बाजूला म्हटलें, "बने, सांग ना जाऊन."

बनी म्हणाली, "कां सांगू? मुद्दाम मार खाण्यासाठीं का?"

मी विचारलें, "तर काय, तूं खोटं बोलणार?"

बनी म्हणाली, "मी खोटं कुठं बोलतें—मी मुळीं बोलतच नाहीं म्हणजे झालं."

मास्तर खुर्चीवरून उठले आणि प्रत्येक मुलामुलीला विचारूं लागले. प्रत्येक-जण नाहीं म्हणूं लागला. आम्हीं मुली वर्गाच्या दुसऱ्या बाजूला होतों. वर्गांत आमचा नंबर कितवाही असला तरी हल्लीं महारांच्या मुलांना बाजूला बसवतात तसें त्या वेळीं मुलींना बाजूला बसवीत असत. शेवटीं आम्हां मुलींवर पाळी आली. त्यावेळीं आम्हीं दोघीच मुली होतों. मास्तरनीं बनीला विचारतांच ती अगदीं मुखस्तंभासारखी स्तब्ध राहिली. मास्तरनीं अगदीं दरवडतांच तिनें मानेनेंच नाहीं म्हटलें. मला बनीचा भारीच राग आला. मास्तरनीं मला विचारतांच मी बनीचें नांव सांगितलें. मास्तरनीं बनीला सपासप चारपांच छड्या मारल्या. बनी मोठमोठ्यानें रडूं लागली. बनी रडत असलेली पाहून मला फार वाईट वाटलें. माझ्यामुळें बनीला मार बसला ह्या जाणीवेनें मला देखील रडूं कोसळलें. शेजारचा एक मुलगा माझ्याकडे पाहून म्हणाला, "काय कांगावखोर पोरटी आहे पहा! आपण चुगल्या करते, दुसऱ्याला मार देववते आणि आपणच रडते!"

मला राहून राहून पुन्हा वाटूं लागलें, कीं मी खरें बोललें ही चूक केली का? शाळा सुटल्यानंतर बनी तर माझ्याशीं बोलेनाच, पण वर्गांतील इतर

मुलेंही माझ्याशीं बोलेनाशीं झालीं. मला सर्वांत आश्चर्य वाटलें गोंदूचें. वास्तविक त्यानें तरी मला दोष द्यायला नको होता—कारण बनीनें त्याची कुचाळी काढली होती—पण गम्मत ही, कीं मला दोष देण्यांत भित्रा गोंदूच सर्वांच्या पुढें होता ! तो म्हणाला, " काय दुष्ट कार्टी आहे पहा ! मास्तरांची मर्जी संपादन करण्यासाठीं अगदीं सत्यवादी हरिश्चंद्राचा आव आणूं लागली ! असली चुगलखोर कार्टी ज्या वर्गांत असेल त्या वर्गांत रहाणें देखील धोक्याचं आहे. आतां मी मास्तरनां सांगणार कीं, असल्या मुलीची आपल्याला सोबत नको. मला वरच्या वर्गांत घाला. " आपण केलेल्या विनोदावर खूष होऊन, तो आपणच फिदीफिदी हसूं लागला !

'चहाडबुचकी—चहाडबुचकी ' म्हणून सर्वांनींच मला सतावायला सुरवात केली. माझा जीव अगदीं रडकुंडीला आला. अगदीं तोंडाशीं आलेला हुंदका मी गिळून टाकला आणि कशीबशी घरची मजल गांठली. माझें गोरेंमोरें तोंड पहातांच आईनें मला विचारलें,

" मथू, काय झालं ? "

आईच्या तोंडचे शब्द ऐकतांच माझ्या रडण्याला वाचा फुटली आणि आईच्या गळ्याला घट्ट मिठी मारून हुंदके देत देत मीं ओक्साबोक्शीं रडूं लागलें. माझें रडें थांबेपर्यंत आईनें मला कांहीं विचारलें नाहीं. आईनें विचारतांच तिला मी झालेली हकीकत सांगितली आणि विचारलें,

" ह्यांत माझी काय चूक झाली आई ? "

आईनें विचारलें, " मास्तरनीं विचारल्याशिवाय तूं आपण होऊनच सांगितलंस का ? "

मी अर्थातच 'नाहीं' म्हटलें. आई माझ्या मस्तकावरून हात फिरवीत फिरवीत म्हणाली,

" कुणी कांहीं म्हणोत, आपण केव्हांही खरंच बोलावं. मास्तरनीं न विचारतांच तूं सांगितलं असतंस तर ती चुगली झाली असती. त्यांनीं विचारलं, तुला माहीत होतं, तूं सांगितलंस हें अगदीं योग्य केलंस."

पण त्या दिवसापासून बनी माझ्याशीं बोलेनाशी झाली ! गोंदूहि माझ्याशीं भाषण करीत नसे ! बनीनें रागावणें योग्यच होतें पण गोंदूचा माझ्यावर राग कां, ह्याचें मला राहून राहून आश्चर्य वाटे. बाकीचीं मुलें माझ्यापासून फटकून राहूं लागलीं. केव्हांही कांहीं बोलायचें असलें, कीं ती मला टाळूं लागलीं. एका परीनें मी वर्गांत असून नसल्यासारखीच झालें !

माझ्या मनाला पुन्हां पुन्हां वाटत असे, खरें बोलण्याचा असा परिणाम कां व्हावा? खरें बोलणें म्हणजे चूक काय? मी खोटें बोललें असतें तर सर्वांनाच मार बसला असता. बनीनें गुन्हा केला त्याबद्दल तिला शिक्षा झाली—त्याबद्दल तिला वाईट वाटणें साहजिकच होतें—पण ज्या इतर मुलांची शिक्षा माझ्या खऱ्या बोलण्यामुळें टळली होती त्यांची माझ्यावर इतराजी कां व्हावी? हें कोडें मला उलगडेना. मी आईला विचारून पाहिलें. ती म्हणाली,

"असंच व्हायचं. असं कांहीं झालं तरी खरं बोलणं टाकून उपयोगी नाहीं. मुलांचं काय, चार दिवस तुझ्याशीं अबोला धरतील, पुन्हां आपोआप बोलूं लागतील! पण एकदां खोटं बोलण्याची संवय जडली तर ती मात्र कांहीं केल्या जाणार नाहीं!"

आणि झालेंहि तसेंच. चारदोन दिवसांत मुलांची लहर फिरली. पुन्हां सर्व जणें माझ्याशीं चांगलें बोलूं लागलीं. 'चहाडबुचकी' म्हणून माझी थट्टा करणें बन्द झालें. बनीही पुन्हां सागरगोट्यांनीं खेळायला मला बोलावूं लागली—तेव्हां माझ्या जिवास धीर आला. आईच्या शब्दांचा विश्वास पटला.

दुसरी अशीच एक कसोटीची वेळ आली—पण त्यांत गुन्हा माझा होता, कीं बाबांचा होता ह्याची शहानिशा अद्याप होत नाहीं. बाबांचा कुणी एक देणेकरी होता. तो येत असतांना दिसलेला पाहून बाबा आंत खोलींत जाऊन लपून बसले आणि मला म्हणाले, "बाहेर कुणी आला तर मी घरांत नाहीं म्हणून सांग."

मी खोटें सांगणार नाहीं म्हणून म्हटलें—तेव्हां बाबा भयंकर चवताळून माझ्यावर खेकसून म्हणाले, "मोठी आली आहे सत्याची पुतळी! पोरांनीं सांगितलेलं ऐकावं. मी सांगतों तसं न सांगितलंस तर काठीखालीं झोडपून काढीन."

मी कांहींच न बोलतां खोलीबाहेर गेलें. मला माझ्या खरें बोलण्याचा मोठा अभिमान होता. देणेकऱ्यानें दारांत येऊन विचारतांच मी त्याला सांगितलें, "बाबा आंत बसले आहेत अन् 'मी घरांत नाहीं' असं तुम्हांला सांगायला त्यांनीं मला सांगितलं आहे."

देणेकरी तिथेंच बसून राहिला. बाबांनीं हळूच खोलींतून बाहेर येऊन मागील दारानें पळ काढला होता! बराच वेळ वाट पाहिल्यावर तो देणेकरी म्हणाला, "कुठं आहे तुझा बाबा, मला दाखव पाहूं."

बाबा बाहेर गेल्याचें मला माहीत नव्हतें. मी त्याला घेऊन खोलीच्या दाराशीं आलें. बाबा अर्थात्‌च आंत नव्हते. त्यानें सर्व घर धुंडाळलें आणि बाबा कोठेंच सांपडत नाहींत असें पाहून माझ्याकडे बघत म्हणाला, "काय लबाड पोर आहे! धडधडीत खोटं बोलून बापाचा अपमान करते!"

तो निघून जातांच मला रडूं कोसळलें!

मी खरें बोललें ही चूक केली कीं काय असेंही माझ्या मनांत आलें. बाबा घरांत नाहींत असें मी त्याला सांगितलें असतें तर तो त्याच वेळीं कदाचित् निघून गेला असता, बाबांची अडचण टळली असती आणि त्याचीही निष्कारण खोटी झाली नसती. मग मी खरें बोललें ही चूक केली कीं काय असा प्रश्न त्या वेळीं माझ्या मनाला डाचूं लागला.

थोड्या वेळानें आई घरीं आली. झालेली हकीकत तिला सांगतांच गंभीर चेहरा करून ती मला म्हणाली, "हें बरं झालं नाहीं." थोडा वेळ थांबून ती आपल्याशींच पुटपुटली, "पुरुषांना हें एवढं कसं कळत नाहीं!" मी पुन्हां आईला प्रश्न करणार तोंच बाबा तेथें आले. बाबांचा चेहरा पाहतांच माझ्या सर्वांगाला कापरें भरलें. मी आईला जास्त जास्त बिलगूं लागलें आणि तीही मला आपल्या पाठीशीं घालूं लागली. खसकन् माझा हात धरून ओढून बाबांनीं हातांतील काठीनें मला मारण्यास सुरवात केली.

आई मध्यें पडली आणि म्हणाली, "असं काय पोरीला मारायचं तें?"

बाबा पुन्हां मला एक धपाटा देऊन म्हणाले, "आज हिनं माझ्या गळ्याला फास लावला होता."

आई म्हणाली, "मला कळलं सारं—पण असल्या गोष्टी लहान मुलांना सांगूं नये. आपण एव्हांपासून त्यांना असे धडे दिले तर पुढं मुलं बिघडल्याचं जोखीम कुणावर?"

आईच्या ह्या उद्गारांनीं बाबा शरमल्यासारखे दिसले—पण पुन्हां त्यांना काय वाटलें कुणाला ठाऊक! आईवर डोळे वटारून ते म्हणाले,

"नवऱ्याच्या वागणुकीची चर्चा करणं बायकांचं काम नाहीं!"

बाबांचें हें वाक्य ऐकून आई नुसती हंसली. तिच्या हंसण्याचा बाबांना राग आला कीं काय कोण जाणे, ते हातपाय आपटीत खोलींत तसेच निघून गेले आणि पोथी उघडून वाचीत बसले.

माझे बाबा पुराणिक होते हें सांगायचें राहिलें. त्यांनीं वेदांचेंही अध्ययन केलें असल्यामुळें प्रसंगविशेषीं ते भिक्षुकीहि करीत असत. बाहेरगांवच्या पुराणांची आधीं घरीं उजळणी करण्याची त्यांना संवय होती. मधून मधून उपनिषदांचाहि अभ्यास चालत असे. आपण जें अध्ययन करतों तें आपल्याला कळलें कीं नाहीं हें समजण्यासाठीं ते त्या त्या ग्रंथाचा मराठींत तर्जुमा करून पहात असत. त्या वेळीं भाषान्तरें लिहून काढण्याची पद्धति कुणाच्या ध्यानीमनींही नसे, त्यामुळें वाचलेल्या ग्रन्थाचें भाषांतर तोंडीं सांगणें हें जास्त सुलभ जात असे. उपनिषदांचें अध्ययन करीत असतांना त्यांचें असें भाषांतर सांगण्याचा बाबांचा उपक्रम असे. श्रोत्यांच्या जागीं एक आई आणि दुसरी मी. ह्या अध्ययनाच्या पुराणाला परकी माणसांना येऊं द्यायचें बाबा टाळीत असत. त्या दिवशीं उपनिषदांतील जाबालाची गोष्ट आली होती. जाबाल हीनवर्णी असला तरीही तो खरें बोलला म्हणून त्याच्या गुरूनें त्याला ब्राह्मण ठरवलें आणि 'सत्यकाम जाबाल' असें नांव त्याला दिलें. ही कथा ऐकत असतांना आई मध्येंच म्हणाली,

"आपलंहि गोत्र जाबालच आहे, नव्हे का?"

आईचा टोमणा बाबांच्या लक्षांत आला असावा. विषयान्तर करण्याच्या उद्देशानें बाबा म्हणाले, "जाबाल जरी वृषलीपुत्र होता, जरी त्याच्या पित्याचा ठावठिकाणा नव्हता, तरीही आईनं सांगितल्यावर ती गोष्ट त्यानं लपवून ठेवली नाहीं, गुरूजवळ कबूल केली, म्हणूनच तो ब्राह्मण ठरला; तेव्हां त्याच्या वंशापासून आपण उत्पन्न झालों याबद्दल वाईट वाटायचं कांहीं कारण नाहीं."

बाबांचें हें प्रवचन ऐकून नित्याच्या पद्धतीप्रमाणें आई नुसती हंसली. बाबांच्या भाषणांतील बरेचसे शब्द जरी मला त्या वेळीं कळले नव्हते तरी एक गोष्ट माझ्या ध्यानांत आली, कीं नुसतें खरें बोलण्यानें एक ब्राह्मण नसलेला मनुष्य ब्राह्मण होऊं शकला. माझ्या कोंवळ्या मनावर त्या गोष्टीचा विलक्षण परिणाम झाला. मी बाबांना विचारलें,

"सत्यकाम जाबाल म्हणजे खरं बोलणारा जाबाल–असंच ना?"

बाबा वसकन् माझ्या अंगावर ओरडून म्हणाले, "चूप बैस! तुला त्यांत कांहीं कळणार नाहीं."

बाबांच्या बोलण्यानें मी दचकून आईच्या मांडीवर अंग टाकलें आणि केव्हां झोपीं गेलें तें मला कळलें नाहीं.

# प्रकरण दुसरें शुभमंगल ?

हल्लीं माझ्या लग्नाच्या गोष्टी सुरू झाल्या होत्या. जेमतेम मराठी तिसऱ्या इयत्तेपर्यंत माझें शाळेंत शिक्षण झालें. त्यानंतर मला शाळेंतून काढलें. दहा अकरा वर्षांची मुलगी शाळेंत पाठवणें त्या वेळीं निषिद्ध समजलें जात होतें. शाळा बन्द झाली आणि लग्नाच्या गोष्टी सुरू झाल्या. माझ्या पाठीमागून मला दुसरें भावंड झालें नाहीं त्यामुळें आईचें माझ्यावर विलक्षण प्रेम असे. लग्न करून मुलीला सासरीं पाठवावयाची—ही कल्पनाही तिला दुस्सह होत असे.

बाबांनीं म्हणावें कीं, 'मुलगी केवढी वाढली !'

आणि आईनें म्हणावें, 'छेः ! अजून कुठं तिच्या लग्नाचं वय झालं आहे ?'

इतक्यांत लग्न करूं नये असें आईला वाटत असलें तरी बाबांच्या इच्छेपुढें ती बिचारी काय करणार होती ? माझी आई सुशिक्षित नव्हती. तिला लिहितांही येत नसे. प्रौढविवाहाबद्दलचे वादविवाद आमच्या खेड्यापर्यंत त्या वेळीं येऊन पोहोंचले नव्हते. प्रौढविवाहासाठीं मुलीचें लग्न लवकर करूं नये असें म्हणणाऱ्या अलीकडील वर्गांतील ती नव्हती. केवळ माझ्या वियोगाच्या दुःखाच्या कल्पनेनेंच माझें लग्न लवकर होऊं नये असें तिला वाटत असे.

शेजारीपाजारी तिला सारखे भंडावून सोडीत, त्यावेळीं हंसण्यावारी नेऊन तिनें म्हणावें, 'मथूचं वय लग्नाचं झालं असेल, पण तशी ती कांहीं मोठी दिसत नाहीं.'

खरें पाहिलें तर माझ्या वयाच्या मानानें मी बरीच मोठी दिसत असें.

राहून राहून माझ्या मनांत प्रश्न येत असे, कीं आई हें खोटें बोलते काय ? एके दिवशीं मनाचा धडा करून मी तिला विचारलें:

"आई, हें तूं खोटं बोलतेस काय ? बनी माझ्याच वयाची ना ? तिच्या-पेक्षांहि मी उंच दिसतें—आणि तूं म्हणतेस कीं मी लहान दिसतें म्हणून—हें असं कसं ?"

आईच्या डोळ्यांत चटकन् पाणी आलें. डाव्या डोळ्यांतील टिपें पुशीत ती म्हणाली, "लोकांना तूं मोठी दिसत असशील, पण माझ्या डोळ्यांना तूं अजून

रांगतं मूल आहेस. घरच्या कामांत माझा हातभोंडा तूं–इथं सारं घरकाम करतेस–आईला त्रास होऊं नये म्हणून कष्टाचीं कामं मुद्दां करतेस ! पण परक्याच्या घरीं सासूनंणदांच्या जाचांत ह्या वयांत तुला कशी लोटूं ? लोक तोंड वर काढूं देत नाहींत खरं–पण म्हणतात ना 'ज्याचं जळे त्याला कळे'! माझं लग्न झालं त्या वेळीं मीही अशीच तुझ्याएवढी मुलगी होतें. माझ्या सासूबाई मोठ्या द्राष्ट होत्या. त्यांनीं केलेले माझे हाल आठवले म्हणजे असं वाटतं, कीं माझ्या मथूचं मुळीं लग्नच करूं नये ! पण जगाची रूढी आहे ना ? केव्हांना केव्हांतरी तुझं लग्न हें करावं लागणारच. आज तुला कांहीं समजत नाहीं. सासुसासऱ्यांचा जाच झाला तर तो सहन करण्याची तुला शक्ति नाहीं. आणखीन् एकाददुसरं वरीस गेलं तर तेवढाच तुला समज येईल. तोंपर्यंत थोडंबहुत घरकामाचं तेवढंच अधिक शिक्षण तुला मिळेल–आणि मग जाच झालाच तर तो कसा सहन करायचा एवढं कळण्याची बुद्धि तरी तुला येईल ! मथू, बाळ, मी खोटं बोलत नाहीं बरं. मला खरोखरच वाटतं, कीं तुझं अजून लग्नाचं वय झालं नाहीं."

आईचा कंठ दाटून आला. मलाहि गहिंवरल्यासारखें वाटत होतें, तरीही आला विचार तसाच दाबून मी आईला म्हटलें, "पण आई, अष्टवर्षा भवेत्कन्या असं बाबा त्या दिवशीं म्हणत होते आणि मला तर आतां अकरावं वरीस लागलं आहे."

तशाच रडक्या मुद्रेनें हंसत हंसत आई म्हणाली, "अष्टवर्षाच कां, कन्या म्हणूनच जन्माला आलीस आणि कन्या म्हणूनच हा देह तुला सोडायचा आहे."

बोलत असतांना तिनें जीभ चावली आणि वर नजर करून नमस्कार करून ती म्हणाली, "इडापिडा टळो, पाप अमंगळ पळो !"

आईच्या ह्या वर्तनाचा अर्थ मला कांहींच कळला नाहीं आणि तो विचारण्याचें धैर्यहि मला त्या वेळीं झालें नाहीं.

स्थळें पहाण्याचें काम मोठ्या जोरानें चालू होतें. रोज कुणीना कुणीतरी मला येऊन पाहून जात असे. इतकीं माणसें मला येऊन कां पहातात–हा प्रश्न वारंवार माझ्या मनांत येई. लग्नापूर्वी आधीं येऊन कुणीतरी मुलीला पहावें लागतें–हा आचार मला त्या वेळीं माहीत नव्हता. कुणीतरी मंडळी बाहेर यावी, ती येणार म्हणून आईनें मला नटवूनसजवून ठेवलेलें असावें, ती मंडळी येतांच बाबांनीं मला हांक मारावी, त्यांनीं विचारल्या प्रश्नांचीं मी नजर वर न करतांच भीतभीत उत्तरें द्यावीं आणि 'जा' म्हणतांच आंत जावें–हा एकटाकी क्रम सारखा सुरू होता !

एके दिवशीं मी बनीच्या घरीं गेलें होतें. गोंदूचे वडील त्यावेळीं बनीच्या घरीं आले होते—आणि मारे सर्वांची एकच गडबड उडाली होती! बनीच्या आईला "काय चाललं आहे?" म्हणून मी विचारलें त्या वेळीं ती म्हणाली, "आज बनीच्या लग्नाचा साखरपुडा व्हायचा आहे." मी दाराआडून डोकावून पाहूं लागलें. सर्व समारंभ पाहून ठेवला—म्हटलें उद्यां आपणावरही हा प्रसंग यायचा आहे, आपला पाहिलेला असावा! पाहुणेमंडळी निघून गेली. तोंपर्यंत बनीचें लग्न कोणाशीं ठरलें तें विचारण्याची मला बुद्धी झाली नाहीं. बनी घरांत येतांच मी तिला विचारलें, "बने, कुणाशीं लग्न ठरलं तुझं?" बनी फणकाऱ्यानें नाक मुरडून मला हातानें धक्का देत म्हणाली, "चल जा. माझ्याशीं बोलूं नकोस." ठरलेलें स्थळ बनीला आवडलें नसावें असा मी तिच्या मुद्रेवरून कयास बांधला. बनी उत्तर देत नाहीं असें पाहून मी तिच्या आईकडे वळलें आणि तिला विचारलें, "काकू, बनीचं कुठं ठरलं?" काकू आश्चर्यचकित होऊन म्हणाल्या, "म्हणजे? अजून नाहीं का तुला कळलं? अग, आपल्या लिमयांचा गोंदू आहे ना—तोच आतां बनीचा नवरा व्हायचा." मागलापुढला विचार न करतां मी म्हटलें, "कोण? तो बावळट गोंदू? तें ध्यान का बनीचे पतिराज होणार?" बनी जवळच उभी होती. माझ्या ह्या अविचाराच्या भाषणानें तिला संतापानें भिरभिरी आली आणि त्यासरशीं माझ्यापुढें आपले दोन्ही हात नाचवीत ती म्हणाली, "माझं आपलं बावळं ध्यान आहे तें बरं आहे—म्हातारा तर नाहीं ना?" बनीचे हे शब्द ऐकतांच बनीच्या आईनें तिला दटावलें. मला बनीच्या ह्या म्हणण्याचा अर्थ कांहींच कळला नाहीं. मी त्या तिरमिरीसरशीं धांवतच घरीं गेलें आणि आईच्या गळीं पडून रडूं लागलें. झालेली हकीकत आईला सांगितली, पण आईलाहि बनीच्या उद्गारांचा उलगडा करतां आला नाहीं!

हल्लींच्याप्रमाणें त्या वेळीं नवरामुलगा पहावयास येत नसे. नवऱ्याच्या बाजूचीं कुणीतरी कर्तीं माणसें यायचीं. तेव्हां पहायला येणाऱ्या व्यक्तीवरून नवऱ्यामुलाचें वय आईला कळणें शक्य नव्हतें. बाबा तरी आईला तपशीलवार कुठें काय सांगत असत? 'आज कुणी पहायला येणार आहेत' असें आईला बाबांनीं सांगायचें आणि आईनें मला सजवून ठेवायचें. मुलांमुलींच्या लग्नाच्या कामीं बायकांचा सल्ला घेण्याचा तो काळ नव्हता.

रात्रीं पुराण संपवून बाबा घरीं आले त्या वेळीं आईनें त्यांना विचारलें, "मथूच्या लग्नाचं कांहीं निश्चित झालं का?"

बाबा आश्चर्यचकित होऊन म्हणाले, " कां बरं ? आजपर्यंत लग्नाची गोष्ट काढली कीं तूं माघार घेत होतीस—आणि आज तुलाच एवढी कुठली स्फूर्ति आली ? "

आई हळूच हंसत म्हणाली, " नाहीं, तसं नाहीं कांहीं. मथूच्या लग्नाची मला कांहीं घाई झाली नाहीं—पण म्हटलं, एवढीं माणसं येऊन पाहून जातात त्यांतील कुणाच्याच पसंतीला का मथू उतरत नाहीं ? "

अगदीं पुराणिकाचा आव आणून बाबा म्हणाले, " ऐक, सांगतों. मथूचं लग्न आज बहुतेक ठरल्यासारखं झालंय. आतांच ठरलं म्हणेनास ! पुराणापूर्वीच ही भाषा झाली. उद्यां काय तें निश्चित होऊन परवां साखरपुडा होईल."

आई दचकली आणि क्षणभर अगदीं स्तम्भित झाली.

कसाबसा तिच्या तोंडांतून शब्द निघला, " कुठलं स्थळ ? "

बाबा हंसत हंसत म्हणाले, " स्थळ कांहीं तसं वाईट नाहीं. आपल्या तोलाचं आहे. नवरामुलगा मुम्बईला नोकर आहे. शम्भर रुपये पगार आहे बरं, शम्भर रुपये. उत्तमच स्थळ आहे म्हणेनास ! असं स्थळ शोधून मिळायचं नाहीं. आयतं चालून आलं..."

बाबांच्या मुद्रेवरून ते आईपासून कांहींतरी लपवीत आहेत असें स्पष्ट दिसत होतें. आई बाबांच्या चेहऱ्याकडे सारखी टक लावून पहात होती, पण तिच्या डोळ्याला डोळा देण्याचा धीर बाबांना होत नव्हता.

बाबांचें बोलणें पुरें होतांच आई म्हणाली, " गांव कोणतं त्याचं ? "

बाबांनीं उत्तर दिलें, " पुणं. "

आई एकदम दचकून म्हणाली, " इतक्या लांब का मुलीला द्यायची ? "

बाबा लाडिकपणानें हंसत हंसत म्हणाले, " लग्न झाल्यावर लांब काय आणि जवळ काय, दोन्ही सारखींच ! आणि लांब तरी कसलं ? इथनं रत्नागिरीला जायला जितका वेळ लागतो तितकाच पुण्याला जायला लागतो ! आणि पुण्याला तरी असं कुठं जायचं आहे ? कारण नवरामुलगा आहे मुंबईलाच. त्यांतूनही एव्हांच मुलीला सासरीं पाठवण्याबद्दल त्यांचा आग्रह नाहीं. "

आईनें कांचरत कांचरत विचारलें, " नवऱ्यामुलाचं वय काय आहे ? "

बाबा म्हणाले, " कां ? वयसं विचारलंस ? ऐक, तुला सांगतों, त्या शेजाऱ्या-पाजाऱ्यांचं बोलणं ऐकत जाऊं नकोस. मुलगा बिजवर आहे खरा, पण बिजवरपणाचा आपला नुसता डाग आहे त्याला ! "

आई मध्येंच म्हणाली, " शम्भर रुपये पगार म्हटला तेव्हांच मला वाटलं कीं नवरा बिजवर असला पाहिजे. पेन्शन केव्हां घेणार--पुढल्या वर्षी का ? "

आईचे डोळे इंगळासारखे लाल झाले होते. बाबा क्षणभर घाबरले, पण वेळींच सांवरून म्हणाले, " म्हणजे ? नवरामुलगा म्हातारा आहे असा आरोप करण्याचा तुझ्या म्हणण्याचा मथितार्थ दिसतो ! "

राग आवरून आई म्हणाली, " बिजवराखेरीज दुसरं स्थळ नव्हतं का मिळत ? "

बाबांनीं उत्तर दिलें, " पण पत्रिका जुळते आहे ना ? प्रथमवराचीं सर्व स्थळं पाहिलीं, पण एकही पत्रिका जुळत नाहीं. अजूनपर्यन्त तुला सांगितलं नव्हतं, आतां सांगतों ऐक. हिला मंगळ आहे. बिजवराला दिली तरच हिची कांहीं धडगत आहे. तरुणाला देऊन वैधव्य येण्यापेक्षां विधुराला देऊन सौभाग्य मिळवलेलं बरं नाहीं का ? "

एक दीर्घ निश्वास सोडून आई म्हणाली, " हरिची मर्जी ! "

मला हाताशीं धरून आई माजघरांत घेऊन गेली आणि आम्हीं उभयतांनीं अंथरुणावर अंग टाकलें.

कांहीं वेळानें बाबा खोलींत येऊन पोथी उघडून वाचीत बसले. मला झोंप कुठली यायला ! मी नुसते डोळे मिटले होते. मधूनमधून किलकिले डोळे करून बाबांकडे पहात होतें. नित्याप्रमाणें संहिता वाचून नन्तर अर्थ सांगण्याचें बाबांनीं आज टाळलें. तोंडांतल्या तोंडांत पुटपुटत ते नुसती संहिता वाचीत होते. आई अंथरुणांत उठून बसली आणि म्हणाली, " आज अर्थ नाहीं का सांगायचा ? "

हातांतील पोथीचें पान खालीं टाकून बाबा म्हणाले, " काय करूं ? कुठंच लक्ष लागत नाहीं. पोरीचं लग्न जुळवून आलों खरा, पण पुन्हां पुन्हां मनांत भलभलते विचार येतात. जगाच्या रहाटीकडे लक्ष दिलं तर म्हाताऱ्यांच्या द्वितीय किंवा तृतीय संबंधाच्या बायकासुद्धां कर्त्यासवर्त्या होऊन अहेवपणानं गेलेल्या आपल्या समोर दिसत आहेत ! उलटपक्षीं वय पाहून केलेलीं लग्नंही दुःखकारक झालीं आहेत ! आतां हेंच पहा. आज बनीचं लग्न ठरलं. कुणाशीं तें कळलं का ? गोंदूशीं !

उघड्या डोळ्यांनीं बावळ्या मुलाला मुलगी देतांना तिच्या बापाला कांहींच वाटलं नाहीं ! पण तोच माणूस मथीचं लग्न बिजवराशीं ठरवलं म्हणून मला दोष देतो !—असं हें चाललं आहे. ”

बाबा क्षणभर स्तब्ध बसलेले पाहून आई म्हणाली, “ बनीचं लग्न गोंदूशीं ठरलं म्हणून मथीला बिजवराला का द्यायची ? गोंदू बावळा असला–नव्हे, मी म्हणतें–अगदीं वेडा असला, तरी दोघांच्या वयांत फरक नाहीं ना ? रागवायचं नाहीं म्हटलं–वय काय आहे नवऱ्यामुलाचं ? ”

बाबा एकदम म्हणाले, “ खरं म्हणशील तर मला नवऱ्यामुलाचं वय किती आहे तें मुळींच माहीत नाहीं. आपल्या भिकंभटजीनंच स्थळ दाखवून दिलं. नवरामुलगा त्याचा आतेभाऊ आहे. भिकंभटजी अयोग्य स्थळ दाखवतील असं मी तरी कसं म्हणूं ! ”

आई एकदम खोंचून म्हणाली, “ पण तो त्यांचा आतेभाऊ आहे ! ”

बाबा म्हणाले, “ खरं आहे. पण त्यांना नाहीं का कांहीं काळजी ? ”

आई तिरस्कारानें हंसून म्हणाली, “ मुलीची काळजी कोण वहातं आहे हल्लींच्या काळांत ? आपलं एकदाचं लग्न झालं म्हणजे झालं. त्यांतून आपण गरीब माणसं, हुंड्यापांड्याचं जुळवतांना नाकीं नऊ यायचे. मुलीचं वय लग्नाचं झालेलं. लोकं बाहेर तोंड काढूं देत नाहींत. मी आपली डोळेझांक करण्याचा प्रयत्न करीत होतें, पण शेजाऱ्यापाजाऱ्यांचीं कुजकीं बोलणीं सहन करायचीं तरी कुठवर ? एकादा गरीब भिक्षुकाचा मुलगा पाहून जरी दिली असती तरी माझं कांहीं म्हणणं नव्हतं. पण बिजवर म्हटला कीं पोटांत अगदीं धस्स होतं ! ”

आईच्या डोळ्यांना टचकन् पाणी आलें. बाबांची नजर सहज तिच्या चेहऱ्याकडे गेली आणि त्यांनाही गहिंवर आल्यासारखा दिसला. बाबा आईचें सांत्वन करण्याच्या रोखानें म्हणाले, “ माझी तरी तीच इच्छा होती, पण ही पत्रिका आडवी येते ना ! मंगळाचा मुलगा मिळणं किती कठीण असतं ह्याची कल्पना तुला यायची नाहीं. आजपर्यंत मी किती पत्रिका पाहिल्या ! पण मथूच्या पत्रिकेशीं जुळेल अशी ही पहिलीच पत्रिका आढळली. अगदीं छत्तीस गुण जुळताहेत बरं. ऐकलंस ? माझ्यावर विश्वास ठेव. पत्रिकेंतील योग फारच उत्तम आहे. दोघांचं कधींही वितुष्ट यायचं नाहीं. अगदीं मंगळाला मंगळ, शनीला शनी, गुरूला गुरु

कसे अगदीं हात जुळवून बसले आहेत. आतां जास्त विचार करूं नकोस. देवावर भरिभार ठेवून मुलीच्या डोक्यावर अक्षता टाकूं. पुढं तिचं नशीब आणि ती!"

पोथी गुंडाळून बाबा खोलीबाहेर निघून गेले. आई तशीच बसून राहिली होती. खोलीच्या कोपऱ्यांत समई मिणमिण तेवत होती. आईच्या डोळ्यांतील एक अश्रु-बिन्दु माझ्या गालावर पडला. मी उशीवरून डोळे उघडून आईकडे पाहिलें. इतक्यांत आईचीही नजर माझ्याकडे वळली. आईच्या डोळ्यांतून सारख्या अश्रु-धारा चालल्या होत्या. ती रडत नव्हती, हुंदके देत नव्हती—नुसतीं तिच्या डोळ्यांतून आसवें वहात होतीं, एवढेंच. माझी नजर तिच्या नजरेला खिळलेली पहातांच माझ्या मस्तकावर हळूच हात ठेवून ती म्हणाली, "जागी होतीस वाटतं?"

'होय' म्हणावें कीं 'नाहीं' म्हणावें ह्याचा एक क्षणभरच मला विचार पडला. एकदां अगदीं जोराचा विचार आला, कीं अगदीं साफ नाहीं म्हणून सांगावें—पण, आई म्हणाली, "खोटं बोलावं असं वाटतंय वाटतं? तूं सांगितलं नाहींस तरी मला कळलं आहे—तूं जागी होतीस. ऐकलंस ना! तुला एवढ्याशा पोरीला काय सांगूं? पण मथू, मला तुझी पुढं धडगत दिसत नाहीं. अंतरांतून देव बोलतो आहे, कीं मथूच्या कपाळीं पुढं सुख नाहीं. जसं व्हायचं असेल तसं होईल. आतांच म्हणायचं झालं ना? देवावर भरिभार ठेवून तुझ्या डोक्यावर अक्षता टाकायच्या—एवढंच."

मला एक जोराचा हुंदका आला आणि मी ओक्साबोक्शीं रडूं लागलें. मी कां रडत होतें तें माझें मलाच कळत नव्हतें. पुढलें सुख काय आणि दुःख काय, ह्याची मला यत्किंचितही कल्पना नव्हती. बिजवर म्हणजे काय हेंही मला कळलें नव्हतें! पण बनीनें दुपारीं मारलेला टोमणा मात्र माझ्या ध्यानांतून गेला नव्हता. मनांत आलेली शंका निरसन करून घेण्यासाठीं मी आईला विचारलें, "बिजवर म्हणजे म्हातारा का ग?"

माझ्या ह्या प्रश्नानें आईला जरी हुंदका आला नाहीं तरी तिचे ओंठ क्षणभर थरारले. माझ्या मस्तकावरून मायेचा हात हळुहळू फिरवीत ती म्हणाली, "असंच काहीं नाहीं." मी पुन्हां विचारलें, "म्हातारा म्हणजे भिकंभटजी एवढा का?" भिकंभटजीचें वय त्यावेळीं साठ वर्षांचें होतें. त्यांच्या शेंडीचा एकही केंस काळा राहिला नव्हता. तोंडांतल्या बहुतेक दातांनीं रजा घेतली होती. तें ध्यान नजरेसमोर आल्यामुळें आईच्या चेहऱ्यावर क्षणभर

स्मित हास्य झळकलें ! ती म्हणाली, " तूं आतां ऐकलंस ना ? तिकडेही कांहीं माहीत नाहीं. मग मला कुठून कळणार ? "

मी पुन्हां विचार करीत राहिलें. नाहीं नाहीं त्या कल्पना माझ्या नजरेसमोर उभ्या राहूं लागल्या. जागेपणींच स्वप्नें पडूं लागलीं आणि भेवडावणाऱ्या मूर्ति माझ्या नजरेसमोर नाचूं लागल्या. मी बिछान्यांतून ताडकन् उठलें आणि आईच्या गळ्याला मिठी मारली. अजूनपर्यंत आवरलेला हुंदका एकदम बाहेर पडला आणि आईही ओक्साबोक्शीं रडूं लागली. गळ्यांत गळा घालून आम्ही दोघीही मनमुराद रडलों. रडण्याचा भर थोडासा ओसरतांच त्या तसल्याच रडक्या शब्दांनीं मी आईला विचारलें, " आई ग, म्हाताऱ्याशीं लग्न झाल्यानं काय होतं ? "

आईला पुन्हां एक जोराचा हुंदका आला. क्षणभर तो हुंदका आंवरून आई म्हणाली, " म्हाताऱ्याशीं लग्न केल्यानं काय होतं ? लग्न म्हणजे काय हेंच जिथं तुला कळत नाहीं तिथं म्हाताऱ्याशीं लग्न कुठलं करणार ? असं पहा मथे, आतांपर्यंत ऐकलंस तेवढं सर्व विसरून जा आणि जें कांहीं होईल तेवढं मुकाट्यानं पहात रहा."

आई बोलतां बोलतां मध्येंच थांबली. बळेंच तिनें मला बिछान्यावर दाबून निजवलें आणि दिवा मालवून ती माझ्या शेजारीं येऊन आडवी झाली. किती तरी वेळ मी अंथरुणावर मुसमुसत पडलें होतें. आईलाहि झोंप लागली नव्हती असें मला वाटलें, पण नंतर त्या रात्रीं आम्हीं एकमेकींशीं कांहीं बोललों नाहीं. माझ्या डोक्यांत सारखें विचारांचें काहूर सुरू होतें. त्या विचारांना कांहीं थांगपत्ता नव्हता. ते अननुभवी आणि अप्रबुद्ध अशा अकरा वर्षांच्या मुलीचे विचार होते. म्हाताऱ्याशीं लग्न म्हणजे कांहीं तरी एक भयंकर गोष्ट—अशी कल्पना करून मी विचारांची मांडणी करीत होतें आणि त्या असंबद्ध विचार-सरणीला तितकेंच असंबद्ध असे निरनिराळे फांटे फुटत होते. ते फांटे जर आज मला सांगतां आले असते तर त्यांची एक स्वतंत्र कादंबरीच झाली असती—इतक्या भरारीनें आणि इतक्या अविचारानें माझ्या विचारांना कल्पनात्मक दृश्य स्वरूपें येत होतीं आणि त्या दृश्य स्वरूपांच्या भेवडावणीनें घाबरून मी आपल्याशींच चूर होऊन जात होतें ! त्यांतच माझा डोळा लागला आणि त्या कल्पनातरंगांना भयानक स्वप्नांचें स्वरूप प्राप्त झालें. त्या भयानक स्वप्नांची आठवण झाली तरीही

माझ्या अंगावर आज शहारे उभे रहातात. त्या स्वप्नांचीं वर्णनें मी येथें देत नाहीं, कारण त्यांच्या नुसत्या आठवणीनेंही माझ्या हृदयाला अद्याप थरकांप सुटतो !

शेवटीं जें व्हायचें तें झालें. माझें लग्न झालें आणि तें एका म्हाताऱ्याशींच झालें. माझ्या पतिराजांचें वय सुमारें बावन वर्षांचें होतें. माझ्या पतिराजांना पहिल्या पत्नीची एकच मुलगी होती पण ती लग्नाच्या वेळीं आली नव्हती. बिजवराचें लग्न असल्यामुळें विशेषसा गाजावाजा न करतां लग्नसमारंभ उरकून घेण्यांत आला होता. माझें म्हाताऱ्याशींच लग्न होणार हें लग्नापूर्वी जरी मला कळून चुकलें होतें तरी अंतरपट दूर होतांच जें दृश्य माझ्या समोर दिसलें, त्यानें माझ्या हृदयाचें पाणी झालें ! एका मुंगीला तिचें हिमालयपर्वताशीं लग्न लागल्यावर जें कांहीं वाटलें असतें तशीच कांहींशी कल्पना त्या वेळीं माझ्या हृदयांत उभी राहिली. मला भीति वाटली खरी पण माझ्या डोळ्यांतून आसूं आलें नाहीं. लग्नाच्या विधींतून मी अगदीं सायसंगीन पार पडलें. लाजाहोमाच्या वेळीं अग्नीला लाह्यांची आहुती देत असतांना मंडपाच्या बाहेर कुणी तरी म्हटलें, ‘ पोरीच्या कपाळीं वैधव्य खास ठेवलेलं आहे.’ त्या वैधव्य शब्दाचा अर्थ मला त्या वेळीं कळला नाहीं. सप्तपदीचा विधी होत असतांना माझ्या कानींकपाळीं ‘ वैधव्य ’ हा एकच शब्द ऐकूं येत होता ! कुणी कांहीं बोललें तरी तो माझ्या वैधव्याविषयींच बोलत आहे असा मला भास होई. लग्नाची शेवटची गांठ बसतांना वैधव्याची जाणीव माझ्या हृदयांत उत्पन्न झाली. वैधव्याच्या जाणिवेनेंच माझ्या नव्या संसाराला सुरवात झाली. तें वैधव्य किती दुर्धर असतें ह्याची त्यावेळीं मला यत्किंचितही कल्पना नव्हती !

# प्रकरण तिसरें — ताई कीं आई ?

लग्नानन्तर मला आईच्या आग्रहावरून सासरीं नेण्यांत आलें नाहीं. माझें लग्न झाल्या वेळीं आईनें आपल्या मनाची चलबिचल कोठल्याही रीतीनें बाहेर दाखवली नाहीं. शेजारीपाजारी आपापल्या परीनें आपसांत बोलूनबोलून माझ्या लग्नाबद्दल टवाळी करीत होते ! माझे पतिराज माझ्या बाबांच्यापेक्षांही दहाबारा वर्षांनीं वडील होते, ह्या एकाच गोष्टीची थट्टा करून बाबांच्या बरोबरीची मंडळी त्यांना परोपरीनें खिजवीत होती. बाबांही त्यांचें तें खिजवणें हंसण्यावारीच नेत होते. अशा वेळीं हंसतांना त्यांचा तो झालेला केविलवाणा चेहरा पाहून हंसावें कीं रडावें हेंही मला कळेनासें होत असे.

माझें लग्न म्हणजे त्या लहानशा खेड्यांत एक चर्चेचा विषयच होऊन बसलें होतें. देवळांत जा, पाणवठ्यावर जा, शेतवाडींत जा–कुठेंही जा, विषय एकच–मथूचें लग्न ! गांवच्या महाराची बायकोसुद्धां लग्नाची वाडी नेण्यासाठीं आली; त्या वेळीं माझ्या आईला म्हणाली,

" भटणी, हें काय केलंस ? "

त्या महारणीच्या प्रश्नानें मात्र आईच्या डोळ्यांना पाणी आलें. तो पक्वान्नाचा घांस तिनें घेऊन जाण्यासाठीं अंगणाच्या बाहेर ठेवतांना आईच्या डोळ्यांतील आंसवांनीं ओला झाला !

त्या दिवसापासून बाबांचें आणि आईचें परस्पराशीं बोलणें बहुतेक वर्ज झाल्यासारखें झालें. आईच्या कठोर दृष्टीला नुसता डोळाही देण्याची बाबांना छाती होत नव्हती. अंगभर दागिने घालून हळदीच्या अंगानें मी घरभर मिरवत होतें, पण ज्या वेळीं बाबांची माझ्यावर दृष्टी जाई त्या त्या वेळीं अंगावर शहारे आल्यासारखें करून ते माझ्याकडून दृष्टी फिरवीत. आईशीं बोलतांना देखील नुसतें ' जेवण झालं का ' किंवा ' जरा पाणी दे ' ह्याच्यापेक्षां दुसरे कोणतेही शब्द त्यांच्या तोंडून निघत नव्हते. कुणीच कुणाशीं बोलत नव्हतें. ह्या मंगलकार्यानन्तर घरावर एक प्रकारची अमंगळ अवकळा आल्यासारखी झाली होती ! आईनें नुसतें मला 'मथे' म्हणूनसुद्धां ह्या दिवसांत हांक मारली नाहीं. अशा ह्या वागणुकीमुळें एकएक

दिवस मला युगासारखा भासत होता. शेजारघरीं जाण्याची देखील चोरी-कोण काय बोलेल ह्याची उगीच आपली भीति वाटायची !

ह्या असल्या कंटाळवाण्या जिण्याचा कंटाळा आल्यामुळें मी एके दिवशीं बनीच्या घरीं गेलें. त्यावेळीं बनीचें लग्न झालें नव्हतें. बनीच्या घरीं लग्नाची मोरे जय्यत तयारी चालली होती. सांडगेपापड घालण्याच्या गडबडींत बनीही स्वतः मिसळली होती. मी येत असलेली पहातांच हातचा पोळपाट दूर लोटून बनी चटकन् उभी राहिली आणि म्हणाली, “या आजीबाई !”

मला मेल्याहून मेल्यासारखें झालें. बनीची आईही कांहीं कमी नव्हती. बनीला दाबण्याच्या मिषानें ती म्हणाली, “बने, वडील माणसांना असं टाकून बोलूं नये !” बनी धांवतच गेली आणि तिनें एक पाट आणून मला बसायला दिला. बसावें कीं न बसावें ह्याचा विचार करीत मी तशीच उभी राहिलें होतें. जमलेली मंडळी माझ्याकडे पाहून आपसांत फिदीफिदी हंसत होती. त्यांतील एक बाई म्हणाली, “बाकी अंगावर दागिने भरगच्च घातले आहेत हो. रखमाकाकूंना ते अगदीं बेताचे होत असत. मी ते पाहिले होते–पण हिच्या गळ्याला तिची सरी मोठीच दिसते, नव्हे का ?” दुसरी बाई म्हणाली, “हो. असं वाटतं खरं पण किती दिवस अंगावर रहातात तेंच आतां पहायचं !” बनी मोठमोठ्यानें हंसत म्हणाली, “चार दोन वर्षं तरी भीति नाहीं !” त्या वेळीं बनीची आई म्हणाली, “कुणी सांगावं ? त्यांना मधुमेह आहे म्हणे. गेलीं तर चार दोन काय, चौदाही वर्षं जातील. नाहीं तर चार महिन्यांचीसुद्धां खात्री देतां यायची नाहीं. बस ना मथू–उभी कां राहिलीस ?” मी खालीं बसलें पण कां बसलें हें माझें मलाच कळेना ! सर्वांनीं माझ्याकडे पाठ फिरवली आणि पापड लाटण्यास आरंभ केला. मला अगदीं चुकल्या चुकल्यासारखें झालें. मी बनीच्या आईला म्हटलें, “एक पोळपाट द्या माझ्याकडे मी चार पापड लाटतें.” त्या वेळीं असा कांहीं विलक्षण चेहरा करून बनीची आई म्हणाली, “आतां पोळपाटच आहे तुझ्या कपाळीं ! मीच कशाला तुझ्या हातीं देऊं तो !” ते तिचे शब्द माझ्या काळजांत सुरी खुपसल्यासारखे घुसले. त्या शब्दांचा अर्थ त्यावेळीं मला कळला नाहीं पण तें वाक्य तिनें कांहींतरी भयानक अर्थानें उच्चारलें ही जाणीव मला झाल्यावांचून राहिली नाहीं !

कुणीच माझ्याकडे लक्ष देत नाहीं असें पाहून मी हळूच उठलें आणि जाऊं लागलें. मी जात असतांना माझ्या पायांतील तोरड्यांचा आवाज झाला. त्या आवाजासरशीं चटकन् बसल्या जागींच मागें वळून बनी मला म्हणाली, " चाललांत कां आजीबाई ! जरा थांबा. कुंकूं लावतें." कुंकूं लावतें असें ती म्हणाली खरी पण बसल्या जागेवरून उठली नाहीं ! ती कुंकूं लावणार म्हणून मी वाट पहात तशीच उभी राहिलें. कुणीच मला कुंकूं लावण्यासाठीं उठत नाहीं असें पाहून मी जाण्याकरितां दरवाज्याकडे वळले. सौभाग्यलेणें नाकारून मी जात आहें ही कल्पना मनांत येतांच माझे पाय जागच्या जागींच खिळून राहिले. माझी ती केविलवाणी स्थिति तिथें जमलेल्या एका वृद्ध बाईच्या नजरेला आली. हातांतील पापड तसाच टाकून ती उठली आणि घरांत जाऊन कुंकवाचा करंडा आणून तिनें मला कुंकू लावलें. घरांत जातां जातां ती आपल्याशींच पुटपुटली, " काय तरी विचित्र माणसं आहेत ! "

मी धांवतच घरीं गेले आणि बिछान्यावर अंग टाकून ओक्साबोक्शीं रडूं लागलें. जवळच आई भिंतीशीं टेंकून वाती करीत बसली होती, पण तिच्याकडेही माझें लक्ष गेलें नाहीं. बसल्या जागेवरूनच न उठतां आई म्हणाली, " मथू, बाळ, काय झालं ? " आईचे शब्द ऐकतांच मला एक जोराचा हुंदका आला आणि मी जोरजोरानें रडूं लागलें. आई बसल्या जागेवरून उठली, माझ्याजवळ आली, तिनें मला उचलून जवळ घेतलें आणि माझे डोळे पुसण्यास सुरवात केली. माझें रडें कांहीं केल्या थांबत नव्हतें. आईनें पुन्हां विचारलें, " काय झालं, बाळ ! "

मी झालेली हकीकत आईला सांगूं लागलें. हकीकत सांगत असतांना मला मधूनमधून हुंदके येत होते आणि त्यामुळें माझें बोलणें आईला धड कळतही नव्हतें ! आई म्हणाली, " थांब, एव्हां कांहींच सांगूं नकोस. "

मी तशीच आईच्या कुशींत मान घालून रडरड रडत होतें ! आईलाहि एक हुंदका आलेला मला ऐकूं आला. मी मान वर करून आईच्या तोंडाकडे पाहिलें तों तिच्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा चालल्या होत्या. मी आईला म्हटलें, " ऐक आई, आतां सांगतें. " आई दांतओंठ चावून हुंदका गिळून मला म्हणाली, " कांहीं सांगूं नकोस. मला कळलं–सर्व कांहीं कळलं. अगदीं तूं सांगितल्याशिवाय कळलं. " मी थोडा वेळ विचार करून आईला म्हटलें,

" कपाळीं पोळपाट आहे म्हणजे काय ग आई ? "

ते शब्द मात्र ऐकतांच आईचें दुःख अनावर झालें. तिनें बिछान्यावर अंग टाकलें आणि तिच्या आसवांनीं सारा बिछाना भिजून गेला. मी काय चूक केली हें माझें मलाच कळेना. ह्या प्रश्नांत असें भयंकर काय होतें ? कपाळीं पोळपाट येणें हें जर भयंकर असलें तर बनीची आई ते तसले शब्द मला कशी बोलली ? माझें मस्तक अगदीं भणभणूं लागलें. तितक्यांत आई उठून बसली आणि मला म्हणाली, "मथू, आतां ह्यापुढं कधींच कुणाच्या घरीं जाऊं नकोस. ह्या माणसांना मुळींच तर्क नसतो. लहान पोरीच्या समोर काय बोलावं एवढं तरी कसं ह्यांना कळत नाहीं ? एरव्हीं बनीला काय कळणारं होतं ? वडील माणसं बोलतात म्हणूनच हीं मुलं असल्या भाषेंत तरबेज होतात ! ऐकलंस मथू, आतां कधींच कुणाच्या घरीं जाऊं नकोस. तुला माझी शपथ आहे." एवढें बोलून आई गंभीरपणानें उठली आणि पुन्हां दाराशीं टेकून बसून वाती वळूं लागली.

मी तशीच बिछान्यावर पडून राहिलें होतें. लग्न झालेल्या मुली अंगावर चार दागिने घालून इकडे तिकडे मिरवित असतात हें मी पहिलें होतें. म्हाताऱ्याशीं माझें लग्न झालें आहे ही कल्पना विसरून त्या चार मुलींप्रमाणें आपणही इकडे तिकडे मिरवावें, म्हणूनच मी आज घराबाहेर पडलें होतें--पण पहिल्याच दिवशीं ही जबर ठेंच लागली ! लग्न झाल्याबरोबर जर चार पोरीबाळींत मिरवायचें नाहीं तर तें लग्न होणें तरी कशाला ? त्यापेक्षां मुळीं माझें लग्नच केलें नसतें तर ! लग्न झालें नव्हतें त्या वेळीं मी उजळ माथ्यानें घराबाहेर हिंडत होतें--पण आतां हें लग्न झालें आणि बाहेरची दिशाहि वर्ज्य झाली. माझें लग्न झालें नसतें तर काय झालें असतें ? हा एकच विचार पुन्हां पुन्हां माझ्या मनांत घोळूं लागला. तो विचार आवरण्याचा मी प्रयत्न केला पण फिरून फिरून तेच शब्द माझ्या कानांत घुमूं लागले ! हा प्रश्न विचारूं नये असें एकदां वाटे पण अगदीं नकळत माझ्या तोंडून शब्द गेले,

"आई, माझं लग्न झालं नसतं तर काय झालं असतं ?"

आई एकदम दचकली आणि तारवटलेल्या डोळ्यांनीं माझ्याकडे पहात राहिली. हळूहळू तिच्या तोंडांतून शब्द बाहेर निघाले, "काय झालं असतं तें जर आम्हां बायकांना कळत असतं तर संसारांतलीं अर्धी अधिक दुःखं नाहींशीं झालीं असतीं." आईच्या ह्या बोलण्याचा अर्थ मला कांहींच कळला नाहीं. मी तशीच

विचार करीत बिछान्यावर पडलें होतें–आणि विचार करतां करतांच माझा डोळा लागला.

मी जागी झालें तेव्हां कातरवेळ झाली होती. आई खोलींत नव्हती. मी उठून बिछान्यांत बसलें तोंच आईनें खोलींत येऊन दिवा लावला. मला बिछान्यांत उठून बसलेली पहातांच आई म्हणाली, "जा, तोंड धुऊन डोळ्यांना पाणी लावून ये."

मी तशीच उठून परसदारीं गेलें. परत येतें तों बाबा आणि आई बोलत बसलीं होतीं. मी तेथेंच थबकलें. पुढें जावें कीं न जावें ह्याचा मनाशीं विचार करीत होतें तोंच आईचे शब्द कानीं पडले: "पुण्याहून जर पत्र आलं आहे तर मथूला पोंचती करावीच सासरीं." बाबा म्हणाले, "जशी मर्जी. पण गोपाळ-भटजी म्हणत होते कीं बनीचं लग्न होईपर्यंत मथूला सासरीं पाठवूं नका म्हणून." आई अगदीं निश्चयाच्या स्वरानें म्हणाली, "आपल्याला काय करायचं आहे बनीच्या लग्नाशीं ? आपलं जिथलं माणून तिथं असलेलं बरं."

दुसऱ्या दिवशीं मला घेऊन बाबा दाभोळ बंदरांत बोटीवर चढले. घराच्या बाहेरचा असा हा माझा पहिलाच प्रवास. त्या एवढ्या लहानशा बोटीवर चढतांना देखील मी भेदरून गेलें ! आम्ही मुंबईला आलों आणि मुंबईचें तें अजस्र स्वरूप पाहून मी अगदीं भांबावून गेलें.

मुंबई पाहिल्याचा त्या वेळचा परिणाम जर आज मी लिहूं लागलें तर पानांवर पानें भरतील ! कोंकणांतून मुंबईला येणाऱ्या प्रत्येक मुलीला तो सांगोपांग अवगत आहे, तेव्हां त्याचें इथें पुन्हां वर्णन कशाला करूं ? एक दिवस मुंबईला राहून दुसऱ्याच दिवशीं आम्हीं पुण्याला गेलों. मुंबईला आम्हीं 'आमच्या घरीं' राहिलों नव्हतों. बाबांच्या एका स्नेह्याच्या घरीं राहिलों होतों. पुण्यास आमचें घर सदाशिवपेठेंत होतें. कोंकणांतून पुण्यास आल्याचा जो परिणाम माझ्या मनावर व्हायचा तो झालाच ! मी कुणी तरी एक क्षुद्र कीटक आहें आणि उच्च कोटींतील जीवांत येऊन पडलें आहें असें वाटलें.–असें मला वाटलें म्हणण्या-पेक्षां ते उच्च कोटींतील सर्व जीव मी एक क्षुद्र कीटक आहें ह्याची पदोपदीं मला जाणीव करून देत होते ! अगदीं पहिल्यानेंच घरांत पाऊल टाकतांच एक माझ्या वयाची धिटुकली मुलगी एकदम पुढें आली आणि म्हणाली,

"आलं कोंकणचं ध्यान !"

ही मुलगी माझी पुतणी होती. हे तिचे शब्द ऐकतांच मी ओशाळून गेलें! तितक्यांत एक गंभीर आणि पोक्त दिसणारी बाई पुढें आली आणि त्या मुलीला म्हणाली, "लीले, कुणाला म्हणतेस—आठवण आहे का? आणि मी देखील कोंकणची आहें हें देखील विसरलीस वाटतं?"

त्या बाईच्या शब्दांत मूर्तिमंत गंभीरपणा होता. तिला पहातांच मला माझ्या आईची आठवण झाली. तिच्या मुद्रेंत आणि माझ्या आईच्या मुद्रेंत इतकें कांहीं विलक्षण साम्य होतें कीं तिला पहातांच धांवत जाऊन तिच्या गळयाला मिठी मारावी असें मला वाटूं लागलें.

लीला तोंड मुरडून म्हणाली, "मोठी आलीय आईचा पडप घेणारी!"

मी अगदीं स्तंभित झालें. ही माझी सावत्र मुलगी का? जिला पहातांच माझें हृदय वात्सल्यानें भरून आलें, आई म्हणून जिच्या गळयाला मिठी मारावी असें मला वाटलें—ती माझी मुलगी? मी एवढीशी पोर तिची आई? काय हे दैवाचे खेळ!

लीला त्या माझ्या मुलीकडे वळून म्हणाली, "कां ताईसाहेब, आतां आई-साहेबांना घरांत कडेवरून नेणार कीं खांद्यावरून नेणार?"

माझ्या मुलीचा चेहरा गोरामोरा झाला. तिनें माझा हात धरला आणि माजघरा-पलिकडल्या खोलींत मला नेलें.

खोलींत जातांच माझा धीर सुटला. माझी इच्छा नसतांही मला रडें कोसळूं लागलें. मी ताईच्या डोळयांकडे पाहूं लागलें. तिच्याही डोळयांतून आसवें वाहूं लागलीं. मी मटकन् खालीं बसलें आणि गुडघ्यांत डोकें खुपसून रडूं लागलें. ताई माझ्याजवळ आली आणि हळूहळू माझ्या पाठीवरून हात फिरवूं लागली. तिच्या हाताचा तो स्पर्श मला अगदीं माझ्या आईच्या हाताच्या स्पर्शासारखा वाटला. माझ्या पाठीवरून हात फिरवीत ती म्हणाली, "असं काय बरं माई? भरल्या घरांत आल्यावेळीं असं रडूं नये."

माई! माई!! ते शब्द मला किती भयंकर वाटले हें कोणत्या शब्दांनीं सांगूं?

मी चटकन् मागें वळलें. तिची स्निग्ध दृष्टी पाहून मला आशेचा भरवंसा आला. मी चटकन् तिच्या गळयाभोंवतीं हात घातला आणि रडायला सुरवात केली.

" उगी, उगी, असं काय रडावं तें ! " असें म्हणून ती माझी समजूत घालीत होती.

मी म्हटलें, " तुम्हांला पहातांच मला माझ्या आईची आठवण झाली–म्हणून मला रडूं आलं तें ! "

हळूहळू हंसत ती मला म्हणाली, " मला तुम्ही म्हणायचं नाहीं. मी तुम्हांला तुम्हीं म्हणायचं आणि तुम्हीं मला तूं म्हणायचं. "

मी म्हटलं, " छेः गडे, ताई म्हणायच्या ऐवजीं आईच म्हणावंसं वाटतं मला."

माझे ते शब्द ऐकून ती हंसली कीं रडली–हें अजूनही मला सांगतां यायचं नाहीं. मी पुन्हां म्हटलें, " तुम्हांला पाहिलं कीं मला आईची आठवण होते आणि त्या तुम्ही मला अहो जाहो म्हणणार ? नाहीं गडे, हें कसं अगदीं परक्या परक्यासारखं वाटतं. तें तसलं कांहीं नको. तुम्हीं आपलं मला मथूच म्हणत जा–आणि मीही तुम्हांला नुसतं ताईच म्हणत जाईन. "

माझ्या ह्या बोलण्यानें तिला गुदगुल्या झाल्यासारख्या वाटल्या. माझ्या हनुवटीला हात लावून तिनें माझें तोंड वर केलें, क्षणभर माझ्या चेहऱ्याकडे ती पहात राहिली आणि नंतर म्हणाली, " कुणीच कुणाला अहो जाहो म्हणायचं नाहीं–आणि मी माई म्हटलं म्हणून काय झालं ? माझी एक मुलगी होती, अगदीं तुझ्याच एवढी मुलगी होती, तिला आम्हीं माईच म्हणत असूं. माझी माईच फिरून लाभली असंच मी समजेन. " बोलत असतांना तिच्या डोळ्यांतून घळघळ पाणी वाहूं लागलें. मी आश्चर्यानें विचारलें, " म्हणजे ? "

" आमची एक माई होती, पण आतां कुणीच नाहीं. तिच्या मागलींही दोन भावंडं पाठोपाठ गेलीं. तुला पाहिलं आणि तेव्हांपासूनच वाटलं कीं माझी माई फिरून आली."

इतक्यांत दाराबाहेरून आवाज ऐकूं आला :

" मायलेकींचीं खलबतं एवढ्यांतच सुरू झालीं वाटतं ? "

त्या आवाजामागोमाग तितक्याच कठोर चेहऱ्याची एक वृद्ध बाई येऊन दाराला हात धरून उभी राहिली. ताईवर एवढाला एकेक डोळा करून ती वृद्ध बाई म्हणाली, " ती एक नवीन, पण गोदे, तुला तरी अकल आहे कीं नाहीं ? आधीं आल्याबरोबर देवाला नमस्कार करायचा नाहीं का ? "

ताई हळूच माझ्या कानाशीं वळून म्हणाली, " त्यांना नमस्कार कर." मी नमस्कार करतांच त्या बाईनें अगदीं रुक्ष आवाजांत मला आशिर्वाद दिला आणि 'चल देवघरांत' म्हणून ती एकदम माझ्या अंगावर खेंकसली. देवघरांत कुठून जायचें हें तरी मला कुठें माहित होतें! माझी अडचण ताईच्या ध्यानीं आली आणि ती दाराबाहेर होऊन 'असं इकडून या' असें मला म्हणाली.

मी तिच्या मागोमाग देवघरांत गेलें, देवाला नमस्कार केला आणि देवघराच्या-बाहेर आलें तोंच एक गृहस्थ वाटेंतच उभे राहिलेले मला दिसले. माई माझ्या कानांशीं लागून म्हणाली, "हे नानासाहेब, तुझे धाकटे दीर." मी जाऊन त्यांना नमस्कार केला. मी नमस्कार करतांच ते दोन पावलें मागें हटले आणि म्हणाले, "अरेरे! हें काय? तुम्ही मला नमस्कार करायचा नाहीं. तुम्ही वडील माणसं–आम्हीं तुम्हांला नमस्कार करायचा!"–आणि असें म्हणून त्यांनी मला नमस्कार केलाही! मी अगदीं ओशाळून गेलें. ते खी खी हंसत ताईकडे वळून म्हणाले, "केव्हां आल्या वहिनीसाहेब? पहांटेच्या गाडीनं वाटतं? मला गेलं पाहिजे होतं स्टेशनवर–पण काय करणार, काल केसरीचा दिवस, सकाळीं केसरी बाहेर पडला त्या वेळीं आम्हीं बाहेर निघालों. त्यांत हल्लीं दादासाहेबांची केस चालली आहे. कांहीं विचारूं नका. अगदीं डोकं वर काढायला वेळ मिळत नाहीं. आणिबाणीची वेळ आहे बरं गोदे, मोठी आणि-बाणीची वेळ आहे! दादासाहेब तुरुंगांत जाणार हें तर ठरलंच आहे आणि ते तुरुंगांत गेले म्हणजे आमच्यावर फार मोठं जोखीम येणार! कारण मग खाडीलकर व्हायचे एडिटर आणि त्यांच्या लेखांत तर अशा भयंकर चुका असतात कीं सांगतां सोय नाहीं! कंपोज करतां करतां नाकीं नव येतात. प्रत्येक वाक्याला कंपोज करतांना दुरुस्त करावं लागतं. हल्लीं तेच लिहिताहेत कीं नाहीं, त्यामुळं स्टेश-नावर येतां आलं नाहीं.–कुठं आहेत ह्यांचे वडील? स्नानाला गेले आहेत वाटतं? ह्या कोंकणच्या लोकांना स्नानाचा भारीच मोठा बडेजाव–सूर्योदयापूर्वी स्नान करा कशाला? तें दुपारीं केलं तर काय मरायला होतं! पण नाहीं–आणि आतां तर आगगाडींतून आलेले, चिंन्यान् चिंध्या धूत बसले असतील! आम्हीं कांहीं सुधारक नाहीं, अगदीं पुराणमतवादी आहोंत–म्हणून तर केसरी आफिसांत टिकलों आहें ना?–तरी आम्हांला हे असले चोचले कांहीं आवडत नाहींत. पण ब्याही माणसं–काय करतां? बोलतां येत नाहीं."

नानासाहेबाचें चऱ्हाट सारखें सुरू होतें. गालांतल्या गालांत हंसत ताईनें माझा हात धरला आणि ती मला परसदारीं घेऊन गेली. नानासाहेबांचें चऱ्हाट सुरू होतेंच. मधूनमधून केसरी, दादासाहेब, खाडीलकर, बाबा विद्वांस, खटला, जन्मठेप हे शब्द निरनिराळ्या स्वरूपांत ऐकूं येत होते. त्यावेळीं मला त्यांचा कांहींच अर्थ कळला नाहीं पण आतां त्यांचें तें भाषण आठवणीवरून संगतवार लिहीत आहें.

पण ' केसरी ' हा शब्द मात्र माझ्या पूर्ण परिचयाचा होता. असें कुठलें कोंकणचें घर आहे कीं जिथें केसरी वाचला जात नाहीं ? केसरीच्या खटल्याची हकीकत कोंकणांत दररोज माझ्या कानीं येत होती. रोज आमच्या घरीं गांवची मंडळी जमून ह्या खटल्याची चर्चा करीत असत. सर्व गांवांतील मंडळींना प्रत्यहीं केसरी वाचून दाखवण्याचें काम आमचे बाबाच करीत असत. केसरीच्या जुन्या फायलींचे ढिगारे आमच्या घरीं किती तरी पडलेले होते ! केसरीच्या खटल्याचा तपशील जरी मला माहीत नव्हता तरी बाबा वाचीत असतांना मी लक्ष्यपूर्वक ऐकत असल्यामुळें पुसटती कां होईना, पण त्या खटल्याची मला पुष्कळच माहिती झाली होती. अशा त्या सर्वप्रिय वर्तमानपत्राशीं माझ्या दीराचा संबंध असलेला पाहून मला त्यांच्याबद्दल फार आदर वाटला.

मी वेणीफणी करून घरांत आले तों बाबा आणि नानासाहेब बोलत असल्याचें माझ्या कानीं आले. माझ्यासमोर झालेल्या भाषणाची नानासाहेब निरनिराळ्या प्रकारें उजळणी करीत होते. बाबांनाही ती हकीकत ऐकून माझ्याप्रमाणेंच अभिमान वाटत असल्याचें दिसत होतें. नानासाहेब म्हणाले, " बाकी सर्व ठीक आहे पण तुमच्या ह्या अनुस्वारांचा आपल्याला फार तिटकारा आहे बुवा. आतां ही तुमची मुलगी ' केलें, गेलें ' करून लांब हेल काढून बोलूं लागेल आणि चौरचाघांत आम्हांला मान खालीं घालण्याचा प्रसंग येईल. "

बाबा हंसत हंसत म्हणाले, " आम्हालाच उलट तुमचं आश्चर्य वाटतं. आम्हीं जसं लिहितों तसं बोलतों आणि तुम्ही लिहितां ' जसें ' आणि म्हणतां ' जसं '— त्याचा आम्हांला कांहींच उलगडा होत नाहीं. "

नानासाहेब मोठमोठ्यानें हंसत म्हणाले, " वाः शास्त्रीबुवा, अगदीं गड्डयालाच हात घातलात कीं ! आम्हांलाही कबूल आहे कीं तुम्हीं कोंकणचीं माणसं अगदीं व्याकरणशुद्ध बोलतां. तें तुमचं भाषण संस्कृत असेल—पण सुसंस्कृत नाहीं.

त्या तुमच्या भाषेंत अनुस्वार आहेत खरे, पण पुण्याचा छाप नाहीं—आणि ज्या भाषेवर पुण्याचा छाप नाहीं तिला मराठीच्या सदरांत घालतांच येत नाहीं. असं हें त्रांगडं आहे. कंपॉझिटर ह्या नात्यानं माझं तर असं म्हणणं आहे, कीं हे अनुस्वारच मुळीं काढून टाकले पाहिजेत. तेवढा टाईपांचा खर्च वांचेल आणि खिळे जुळवण्याचे श्रमही बचतील. पण आमच्या बळवंतरावांना तें पटत नाहीं! बळवंतराव म्हणजे टिळक बरं का? ऑफिसांत सर्व त्यांना दादासाहेब म्हणतात पण माझा त्यांचा विशेष लोभ, मी नुसतं बळवंतराव म्हणतों. फार मोठा माणूस! असा आजपर्यंत जगांत झाला नाहीं. काय त्यांच्या एक एक गोष्टी सांगूं? सुपारी कितीं खातात! सुपारी खावी तर त्यांनींच खावी. आम्हीं आपले सुपारी खातों म्हणजे काय, त्यांचं अनुकरण म्हणून!—आणि बोलूं लागले म्हणजे काय विचारतां—सारखा घोधो धोधो भाषणाचा प्रवाह चाललेला असतो. तुम्हीं अगदीं भलत्या वेळीं आलांत. थोडे दिवस आधीं आलां असतात तर त्यांचा तुमचा परिचय देखील करून दिला असता. तुम्हीं शास्त्रीबुवाच आहांत, त्यांचं तुमचं बरं जमलं असतं..."

नानासाहेबांच्या भाषणाचा धो धो प्रवाह सारखा सुरू होता.

बाबा तर त्या भाषणानें अगदीं थक्क होऊन आ वासून राहिले होते. नानासाहेबांच्या भाषणाच्या ओघांत मधें थोडासा खळ पडल्याची संधि साधून बाबांनीं बोलण्यास सुरवात केली. बाबा म्हणाले, "आज हा अगदीं अलभ्य लाभ झाला. मला हें पूर्वी माहित नव्हतं. टिळकांच्या सहवासांतली तुम्हीं माणसं—आम्हांला टिळकांइतकीच वंदनीय आहांत..." असें म्हणून बाबांनीं त्यांच्या पायांवर मस्तकही ठेवलें.

नानासाहेब चटकन् मागें सरले आणि म्हणाले, "अरे, अरे, हें काय? तुम्हीं वडील माणसं. आम्हांला नमस्कार करायचा नाहीं. आज हें दुसऱ्यांदा झालं. पहिल्यांदा आमच्या वहिनीसाहेब आणि आतां हे तुम्हीं. आम्हीं कसलीं मोठीं माणसं! पूर्वजन्मींची पुण्याई म्हणून त्यांच्या सेवेचा लाभ मिळाला आहे एवढंच. बाकी, त्यांच्या खुर्चीत ढेंकूण काय थोडे असतात—त्यांतलेच आम्हीं! तरीपण तुम्हांला सांगतों शास्त्रीबोवा, मला नुसता खिळे जुळविणारा समजूं नका. टिळकांच्या वाक्यांत देखील मी दुरुस्त्या केलेल्या आहेत—आणि आतां ही केस झालेली आहे नाॅ—तींच वाक्यं—अगदीं तींच वाक्यं मी दुरुस्त केलीं होतीं. केवळ माझ्या दुरुस्तीमुळंच

त्यांच्यावर केस झाली आहे म्हणा ना—आणि तुम्हांला खरं सांगायचं म्हणजे ह्याबद्दल मला यत्किंचित्ही वाईट वाटत नाहीं. उद्यां जो त्यांना मोठेपणा मिळेल त्या मोठेपणांत देवाघरच्या न्यायानं मी थोडा तरी अंशभागी होईन..."

बाबांइतक्याच आतुरतेनें मी हें नानासाहेबांचें भाषण ऐकत होतें. असल्या भाग्यवान् घराण्यांत येऊन पडल्याचा मला अभिमान वाटूं लागला. मी हें भाषण ऐकत असतांना ताई तिथें आली आणि अंग धुण्यासाठीं मला परसदारीं घेऊन गेली.

माझ्या सासरीं फारशीं माणसें नव्हतीं. मी आल्या वेळींच मला भेटलेल्या वृद्ध बाई म्हणजे माझी वडील नणंद, नानासाहेब, त्यांची बायको आणि त्यांची तीन मुलें—एवढींच काय तीं कायम असणारी मंडळी होती. ताई नुसती थोड्या दिवसांसाठीं आली होती.

अंग धुऊन आल्यावर मी ताईला म्हटलें. "नानासाहेब फार मोठे माणूस आहेत नाहीं ?"

अगदीं चमत्कारिक चेहरा करून ताईनें उत्तर दिलें, "मोठे तर खरेच ! पण हा त्यांचा मोठेपणाच वेळोवेळीं फार नडतो. माई, एव्हांपासून भलत्याच कल्पना करून घेऊं नकोस. आज भलतीच आशा मनांत धरशील आणि पुढं जर सगळंच गाडं उलटलं तर..."

ताईनें मधेंच जीभ चावली आणि तिचें पुढचें भाषण तसेंच राहिलें.

सासरघरचा तो पहिला दिवस फार आनंदांत गेला. मला यत्किंचितही संकोच होऊं नये म्हणून ताई सारखी जपत होती. वन्संचा मधूनमधून कुजकट टोमणे देण्याचा सपाटा सुरू होता—पण, ताईच्या आधारामुळें मला त्याचें कांहींच वाटलें नाहीं. मी आल्यापासून जाऊबाईच्या तोंडून मला ऐकूं येईल असा एकही शब्द निघाला नव्हता—त्यामुळें त्या दिवशीं त्यांच्याबद्दल मला कांहींच अंदाज करतां आला नाहीं. नानासाहेबांची मुलगी लीला माझ्यापेक्षां एक वर्षानें लहान होती आणि तिला एक पांच वर्षांचा भाऊ आणि दोन वर्षांची बहीण होती.

ज्या दिवशीं मी सासरीं येऊन पोहोंचलें त्याच दिवशीं तिकडे बनीचें गोविंदाशीं लग्न झालें.

## प्रकरण चवथें

## माझी मुलगी

एक दोन दिवस राहून बाबा कोंकणांत निघून गेले. जातांना सासरीं कसें वागावें ह्याबद्दल बाबांनीं मला बराच उपदेश केला. तो उपदेश करण्यांत बाबांना कदाचित समाधान वाटलें असेल, पण माझ्या मनावर त्याचा यत्किंचितही परिणाम झाला नाहीं. परक्या गांवीं, परक्या घरीं, परक्या माणसांत जरी मी येऊन पडलें होतें–तरी ताईच्या सहवासामुळें माझी परकेपणाची भावना अजिबात नाहींशी झाली होती. राहून राहून मी किती विचार केला तरी ताईच्या ठिकाणीं मला कोणत्याच प्रकारचा परकेपणा वाटेना. माझ्या आईच्या आणि तिच्या मुद्रेंत इतकें कांहीं विलक्षण साम्य होतें कीं माझ्या आईपासून मी वेगळी झालें आहे असें मला क्षणभरही वाटेना. ह्या योगायोगाचा आज मी विचार करूं लागलें म्हणजे राहून राहून मला आश्चर्य वाटतें. मी अकरा वर्षांची एवढीशी मुलगी–आई !–आणि तिशी उलटलेली एक प्रौढ स्त्री–माझी मुलगी ! सावत्र मुलगी कां होईना–पण लोक तिला माझी मुलगीच म्हणत होते. मला ती आईसारखी वाटत होती. अकराव्या वर्षीं मी माझ्या आईची आई झालें होतें.

भवितव्यतेचा काय हा चमत्कारिक खेळ !

माझ्या सासरच्या आयुष्यक्रमाला सुरवात झाली. विहिरींतून घागरीच्या घागरी ओढणारी मी–त्या मला नळावर पाणी भरणें म्हणजे एक सुखाचें समाधान वाटलें. पहिल्या पहिल्यानें जाऊबाई मला कामाला फारसा हात लावूं देत नसत–पण कामाशिवाय रहाण्याची संवय माझ्या आईच्या कृपेनें मला लागली नसल्यामुळें कोणत्या ना कोणत्या तरी कामाला मी सदोदित हात घालीत असें. जाऊबाईच्या लहान मुलाला संभाळण्याचें काम सहजच माझ्यावर येऊन पडलें होतें. मला लहान मूल बाळगण्याची मुळींच संवय नव्हती–त्यामुळें मूल बाळगण्यापेक्षां इतर काम करण्याचीच हौस मला जास्त असे–आणि तें मूलही सालस होतें थोडेंच! सकाळपासून संध्याकाळपर्यंत त्याचें भोंकांड नेहमीं पसरलेलेंच असे. कडेवर घेतलें तरी रडायचें आणि खालीं ठेवलें तरीही रडायचेंच ! मूल रडूं लागलें कीं वन्संच्या पायाची तिडीक मस्तकाला जायची. अशा वेळीं ताई माझ्या साहाय्याला धांवून येई. मुलांना समजवण्याची ताईची हातोटी कांहीं विलक्षणच होती. तिचा

हातगुणच असा कांहीं विलक्षण होता कीं तिनें हात लावतांच मुलानें गप्प रहावें. पण जाऊबाईंना तें रुचत नसे–त्या म्हणायच्या, " अशा त्या किती दिवस इथं रहाणार आहेत ? मुलाला त्यांची संवय झाली आणि उद्यां त्या निघून गेल्या तर तोच एक त्रास होऊन बसायचा–म्हणून बाळाला घ्यायची संवय तुलाच केली पाहिजे."

अशा वेळीं ताईनें नुसतें हंसावें, बाळाला माझ्याकडे द्यावें आणि त्या गुणी बाळानें माझ्याकडे येतांच भोकाड पसरावें–असा क्रम सारखा सुरू होता.

ते लग्नसराईचे दिवस होते आणि लग्नसराईचे दिवस म्हणजे पुण्यांत केवढी गडबड ! नानासाहेबांच्या ओळखी फार. त्यामुळें रोज कुणाच्या ना कुणाच्या तरी घरीं आम्हांला आमंत्रण यायचेंच. कुठल्याही लग्नघरीं गेलें कीं मला पहातांच बायका आपसांत कुजबूजूं लागत. कित्येक प्रत्यक्ष तोंडावरही बोलत.

एका मुलीनें तर एके दिवशीं उघडउघडच विचारलें,

" हें काय हो आजीबाई, आपले म्हातारबुवा कुठं नाहीं आणलेत बरोबर ? "

असें बोलतांना त्या मुलीनें असा कांहीं विलक्षण चेहरा आणि हातवारे केले कीं त्यामुळें साऱ्या मंडळींत एकच हंशा पिकला ! मला अगदीं मेल्याहून मेलें झालें.

त्या दिवशीं मी घरीं आलें आणि मनाशीं निश्चय केला कीं यापुढें कोणाच्याही घरीं लग्नाला म्हणून जायचें नाहीं ! पण निश्चय करणें जसें माझ्या हातीं होतें तसा तो पार पाडण्याचा अधिकार माझ्याकडे कुठें होता ? दुसऱ्या दिवशीं पुन्हां लग्नाचें आमंत्रण आलेंच. जाऊबाई, ताई आणखी लीला निघायच्या तयारीला लागल्या.

मी स्वस्थ बसलेली पाहून वन्संनीं मला विचारलें, " कां ? जायचं नाहीं वाटतं मनांत ? खरंच तें, घरच्या कर्त्या बाई तुम्ही–जाणंयेणं सारं तुमच्या मर्जीवर ! वाटेल तेव्हां जाल, वाटेल तेव्हां रहाल, माणूसबिणूस कांहीं खिजगणतींत नाहीं–गृहस्थपणाची पर्वा असेल तर ना ? उद्यां आमच्या घरीं चार कार्यें व्हायचीं आहेत, त्या वेळीं चार लोक आमच्या घरीं आले पाहिजेत–ह्याची चाड आहे आम्हांला. तुम्हां कोंकण्या लोकांना माणसांची पर्वाच नाहीं मुळीं. आम्हीं पेशवाई-तलीं माणसं–रीतखेतींत आमचा सारा जन्म गेलेला. आमचे आजोबा अगदीं पेशव्यांच्या पंगतीला असत. त्यांच्यासारखा जेवणारा कुणी झाला नाहीं म्हणतात. पैजेनं लाडू उठवीत होते. एका वेळेला पन्नास लाडू त्यांनीं सहज फस्त करावे–

आणि लाडू म्हणजे कांहीं हल्लींच्यासारखे भिकारडे नसत. एकएक लाडू हा एवढाला मोठ्ठा ! आणि त्यांचे आम्ही वंशज--दोन लाडू खाल्ले तर अजीर्ण होतं ! पेशवे ब्रम्हावर्ताला गेले पण आमच्या आजोबांनीं कांहीं त्यांची कास सोडली नाहीं. तिथं देखील सारखीं अन्नसंतर्पणं चाललीं होतीं--आणि आतांचीं हीं माणसं पहा ! नुसत्या आठवणी आठवायच्या ! बाहेरचीं माणसें घरीं आलीं कीं घराण्याच्या अब्रूची रांगोळी झालीच म्हणून समजा. हें कोंकणचं भिकार कशाला आमच्या ह्या पुण्यांत आणलं कोण जाणे ! काय पुण्यांत मुली मिळत नव्हत्या ? पण नाहीं. ह्या पुरुषांचं हें अस्संच. जवळचं नको होतं. मी किती सांगून पहात होतें पण माझं म्हातारीचं ऐकतो कोण ?--ऐकत काय राहिली आहेस ? दिसत नाहीं वाटतं बाकीच्यांची तयारी झाली ती ?"

मी भीतभीत म्हटलें, "मला आज जायचं नाहीं."

वन्संच्या तोंडाचा पट्टा पुन्हां सुरू झाला, "म्हणे जायचं नाहीं ! कां जायचं नाहीं ? अशी काय मोठी पद्मिण लागून राहिली आहेस ! दृष्ट पडेल वाटतं ? तोंड तर पहा--तोंडावर माशी सुद्धां बसायची नाहीं ! आणि तोंड उघडलं तर गेलीच आमची पुण्याची अब्रू ! सारखं नाकांत बोलणं सुरू व्हायचं. ह्या कोंकणी भाषेमुळंच आमची सारी अब्रू जाते--पण ह्यांना काय त्याचं ! चारचौघींत जायचं तर चारचौघींसारखी भाषा पाहिजे. ह्या असल्या वडारणी घरीं आणायच्या आणि मग घराण्याची अब्रू गेली म्हणून रडायचं ! त्यापेक्षां माझ्या दादाचं लग्न झालं नसतं तरी बरं झालं असतं. पहातेस काय माझ्याकडे ? दादा म्हटलं म्हणून तो कांहीं माझा वडील भाऊ होत नाहीं ! चांगली दहा वर्षे त्याच्या आधीं जन्माला आली आहें. पहात काय राहिलीस वेंधळ्यासारखी ? चल ऊठ, साडी नेस."

मी पुन्हां भीतभीत म्हटलें, "दुसऱ्याच्या घरीं गेलं कीं कांहींच्या बाहींच बोलतात--मला नाहीं तें सहन होत. मी आपली बाळाला खेळवीत घरीं बसेन."

पुन्हां वन्संच्या तोंडाचा पट्टा सुरू झाला !

"कांहींच्या बांहींच बोलतात म्हणे ! असली घिसाडीण समोर दिसली कीं लोकं तरी कां बोलल्याशिवाय राहातील ? एवढी मोठी घोडी झाली आहेस--अजून चारचौघांत कसं वागावं तें कळत नाहीं. मेलीं कोंकणचीं माणसंच अशीं ! असलीं खेडवळं कशाला आणतात आमच्या ह्या पुण्यांत कोण जाणे ! काय हें पुणं ओस

पडलं होतं ?–पण नाहीं, कोंकणांत धांव घेतली आणि ही घोरपड गळ्यांत बांधली ! ही सवाष्ण बायको, मंगलकार्याचं आमंत्रण आलेलं, तर जायचं नाहीं म्हणते ! आतां हिला म्हणावं तरी काय ? तें कांहीं चालायचं नाहीं. तुला गेलंच पाहिजे. बाळाला मी खेळवीन. कांहीं नको बाळासाठीं घरीं बसायला..."

मी मधेंच म्हणालें, "बाळासाठीं कांहीं मी घरीं रहात नाहीं. घरीं रहायचंच आहे–तेव्हां मी बाळाला खेळवीन असं आपलं म्हटलं झालं."

वन्सं भारीच चवताळल्या !

"मी एकदां सांगितलं ना ? तुला लग्नाला गेलंच पाहिजे."

मी मनाचा हिय्या करून म्हटलें,

"प्राण गेला तरी आज मी लग्नाला जाणार नाहीं."

माझ्या तोंडचे हे शब्द निघतांच वन्संच्या अंगाचा भडका झाला ! त्या मारे थयथया नाचत, हातवारे करीत, माझ्या सर्व कुळांचा उद्धार करूं लागल्या ! त्यांना एवढें अवसान आलें होतें कीं थोडा वेळ असेंच चाललें असतें तर त्यांनीं मला बडवलेंही असतें !

भलत्या थरावर गोष्टी जात असल्याचें ध्यानीं येऊन ताई पुढें सरसावली आणि हळूच माझ्या कानाशीं लागून म्हणाली,

"असं काय करावं तें ? आपलं मुकाट्यानं गेलेलं बरं नाहीं का ?"

ताईच्या त्या शब्दांत विनवणीइतकाच अधिकाराचा जोर होता !

मी अगदीं नकळत खोलींत गेलें, साडी नेसलें, दागिने अंगावर घातले आणि निघायच्या तयारीनें बाहेर आलें.

मला वाटलें, आतां वन्संचा राग शान्त होईल–पण परिणाम मात्र अगदींच उलटा झालेला दिसला !

माझ्यासमोर येऊन गुडघ्यांवर हात ठेवून वन्सं म्हणाल्या, "एवढी मी घसा कोरडा पडेपर्यन्त ओरडलें त्याचं कांहीं वाटलं नाहीं–आणि लाडक्या लेकीनं हळूच कानाशीं लागून सांगितल्याबरोबर निमूट जायला निघालीस ! माझ्या शब्दाला कांहीं किंमतच का नाहीं ! हो–परकीच कीं नाहीं मी ! माझी काय आहे ह्या घरांत सत्ता ! माझ्या शब्दाला कोण विचारतं ?–पण ही तुझी आवडती लेक !

कळतंय् का तुला ? लेक कसली ? ती तुझी आई शोभेल ! तुझ्याएवढी मुलगी होती तिला. आज वाटतंय् तुला—पण उद्यां तुझे डोळे उघडतील तेव्हां समजेल सगळं ! लेक खरी, पण ध्यानांत ठेव, सावत्र लेक आहे. चार वर्षे जाऊं द्या कीं एकमेकांच्या नरडीचा घोंट घेऊं लागाल ! आज चाललीं आहेत हितगुजं—मी परकी आहें इथं घरांत म्हणून कारस्थानं करतां आहांत—पण मेल्यानों, ध्यानांत ठेवा—उद्यां एकमेकांच्या झिंज्या ओढूं लागाल..."

ताईनें मला डोळ्यानें खूण केली आणि आम्हीं सर्व मंडळी बाहेर निघालों तरीही वन्संच्या तोंडाचा पट्टा सुरू होताच !

आम्हीं लग्नाला गेलों आणि जें व्हायचें तें झालेंच. पोरींबाळींचें मला कांहीं विशेष वाटलें नाहीं, पण कर्त्यासवर्त्या बायकासुद्धां जेव्हां घालूनपाडून टोमणे मारूं लागल्या तेव्हां माझ्या अंगाचा तिळपापड होऊं लागला.

एकीनें तर खुद्द ताईलाच म्हटलें, "अग, अशी कशी ग तूं निर्दय ? तुझी आई ना ती ! पायीं चालवीत आणतेस तिला ! जरा कडेवर घेतलंस तर काय होईल ?"

हें वाक्य ऐकून ताईचा देखील चेहेरा गोरामोरा झाला. एवढी सहनशील बायको ! पण ती देखलि रागानें फणफणूं लागली ! उत्तर देण्यासाठीं तिचे ओंठही थरथरले—पण दांतओंठ खात तिनें राग मनांतल्या मनांत गिळला.

संध्याकाळीं आम्हीं घरीं आलों. आम्हीं येण्यापूर्वीच वन्संनीं नानासाहेबांचे कान फुंकून ठेवले होते—आणि तो दिवस होता मंगळवार—आणि मंगळवार म्हणजे आम्हां सर्वांचा अगदीं घातवार ! आठवड्याचे श्रम ओसरल्यावर कचेरींत जो कांहीं त्रास झाला असेल त्याचें उट्टें काढायचें मंगळवारीं. मंगळवारीं नानासाहेबांना अगदीं विष चढलेलें असायचें ! मी घरांत पाऊल ठेवतांच नानासाहेब कमरेवर हात ठेवून उभे राहिले आणि म्हणाले,

"कसं काय वहिनीसाहेब, कशी काय आहे आपली मिजास ?"

मी अंग चोरून घरांत जाऊं लागलें तेव्हां माझा रस्ता आडवून ते पुन्हां म्हणाले, "आज कसलं वारं शिरलं होतं आपल्या अंगांत ? काय वाटलं आपल्याला ? मी घरीं नाहीं असं पाहून आक्काला वाटेल त्या शिव्या द्यायला शरम नाहीं वाटली ? काय वाटलं आपल्याला ? ह्या घरांत आज मी कर्तापुरुष आहें. माझ्या अधिकारानं इथं सर्व गोष्टी झाल्या पाहिजेत. तुम्हांला वाटलं असेल कीं तुमच्या नवऱ्याच्या

जिवावर मी जगलों आहें म्हणून!—गोदीनं पढवलं असेल तुम्हांला—पण तें विसरा! तुझ्या नवऱ्याची मला पर्वा नाहीं. फारफार तर काय करील? पैसे पाठवायचे बन्द करील—एवढंच ना? मला त्याची मुळींच खातरजमा नाहीं. मी केसरी-वाला आहें, मी टिळकांचा चेला आहें—तुरुंगांतसुद्धां जायला मी भिणार नाहीं. आक्काला पुन्हां एक शब्द टाकून बोललीस तर जीव घेईन आणि खुशाल तुरुंगांत जाईन! टिळक नाहीं गेले तुरुंगांत! जळजळीत उदाहरण आहे माझ्यासमोर. तुझा नवरा शंभर रुपये मिळवीत असेल पण तो सरकारी नोकर आहे—आणि मी सरकारशीं मनगट घांसून झगडणाऱ्या केसरी ऑफिसांतला आहें. पुन्हां सांगतों, आक्काला एक शब्द टाकून बोल तर खरी, उभी भाजून काढीन! तूं माझा तडाखा अजून पाहिला नाहींस! मी जहाल आहें, ज्ञानप्रकाशांतला गचाळ मवाळ नव्हे मी!"

मी अंग चोरून घरांत जाण्याचा जों जों प्रयत्न करीत होते तों तों मला आडवून नानासाहेब अधिक अधिक हातवारे करीत बोलत होते. नानासाहेबांची बायको माझ्यापूर्वींच आंत गेली होती आणि ताई माझ्या मागें होती.

माझें संकट पाहून ताई पुढें सरसावली आणि म्हणाली, "नाना, बाजूला व्हा पाहूं. मला घरांत जायचं आहे."

ताईच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच, नानासाहेबांचा राग अधिकच भडकला. ते म्हणाले, "तूं हिला फूसलावलं आहेस. तुझ्याच चिथवणीनं ही पदोपदीं आक्काचा असा अपमान करते. तुला वाटत असेल, तुझ्या बापाच्या जिवावर मी जगलों आहें म्हणून! भ्रम आहे! तुझ्या बापाच्या पैशाची मला यत्किंचितही पर्वा नाहीं—माझा मी मुखत्यार आहें. दादाला वाटत असेल तर दादानं खुशाल आपल्या बायकोला मुंबईला घेऊन जावं. उद्यां एक पत्र लिही आपल्या बापाला—नाहींतर तूंच घेऊन जा उद्यां हिला मुंबईला..."

नानासाहेबांचें बरळणें सारखें सुरू होतें. ताई पुन्हां एकदां मनाचा धडा करून म्हणाली, "आम्हाला आधीं आंत जाऊं द्या आणि मग काय वाटेल तें बोला."

नानासाहेब एकदम भडकून म्हणाले, "जा, आंत जा, बाहेर जा, कुठं वाटेल तिकडे जा. आमच्या शब्दाची काय किंमत राहिली आहे? नाहींतर इथंच असा आडवा पडतों—माझ्या उरावर पाय ठेवून जा!"

असें म्हणून नानासाहेब खरोखरच आडवे पडले. त्यांचा हा आततायीपणा पाहून मी तर अगदीं स्तंभित होऊन गेलें. ताईलाही काय करावें तें सुचेना. ती म्हणाली,

" नाना, हा काय वेडेपणा ? समोर तुमचीं बायकामुलं पहात आहेत त्यांची तरी लाज धरा. घरीं नवं माणूस आलं आहे, त्याला काय वाटेल ह्याची थोडी तरी खंत बाळगा ! निदान रस्त्यावरून जाणारीं माणसं पहातील ऐकतील तर काय म्हणतील, ह्याची तरी थोडी लाज धरा."

नानासाहेब एकदम ताडकन् उठून म्हणाले, " माझी लाज काढतेस ?"

नानासाहेब उभे राहिल्याची संधि साधून ताई आंत गेली आणि मीहि तिच्या मागोमाग गेलें. नानासाहेब तसेच एकदम फिरून आमच्या मागोमाग धांवले आणि रागानें इकडे तिकडे पहात जवळच पडलेली काठी त्यांनीं उचलली.

ताईनें मला खोलींत लोटलें, आपण आंत आली आणि दाराला आंतून कडी लावली. अद्वातद्वा शिव्या देत नानासाहेब दारावर लाथा मारीत होते आणि 'दोघींचाही जीव घेतों' म्हणून मोठ्यानें ओरडत होते ! त्यांत वन्सं आल्या आणि त्यांनीं नानासाहेबांना ओढून आंत नेलें. घरांत चाललेला शिव्यांचा कल्लोळ आम्हांला खोलींत ऐकूं येत होता.

नानासाहेब दारापासून दूर होतांच माझें अवसान सुटलें आणि मी स्फुंदून स्फुंदून रडूं लागलें. ताईनें मला जवळ घेऊन समजावण्यास सुरवात केली. ताईनें कितीही समजावून सांगितलें तरी माझें रडें कांहीं केल्या आंवरेना. मला उमाळ्या-वर उमाळे येत होते. शेवटीं ताईनें बळेंच माझें तोंड धरलें आणि हळूच कानांत म्हटलें, " रडणं बाहेर ऐकूं जाईल तर आणखीन् अनर्थ माजेल !"

आणखी अनर्थ माजण्याच्या भीतीनेंच माझें रडें थांबलें. झाला हा अनर्थ काय थोडा होता ? यापेक्षां आणखीन् अनर्थ माजायचा तो काय ? फक्त मारायचें तेवढें राहिलें होतें—राहिलें होतें म्हणण्यापेक्षां ताईनें प्रसंगावधान दाखवलें म्हणूनच माझा मार चुकला होता !

त्या रात्रीं आम्हीं दोघीही खोलीच्या बाहेर गेलों नाहीं. मी कोरी साडी बदलली आणि अंगावरचे दागिने ताईच्या हवालीं केले. बिछान्याची वळकटी तशीच उघडून मी कसेंबसें बिछान्यावर अंग टाकलें. लुगडें बदलून ताई माझ्या शेजारीं

येऊन आडवी झाली. ताई जवळ येतांच मला पुन्हां रडण्याचा उमाळा आला. त्या उमाळ्यासरशीं मी दोन्हीं हातांनीं ताईला घट्ट कवटाळून म्हटलें,

" ताई, आतां माझं कसं होणार ? उद्यां बाहेर कशी जाऊं ? "

ताई म्हणाली, " उद्यांचं उद्यां—त्याचं आतां काय ? आणि उद्यां यांतलं कांहीं शिल्लक रहायचं नाहीं. "

त्या वेळीं काळोख पडला होता. दिवा लावण्यासाठीं काड्याची पेटी शोधली ती कुठें सांपडेना. बाहेर जाऊन दिवा लावून आणणें शक्यच नव्हतें. बाहेर नानासाहेबांचें अकांडताण्डव सुरूच होतें. माझ्या मनाची मोठी विलक्षण स्थिति झाली होती. असली परिस्थिति मी कधींच पाहिली नव्हती—मग अनुभवण्याचें तर दूरच ! मुलीला सासुरवास असतो असें मी लहानपणीं ऐकलें होतें, म्हणून लग्न होण्यापूर्वी सासूच्या काल्पनिक छळाची मला भीति वाटत असे. सासरीं आल्यावर मला सासू नाहीं असें दिसून येतांच हायसें झालें होतें. आतां कांहीं आपल्याला सासुरवास होणार नाहीं ह्या कल्पनेनें मी असल्या चमत्कारिक स्थितींतही खुषींत होतें. सासुरवास होण्यासाठीं सासूचीच जरूर असते असा जो माझा समज होता तो आज दूर झाला. मी सासरीं आल्यावर कांहीं दिवस आनंदांत गेले असें जरी म्हणतां येत नाहीं तरीं दुःखाचा प्रत्यक्ष चटका मला लागला नव्हता. आज ती भ्रान्ति दूर झाली. मी ताईच्या गळ्यांत हात टाकून तिला विचारलें,

" सासुरवास म्हणतात तो हाच का ? "

ताई म्हणाली, " होय पोरी, हाच ग... "

ताई एकदम दचकली, ओशाळली आणि जीभ चावून म्हणाली, " चुकून काय शब्द गेला माझ्या तोंडांतून ! "

मी गहिंवरून म्हटलें, " नाहीं ताई, तूं मला असंच म्हणत जा. तूं इथं आहेस त्यामुळं मला आईची आठवणसुद्धां होत नाहीं. तूं असंच मला ' पोरी ' म्हण, ' बाळ ' म्हण—म्हणजे तेवढंच मला माहेरीं असल्यासारखं वाटेल. "

ताईला एक जोराचा हुंदका आला आणि त्यासरशीं तिनें मला आपल्या हृदयाशीं घट्ट कवटाळून धरलें. त्या कवटाळण्यांत आईच्या हृदयाचें सारसर्वस्व होतें. त्या कवटाळण्यानें मला धीर आला. जाचाची भीति वाटेनाशी झाली. त्या प्रेमाच्या ओलाव्यानें माझ्या हृदयाला पाझर फुटला. पुन्हां मला वाटलं, काय हा दैवाचा

विचित्र खेळ ! कल्पनेच्या भराऱ्या मारण्याचें तें माझें वय नव्हतें. लहान मुलांनाही कल्पना असतात. त्या कल्पनांना–लहानशाच कां असेनात–पण भराऱ्याही असतात. माझ्या कल्पनेच्या भराऱ्या तशाच वाहूं लागल्या. मला वाटलें, काय हा दैवाचा विचित्र खेळ ? आई कुठली आणि मलगी कुठली ? कोण कुणाची आई आणि कोण कुणाची मुलगी ? आईनें मुलीचें सांत्वन करावें कीं मुलीनें आईचें सांत्वन करावें ?

तशा त्या बिकट प्रसंगांतही मला हंसूं आलें. माझ्या हंसण्याचा आवाज ऐकतांच ताई दचकली आणि म्हणाली, " कां ? हंसलीसशी ? " तिचें विचारणें मी थट्टेवारी नेऊन उत्तर दिलें, " पोटभर रडून झालं आहे, आतां जरा हंसून पहातें." ताईलाही हंसू आलें. थोड्या वेळांपूर्वी जशा आम्ही ऐकमेकींच्या गळ्यांत गळा घालून रडत होतों तशाच आतां आम्ही हंसूं लागलों. मी हंसणें थांबवून म्हटलें, " बाहेर कोण कल्लोळ माजला आहे–आणि तुला हंसायला बरं सुचतं ? "

माझा एक गालगुच्चा घेऊन ताई म्हणाली, "पण आधीं मला हंसवलं कुणी ? आधीं हंसलं कोण ? "

मी म्हटलें, " मी आपली वेडी म्हणून हंसलें, पोर म्हणून हंसलें–पण तूं एवढी कर्तीसवर्ती बायको–अशा वेळीं हंसणं तुला शोभतं का ? "

ताईला अधिकच हंसूं लोटलें !

बाहेर नानासाहेब मोठमोठ्यानें ओरडत होते, " पुरे झाला हा दादाचा संबंध. ह्या कार्टीचाही दिमाख नको आणि त्या कार्टीचाही दिमाख नको. येऊन जाऊन पैसे पाठवायचे बंद करील–एवढंच कीं नाहीं ? नको पाठवूं म्हणावं. टिळकांवर खटला झाला त्यावेळीं लोकांनीं भराभर पैसे पाठवले. जनतेच्या न्यायासनासमोर मी माझी केस मांडीन आणि जनतेला जर माझी दया आली–आणि ती येणार ह्याबद्दल मला बिलकूल शंका नाहीं–जनतेला माझी दया आली तर माझी जन्माची ददात राहाणार नाहीं ! "

" ताई, ही जनता कोण ? "

ताई म्हणाली, " ही जनता कोण हें जसं तुला माहीत नाहीं तसं मलाही माहीत नाहीं–आणि नानासाहेबांना तर मुळींच नाहीं ! "

आम्हीं दोघीही उकळ्यावर उकळ्या येऊन हंसूं लागलों.

ताई म्हणाली, " नानासाहेबांची ही नुसती पोपटपंची आहे. केसरी ऑफिसांत इकडले तिकडले चार शब्द ऐकायला मिळतात–ते कनवटीला लावून हे घरीं येतात आणि आम्हां बायकांमुलांना ऐकवतात. आतां एवढ्या गप्पा मारीत आहेत–पण उद्यां जर दादांनीं मुंबईहून पैसे पाठवावयाचं बंद केलं तर डोळे पांढरे होण्याचा प्रसंग येईल. पंधरा रुपयांत एवढ्या माणसांचा प्रपंच चालणं हल्लींच्या दिवसांत कांहीं सोपं नाहीं. त्यांचं त्याच्याच मनाला खातं आहे. एक रात्रभर विचार केला कीं पहा उद्यां कसे थंड होतात ते ! "

नानासाहेब उद्यां थंड होतील ह्या नुसत्या आश्वासनानेंच माझ्या जिवांत जीव आला ! उद्यां खोलीच्या बाहेर कसें पडायचें हेंच मला मोठें संकट होतें. नानासाहेबांचा तो नारसिंहावतार पाहून माझी अगदीं पांचावर धारण बसली होती. सारा जन्म या खोलींतच लपून बसून काढावा लागतो कीं काय–अशी पोरकट भीति माझ्या मनांत उभी राहिली होती–म्हणूनच ताईच्या ह्या आश्वासनानें मला पुष्कळसें बरें वाटलें.

बराच वेळपर्यंत आम्हीं कांहींच न बोलतां स्तब्ध राहिलों होतों. त्या स्तब्धपणाची मला फार भीति वाटूं लागली. आंत काळोख, बाहेर हलकल्लोळ, ह्या दोन प्रकारच्या विरोधांनीं जीव कसा गांगरून गेला होता.

ती स्तब्धता मोडण्यासाठीं कांहीं तरी बोलावें म्हणून मी ताईला म्हटलें,

" ताई, माझी भाषा खरीच का ग इतकी बावळट आहे ? "

त्या काळोखांत सुद्धां ताईचें स्मितहास्य मला दिसून आलें.

ताई म्हणाली, ." व्याकरणाच्या दृष्टीनं पाहिलं तर कोंकणची भाषा अगदीं व्याकरणशुद्ध आहे—पण ह्या पुण्याच्या नजरेनं पाहूं लागलं तर मात्र ती बावळट ठरते. "

मी पुन्हां विचारलें, " ह्या पुण्याच्या नजरेंत असं विशेष काय आहे ? "

ताई हंसली. अगदीं मला ऐकूं येईल इतकी हंसली आणि म्हणाली, " पुण्याच्या नजरेंत काय नाहीं ? शिवाजी महाराजांचं शिक्षण पुण्यांत झालं, पेशव्यांची गादी पुण्यांतच, नानाफडणीस पुण्यांतच झाले, पानपतची लढाई पुण्यांतच झाली, दुसरे बाजीराव पुण्यालाच चमकले आणि मराठ्यांचं राज्य

पुण्यांतच लयाला गेलं–पुण्याची परंपरा एवढी मोठी आहे. आतां पहा, चिपळूणकरही पुण्यांतच झाले, टिळक–आगरकरही पुण्यांतलेच..."

मी मध्येंच म्हणालें, " नाहीं, टिळक चिखलगांवचे. त्यांचं गांव अगदीं आमच्या गांवालगतच आहे. "

ताई म्हणाली, " तें खरं–पण जग ओळखतं त्यांना पुण्याचे म्हणून. तसं बारकाईनं पाहूं गेलं तर हीं सारींच माणसं कोंकणचीं आहेत. पेशवे श्रीवर्धनचे, नाना फडणीस वेळशीचे, चिपळूणकरांचं नांवच ते कुठले हें सांगत आहे. आगरकरांचं घराणं मुळचं आंजर्ल्याचं. कुठल्याही कोंकणस्थाचं मूळ कोंकणांच सांपडायचं–पण होतं असं, तोच कोंकणचा गृहस्थ पुण्याला आला कीं कोंकण विसरूं लागतो. एवढंच नव्हे, तर मी कोंकणचा आहें असं म्हणायची त्याला शरम वाटूं लागते आणि मूळ गांवनांव विचारलं तर सातारा सांगलीचीं नांवं सांगतो–पण कोंकणचं म्हणून नांव घेत नाहीं ! माझा जन्म ह्या पुण्यांत झाला पण माझं सासर आहे कोंकणांत. दोन्ही परींनं पुणं आणि कोंकण मला पडताळून पहायला मिळालं. ह्याच विषयाचा अभ्यास करण्यांत आजवर माझा जन्म गेला. तुला मी किती तरी सांगितलं असतं पण आज तें समजण्या-सारखं तुझं वय नाहीं..."

ताई मध्येंच थांबली आणि तिनें एक दीर्घ निश्वास सोडला मला. गहिंवर आला आणि ताईला घट्ट बिलगून मी म्हटलें, " ताई, अगदीं साऱ्या जन्मांत मला तूं कध्धीं कध्धीं अन्तर देणार नाहींस अशी शपथ घे पाहूं. "

कांपऱ्या स्वरानें ताई म्हणाली, " शपथच कशाला घ्यायला हवी ? पूर्वजन्मींच्या लाग्याबांध्यांनीं आपण दोघींही बांधल्या गेलों आहोंत–पण कसले हे लागेबांधे ? जितकी मी तुला जवळ आहें तितकीच दूर आहें. तूं असणार इथं आपल्या सासरीं, मी असणार माझ्या सासरीं. अन्तर देणार नाहीं म्हणून म्हटलं तर तें खरं कसं व्हायचं ? केव्हां आठाकाळीं बारामाशीं भेटीचा योग यायचा ! काय असेल तें असो–नात्याचा संबंध आला म्हणून नव्हे, पण मन कसं तुझ्याकडे ओढ घेतं ! पोटच्या मुलीकडे देखील माझं मन इतकं ओढ घेत नसे. राहून राहून मनांत येतं, कीं तुझं पुढं कसं होणार ? चार दिवसांनीं मला सासरीं जायचंच आहे. तूं इथं एकटी पडशील आणि हीं माणसं तुला फाडफाडून खातील. मी इथं आहें म्हणून त्यांच्या दुष्टपणाला थोडा आळा बसला आहे, पण मीं निघून गेल्यावर..." ताई एकदम

थरारली—माझ्याही अंगावर भयानक कांटा उभा राहिला. खरेंच,: ताई निघून गेल्यावर माझें कसें होणार ?

क्षणभर थांबून ताई म्हणाली, " त्यांना वाटलं होतं, कीं मीही त्यांच्यांत सामील होईन ! तूं आलीस त्या वेळीं, तुझ्याकडे पाहूंसुद्धां नये असं पहिल्यानं वाटलं. मनांतून अगदीं तिटकारा आला होता तुझा—पण तुझ्या नजरेला नजर भिडतांच तो तिटकारा कुठल्याकुठं निघून गेला. असं वाटलं, तुझा काय अपराध ? तूं कांहीं आपणहून आमच्या सुखांत माती कालवायला आली नाहींस ! उलट पाहिलं, तर तुझ्याच आयुष्याची माती झाली आहे आणि ती आम्ही केली आहे."

ताईच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. माझ्या केसांवरून हात फिरवीत ती पुन्हां म्हणाली, " आम्ही तुझ्या आयुष्याची माती केली. सोन्यासारखं जिणं, पुढं एवढं आयुष्य कसं जाईल कोण जाणे ! भलतींच चित्रं डोळ्यांसमोर उभीं रहातात. असं वाटतं, माझी बाळ जिवंत असती आणि तिच्यावर हा प्रसंग आला असता तर मी काय केलं असतं ? म्हणूनच तुझ्याकडे माझं मन एवढं ओढतंय्."

माझ्या मनांतही त्या वेळीं भलभलते विचार येऊं लागले. ताई बोलत होती पण तिच्या बोलण्याकडे माझें पुरेसें लक्षही नव्हतें. भलभलत्या कल्पना मनांत येऊन मन कसें वेडेंपिसें झालें होतें ! हीं घरचीं सारीं माणसें अशा प्रकारचीं. एकच माणूस पाहिलें नाहीं—तें कसें असेल ?: आत्तांच्या प्रमाणें त्यावेळीं फोटो-ग्राफांचा सुकाळ झाला नव्हता—त्यामुळें लग्नावेळच्या ओझरत्या आठवणीवरून कसलीच कल्पना करतां येत नव्हती.—आणि त्या वेळीं काय डोळे भरून पाहातां येत होतें ! बरें, चोरून आडून पाहीन म्हटलें तर काय पहायचं ? त्या माझ्या तसल्या पोरवयांतसुद्धां डोळे भरून पहावें—ही कल्पनाही असह्य झाली होती.

मी चटकन् ताईला म्हटलें, " ताई..."

पुन्हां माझी मलाच लाज वाटली आणि मी गप्प राहिलें. माझ्या पाठीवरून हात फिरवीत ताईनें विचारलें, " कां ? थांबलीसशी ? काय विचारीत होतीस ?"

मी म्हटलें, " कांहीं नाहीं. विचारावं असं मनांत आलं होतं खरं—पण बोलायला तोंडच घेत नाहीं."

ताई म्हणाली, " समजलं. माझ्या ध्यानांत आलं. सारींच माणसं हीं अशीं असलेलीं दिसलीं म्हणजे तो प्रश्न मनांत यायचाच. ऐकलंस माई, तशी कांहीं

काळजी करूं नकोस. मी त्यांची मुलगी आहें एवढ्यावरूनच काय ती कल्पना कर. तुझ्याजवळ जास्त काय बोलूं ! तसं बोलण्याचं तुझं वय नव्हे आणि माझं नातंही नव्हे."

एक दीर्घ निश्वास टाकून ताई स्वस्थ राहिली.

घरांतही जिकडे तिकडे सामसूम झालें होतें. नानासाहेबांचा हलकल्लोळ पूर्वीच थांबला होता आणि बाकीचीं माणसें झोंपीं गेलीं असावींत असें वाटत होतें. आमच्या चौकशीला कुणीच आलें नव्हतें. लग्नघरचें जेवण उशीरां झालेल असल्यामुळें आम्हां कुणाला जेवायचें नव्हतें हें जाऊबाईनांही माहीत होतें.

त्या स्तब्धतेची मला भीति वाटूं लागली. कांहीं तरी बोलावें ह्या उद्देशानें 'ताई' म्हणून मी बोलण्यास प्रारंभ केला.

ताई माझें मस्तक आपल्या हातांत दाबून म्हणाली, "आतां बोलायचं नाहीं. अगदीं गुपचुप निजायचं. मनांत कांहीं विचार आणायचे नाहींत आणि कसला विचारही करायचा नाहीं. देवाचं नांव घेऊन डोळे मिटून स्वस्थ पडायचं."

मी डोळे मिटून झोंप आणण्याचा प्रयत्न केला--पण तो फुकट गेला.

मी ताईला पुन्हां म्हटलें, "ताई, मला झोंप येत नसली म्हणजे माझी आई मला थोपटीत असे."

मला ऐकूं येईल इतक्या मोठ्यानें हंसून ती म्हणाली, "मग? मी थोपटूं का तुला?"

मी नुसतें 'हुं' म्हटलें. ताई मला थोपटूं लागली आणि त्या थोपटण्यामुळें माझा डोळा केव्हां लागला तें मला कळलें नाहीं.

अशा रीतीनें दिवसांपाठीमागून दिवस चालले होते. जाऊबाईच्या स्वभावाचा मात्र मला केव्हांच अंत लागला नाहीं. ती फारशी कोणाशींच बोलत नसे– मुलांना खेळवतांना तिनें कधीं गाणें सुद्धां म्हटलें नाहीं! पण माझ्याविरुद्ध वन्संना चिथविण्यांत तिचा हात असे ह्याची मला मुळींच शंका नव्हती. कशाला हव्यात त्या आठवणी? अहेवपणाच्या अर्धघडीचा तो सासुरवास आज स्वप्नासारखा वाटतो. ती एक प्रकारची झोंप होती. त्या झोंपेंतच मी सासुरवासाचे चटके अनुभवीत होतें. त्या सासुरवासाच्या चटक्यांनीं अकरा वर्षांच्या अल्पवयांतही मला जागृति आली होती. त्या जागृतीवर पांघरूण घातलेलेंच बरें. सासुरवास कशा प्रकारचा असतो ह्याची कल्पना आजच्या मुलींना होणें शक्य नाहीं आणि होण्याची आवश्यकताही नाहीं. त्या वेळच्या सुना आज नुसत्या सास्वाच नव्हेत, तर आजेसास्वा झाल्या आहेत. सुनेचा छळ करण्याची कल्पना आतां बहुतेक नाहींशी झाली आहे. तसेंच पाहूं गेलें तर हल्लीं सासुसुनेचा सम्बन्ध असतो कुठें? लग्न होतांच ज्याचा त्याचा सवतासुभा उभारला जातो. नणंदेनें जावेच्या चुगल्या कराव्या, जावाजावांतल्या कलागती सासूबाईच्या न्यायासनासमोर जाव्या आणि मर्जीगैरमर्जीप्रमाणें सासूबाईनीं त्याचे निकाल द्यावे, हा इतिहास आतां पुराणा झाला आहे. सासूची ओळख सुनेला नाहीं, जावेची ओळख जावेला नाहीं आणि नणंदाजावा कधीं एकजागीं येतही नाहींत, हा आजचा इतिहास आहे.

एवढ्यासाठींच सासुरवासाच्या त्या हृदयभेदक गोष्टी न लिहिलेल्याच बऱ्या. पुढच्या पिढीला त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. मी माझें हें चरित्र लिहीत आहें तें केव्हांना केव्हांतरी प्रकाशांत येणार आहे अशी माझी मनोदेवता सांगत आहे.

पुढल्या पिढीला माझ्या चरित्राच्या वाचनानें कसला ना कसला तरी धडा मिळावा असें मला वाटलें, तर तें अस्वाभाविक नाहीं. म्हणून ज्या गोष्टींचा पुढल्या पिढीला कांहीं उपयोग नाहीं त्या गोष्टीचा उच्चार करून उगीच जुनीं दुःखें कशाला जागवूं?

असेंच कांहीं दिवस गेले. एके दिवशीं मला नेण्यासाठीं बाबा येऊन पोहोंचले. आतां या जाचांतून सुटणार ह्या विचारानें मी हुरळून गेलें. माहेरीं जाईन, आईला

भेटेन, बनीची हकीकत विचारीन—ह्या आणि आणखी अशाच कितीतरी कल्पना सारख्या माझ्या मनांत खळबळत होत्या. त्यामुळें रोजच्या कामाची आठवण राहिली नाहीं. पुजेचें साहित्य करायचें राहिलें—म्हणून नानासाहेबांनीं माझ्या बेचाळीस पिढ्या उद्धारल्या ! समोर बाबा असल्याचीही त्यांनीं खंत बाळगली नाहीं ! तो त्यांचा नारसिंहाचा अवतार पाहून बाबासुद्धां घाबरून गेले.

ताईला याच वेळीं कोंकणांत आपल्या सासरीं जायचें होतें. तिनेंही आमच्याच बरोबर निघावें असें सर्वानुमतें ठरलें. बाबा ताईला म्हणाले,

"चार दिवस आमच्या गांवीं राहून जा ना ! एका रात्रीचा प्रवास आहे. सहज गाडीनं जातां येईल. तेवढीच घरांत ओळख होईल आणि लोभानं लोभ वाढेल. मथूचाहि ओढा दिसतो—तेव्हां तिलाही तितकंच बरं वाटेल."

वन्सं हातवारे करीत म्हणाल्या, "हो हो तर ! नुसता ओढाच कां—मोठी नदी आहे ! अष्टौप्रहर मायलेकींचीं खलबतं चालू असतात. काय एवढं एकमेकींशीं बोलत असतात तें देव जाणे ! बरं का गोदे, तूं जाच ह्यांच्या बरोबर—म्हणजे चोरून चावून बोलायला नको. अगदीं उजळ माथ्यानं चांगल्या सभा भरवा आणि नणंदाजावांच्या ज्या कांहीं उखाळ्यापाखाळ्या काढायच्या असतील त्या चांगल्या पोटभर काढून घ्या. कोंकणच्या भिक्षुकांसमोर आमच्या अब्रूचा काय नगारा वाजवायचा असेल तो पुरा वाजवून घ्या. आम्हीं कांहीं कुणाला भीत नाहीं. कोंकणच्या भिकारड्यांनीं आम्हांला बहिष्कार घातला म्हणून इथं कांहीं आम्हीं उपाशी मरणार नाहीं. जा—जाच म्हणावं ! एकदां होऊन जाऊं द्या काय व्हायचं तें. सगळी खळमळ एकदां ओकून टाका."

बाबा ओशाळल्यासारखे झाले. ते म्हणाले, "मी त्या अर्थानं कांहीं बोललों नाहीं. आयतींच आम्हीं कोंकणांत जात आहोंत. त्यांचंही सासर कोंकणांतच आहे. तिकडनं कोणी माणूस येऊन त्याचा येण्याजाण्याचा खर्च होण्यापेक्षां एकाच खर्चांत काम होऊन जाईल—म्हणून मी आपलं नुसतं सुचवलं. नसली तुमची इच्छा तर पाठवूं नका."

वन्सं म्हणाल्या, "आमच्या इच्छेवर थोडाच आमचा संसार चालला आहे ! आम्हीं आतां पिकलीं पानं—केव्हां गळून पडूं ह्याचा नेम नाहीं ! हीं आतां तरणीताठीं माणसं—आमच्यासारख्या पिकल्या पानांचा वारा थोडाच घेणार आहेत ? त्यांच्या मनाला येईल तसं करतील."

वन्संचें हें बोलणें चाललें असतांना नानासाहेब बाहेरून घरीं आले. नानासाहेब समोर आलेले पहातांच वन्सं म्हणाल्या, "ऐकलंस नाना, गोदी देखील सावित्रीबरोबर जायला निघाली आहे!"

नानासाहेब म्हणाले, "आज कुणीही माझ्याशीं बोलूं नका. आज माझं डोकं अगदीं पिकून गेलं आहे. उद्यां केसरी निघायचा आणि आज खाडीलकरांना आजारी पडायची लहर लागली! आर्टिकल तयार नव्हतं—मग काय करतां? तसाच बसलों आणि आर्टिकल खरडून काढलं. बाकीच्यांनीं वाचून पाहिलं तेव्हां ते म्हणाले, 'टिळकांनीं तुरुंगांतून लिहून पाठवलं का?'—उगीच नाहीं इतकीं वर्षे प्रुफं तपासलीं! टिळकांचं वाक्यन् वाक्य, शब्दन् शब्द कसा हाडींमाशीं खिळून बसला आहे. काय शहामत आहे कुणाची कीं हें आर्टिकल टिळकांचं नाहीं असं म्हणण्याची! उद्यां खाडीलकर सुद्धां गार होतील. आज मला आत्मविश्वास उत्पन्न झाला. उद्यां खाडीलकरांना सांगतों, 'जा त्या बकाल मुंबईत आणि तिथं हवं तर काढा एकादं वर्तमानपत्र.' आतां ह्या केसरी ऑफिसांत त्यांची जरूरी राहिली नाहीं."

वन्सं म्हणाल्या, "पुरे झालं तुझं केसरीहपीस. आधीं ह्यांच्या जाण्याचं काय तें नक्की कर. गोदीला पाठवायची का शास्त्रीबुवांबरोबर?"

नानासाहेब म्हणाले, "तें मी काय सांगूं? तिची ती मुखत्यार आहे. तिला वाटलं तर जाईल ती! मला काय, गेली तरी सारखीच आणि राहिली तरी सारखीच!"

ताईकडे वळून नानासाहेबांनीं विचालं; "काय ग गोदे, तूं जाणार आहेस वाटतं ह्यांच्याबरोबर?"

ताई म्हणाली, "माझी मी मुखत्यार आहें ना! मग मला कशाला विचारतां? मला वाटलं तर जाईन, नाहीं तर राहीन."

नानासाहेबांचा राग भडकला! ते माझ्या बाबांकडे वळून म्हणाले, "पहा शास्त्रीबुवा, आतां तुम्हींच पहा. मी अगदीं सरळ विचारलं होतं—पण कशी वांकडा जाब देते आहे पहा! हा तुमच्या कोंकणच्या पाण्याचा गुण. आम्हीं पुण्याचीं माणसं अगदीं सरळ—आंतबाहेर कांहीं नाहीं. जें मनांत येईल तें बोलायचं. चोरून कांहीं ठेवायचं नाहीं. हीं तुमचीं कुचकीं कोंकणी बोलणीं ऐका आणि आम्हीं तुम्हां लोकांना नांवं ठेवतों तें योग्य आहे कीं अयोग्य आहे हें तुमचं तुम्हींच पहा!"

रागारागानें नानासाहेबांनीं डोक्याचा रुमाल ओढून काढून फेंकून दिला आणि भराभर कपडे काढून टाकून तडक परसदारचा रस्ता धरला.

बाबा अगदीं स्तंभित होऊन उभे राहिले होते.

ताई गालांतल्या गालांत हंसत होती.

मी आळीपाळीनें ताईच्या आणि बाबांच्या चेहऱ्याकडे पहात होतें.

वन्संची स्वारी घरांत निघून गेली होती.

थोड्या वेळानें बाबा म्हणाले, " मग, मी नुसता मथूलाच घेऊन जाऊं तर ? "

ताई निश्चयाच्या स्वरानें म्हणाली, " छीः छीः–असं कुठं झालं आहे ? जायचं तें आपण सर्वांनीं बरोबरच जायचं. रात्रीं दहाच्या गाडीनं निघूं आणि सरळ धक्क्यावर जाऊं–म्हणजे साताची बोट मिळायला अडचण पडणार नाही. "

ताईचें हें भाषण एकून बाबांनाही आनंद झाला. मला आनंद झाला हें निराळें सांगणें नकोच.

माझ्या ताईशी माझ्या आईची भेट केव्हां करून देतें असें मला झालें होतें,

त्यानन्तर नानासाहेबांनीं आणि वन्संनी ताईला कांहींच विचारलें नाहीं. ताईनें बांधाबांधी करायला सुरवात केलेली पाहून तीही आमच्या बरोबर जाणार ह्याची खूणगांठ सर्वांनींच बांधली होती.

निघायच्या वेळेला नानासाहेब ताईला म्हणाले, " जायच्या वेळीं तुला एक लुगडं घेऊन दिलं पाहिजे होतं–पण आयत्या वेळीं तुझा बेत झाला–म्हणून माझा नाईलाज आहे. आतां लुगड्याचे पैसे देऊं का तुझ्याजवळ ? "

ताई म्हणाली, " कांहीं नको. पुढल्या खेपेला येईन त्या वेळीं एकदम दोन लुगडीं द्या म्हणजे झालं ! "

ठरल्याप्रमाणें आम्हीं मुंबईत न थांबतां परभारेंच बोटींत बसलों.

माझ्या मनांत मुंबईत जावें असें होतें. एकदां जिज्ञासा तृप्त व्हावी आणि मनाची रुखरुख घालवावी ह्या उद्देशानें मी ताईला तसें म्हटलें देखील ! पण मुंबईत जाऊं नये असें तिलाच वाटत होतें असें तिच्या निश्चयावरून दिसलें. बाबा देखील कदाचित् कबूल झाले असते–पण परभारें धक्क्यावर जाण्याचा ताईनें आग्रह धरला.

योग्य वेळीं आम्हीं गांवीं पोहोंचलों.

ज्या वेळीं आम्हीं गांवीं पोहोंचलों त्या वेळीं चांगलें उजाडलें होतें. आम्हीं घराच्या दाराशीं जातों न जातों तोंच आई दारांतून बाहेर आली. मी धांवतच जाऊन कडकडून तिला मिठी मारली. ताई चार पावलें मागें होती. आई हंसत हंसत माझ्या तोंडावरून हात फिरवून म्हणाली,

"काय केलंस ग हें? मी नुकतं कुठं अंग धुतलं होतं. बोटीवरच्या शिवा-शिवीनं मला तशीच बिलगलीस! एवढं कसं तुझ्या ध्यानांत येत नाहीं? मला पुन्हां अंग धुवावं लागेल ना आतां?"

आई समोर दिसतांच मी ताईला जवळजवळ विसरलेंच होतें.

ताईनें पुढें येऊन आईला नमस्कार केला. आई तिच्याकडे नुसती पहातच राहिली. मी पुढें होऊन आईला सांगितलें, "आई ही तुझी नात." असें म्हणून मी खो खो हंसूं लागलें!

माझी नजर आईच्या आणि ताईच्या चेहऱ्यांकडे गेली. माझें हंसणें तसेंच थांबलें आणि मी गंभीर झालें.

दोघीही एकमेकींच्या चेहऱ्याकडे पहात—जसा कांहीं परस्परचा मनाच्या ठाव शोधीत—होत्या!

इतक्यांत बाबा पुढें आले आणि म्हणाले, "ऐकलंस का? ही मथूची मुलगी–सावत्र मुलगी..."

तशाही स्थितींत आईच्या तोंडावर थोडेंसें हंसूं झळकलेंच!

बाबा पुढें म्हणाले, "हिचंही सासर जवळच आहे. तिला सासरीं जायचं होतं. म्हटलं इथं चार दिवस राहून जा–तेवढाच सर्वांचा परिचय होईल. कसं?"

आई ताईला म्हणाली, "हातपाय धुऊन आंत येतां कीं अशाच विहिरीवर स्नानाला जाऊं या?"

ताईनें उत्तर दिलें, "धुवायचे कपडे काढून घ्यायचे आहेत तेवढे घेतें आणि विहिरीवरच येतें."

थोड्याच वेळांत आईची आणि ताईची गट्टी जमली. त्यांना बोलत असतांना कोणी पाहिलें असतें तर पाठच्यापुढच्या बहिणीशाच वाटल्या असत्या! घटकाच्या घटका त्या दोघी सारख्या बोलत बसत असत. मी गेलें कीं त्यांचें

बोलणें थांबायचें !–मला मोठें आश्चर्य वाटलें. माझ्या आईला ती इतकी जवळची झाली आणि माझीच आई मला परकी मानूं लागली ! दोघींचीं अगदीं सारखीं हितगुजें चाललीं होतीं–आणि मी आलें कीं त्यांचें बोलणें थांबावें–असें दर खेपेला घडत होतें !

त्यांच्या ह्या वागण्याचा मला अगदीं राग आला आणि त्या रागासरशी मी बनीच्या घरीं गेलें. बनीचें सासर आणि माहेर त्याच गांवांत असल्यामुळें तिचे सासरमाहेरचे प्रवास दिवसांतून तीन वेळां होत असत. मी गेलें त्या वेळीं बनी घरीं नव्हती. बनीच्या आईनें मला बसायला पाट दिला आणि पुण्याच्या हकी-कती विचारायला सुरवात केली–" घरीं माणसं किती आहेत, घर कोणत्या पेठेंत आहे, पाणी किती दूर आहे, काम किती करावं लागतं ? "–वगैरे सर्व गोष्टींची चौकशी करून झाल्यावर बनीच्या आईनें विचारलें, " तुझ्याबरोबर आज आली आहे ती कोण बाई ? " मी अगदीं शरमिंदी झालें. ज्या उत्साहानें सकाळीं मी आईला आमचें नातें सांगितलें तो उत्साह इथें उपयोगी पडेना ! माझ्या तोंडांतून शब्दच बाहेर पडेना. तिनें पुन्हां विचारलें, " कुणी नात्याची आहे कीं आपली शेजारीण आहे ? " मी कांहीच न बोलतां स्वस्थ राहिलें. कुठली मला ही बुद्धी झाली बनीच्या घरीं येण्याची, असें मला वाटलें ! अशी एकटी न येतां ताईला बरोबर घेऊन आलें असतें तर हें संकट आपोआप टळलें असतें. परक्या माणसांना ह्या प्रश्नाचें उत्तर कसें द्यावें हें ताईलाच चांगलें सुचलें असतें. बनीच्या आईनें पुन्हां विचारलें, " कुणी शेजारीण आहे वाटतं ? " मी मानेनेंच ' नाहीं ' म्हटलें. ती म्हणाली, " तर मग, नात्याची आहे ? " मी मानेनें ' होय ' म्हटलें. बनीची आई माझा पिच्छा सोडीना–तिनें सारखा प्रश्नाचा मारा सुरू केला. " तर मग कोण ? सासू ?–जाऊ ?–नणंद ?–" प्रत्येक प्रश्नाला मी मानेनें ' नाहीं ' म्हणून सांगत होतें. मग तिनें अगदीं चमत्कारिक चेहरा करून मला विचारलें, " सासू नव्हे, जाऊ नव्हे, नणंद नव्हे ! नात्याची तर आहे म्हणतेस–मग ही आहे तरी कोण ? अगदीं दूरची कुणी नातलग आहे का ? " मी मानेनें ' नाहीं ' म्हणून म्हटलें. ती सारखी विचारीतच होती आणि मी ' होय ' किंवा ' नाहीं ' अशीं मानेनें उत्तरें देत होतें. जगांतील बहुतेक सर्व नात्यांचा उच्चार झाला तरी माझ्याकडून नात्याचा थांग लागत नाहीं असें पाहून बनीच्या आईची जिज्ञासा अधिकच वाढली. ती अगदीं त्रासून मला म्हणाली, " असलं हें नातं तरी कसलं ? दूरची नाहीं म्हणतेस आणि जवळच्या

कुठल्याही नात्याला होकार देत नाहींस. स्पष्ट तोंड उघडून सांगायची बुद्धी कांहीं देव तुला देत नाहीं ! माणसांनं ह्यांत समजावं तरी काय ?"

मी कांहीं न बोलतां मान खालीं घालून अगदीं स्वस्थ बसलें होतें.

इतक्यांत बनी आली आणि मला पहातांच दारांत थबकून राहून म्हणाली, "अगबाई ! पुणेवाली आली वाटतं ? बरी इतक्या लवकर आमची आठवण झाली ! आणि अगदीं एकटीच आलीस का ? मुलीला नाहीं आणलंस कुठं कडेवरनं ?"

बनीची आई अगदीं आश्चर्यचकित होऊन म्हणाली,

"म्हणजे ? मुलीला ?—आणि कडेवरनं ?"

"तूं पाहिली नाहींस वाटतं हिची मुलगी ? अगदीं कुकुलं बाळ आहे बरं का आई !" बनी म्हणाली.

"मला नाही कुठं दिसली ! सकाळीं मी येतांना पाहिलं त्या वेळीं हीं तीन माण सं होतीं—एक शास्त्रीबुवा, एक ही आणि एक ती पाहुणी." बनीची आई म्हणाली.

"ती पाहुणीच हिची मुलगी !" बनी मोटमोठ्यानें हंसत म्हणाली.

बनीची आई बनीवर एवढाला डोळा करून म्हणाली, "चल बने, भलतंच कांहीं बोलूं नये. ती केवढी आणि तूं केवढी ! ती पाहुणी बाई, मला वाटतं, माझ्या वयाची असेल—कदाचित् मोठीही असेल !"

बनी अगदीं निर्लज्जपणानें हंसत पुन्हां म्हणाली, "तेंच कुकुलं बाळ हिची मुलगी—म्हणजे हिच्या सवतीची मुलगी !"

"खरं काग मथे ?" बनीच्या आईनें माझ्याकडे वळून विचारलें.

मी एक क्षणभर थांबून मानेनें 'होय' म्हणून सांगितलें. मान वर करून त्या दोघींच्याही चेहऱ्याकडे पहाण्याचा मला धीर झाला नाहीं. मी चट्कन उठलें आणि "जातें आतां." असें म्हणून दारापर्यंत गेलेंही.

बनी म्हणाली, "अशी अगदीं घोड्यावरून कां आलीस ? जरा घटकाभर बसून पुण्याच्या गोष्टी सांगशील कीं नाहीं ! कीं पुण्याला गेल्यापासून आम्हां खेडवळांचा कंटाळा येऊं लागला, कीं मुलीनं सांगितलं आहे आमच्याशीं बोलूं नकोस म्हणून ? हो—लाडकी मुलगी—तिचा शब्द कसा मोडशील तूं ? तिला कां नाहीं आणलंस बरोबर ? झिम्माफुगडी तरी खेळलों असतों घटकाभर !"

मी संतापानें नुसती फणफणत होतें. तोंडातून शब्द कसा तो बाहेर फुटेना. मी बनीच्या आईकडे वळून म्हटलें, "कुंकू लावायचं असलं तर लावा—नाहींतर ही मी अशीच चाललें !

बनीची आई म्हणाली, "इतका फणकरा यायला ती बिचारी असं बोलली तरी काय ? पुण्याला गेलीस म्हणून काय अगदीं ही होऊं नकोस ! अजून पुष्कळ दिवस निघायचे आहेत—इतक्यांतच आपलं गांवशिंव विसरून चालायचं नाहीं."

मी हातपाय आपटीत घरांत गेलें, कुंकवाचा करंडा घेतला, कुंकू लावलें आणि तशीच तडक घराबाहेर निघालें. मायलेकी मोठमोठ्यानें खो खो करून हंसत होत्या. त्यांच्या घरापासून बरीच दूर आलें तरीही मला तें खो खो हंसणें अगदी स्पष्ट ऐकूं येत होतें. दोघीही माझ्या दोन्ही कानांशी लागून खो खो हंसताहेत असें मला वाटूं लागलें. त्या हंसण्याचा आवाज सारखा वाढत होता ! त्या आवाजानें मी अगदीं भेदरून गेलें आणि पळत सुटलें.

घरीं आलें तों आई आणि ताई बोलत बसल्या होत्या. मला संताप आला. काय एवढें कुचुकुचु बोलताहेत ? आईजवळ जायचें मनांत होतें पण त्यांचें तें बोलणें चाललेलें पाहून मी थबकलें, मागें वळलें आणि खोलीत जाऊन बिछान्यावर धाडकन् अंग टाकून दिलें.

ताई आणि आई दोघींही धांवतच खोलींत आल्या.

आईनें मला जवळ घेऊन विचारलें, "काय झालं बाळ ?"

मी रागानें उत्तर दिलें, "झालं माझं कपाळ !"

आई म्हणाली, "असं भलतंच कांहीं बोलूं नये. काय झालं ?"

मी सारखी फणफणत रडत होतें. एकदां वाटे, आईला सांगावें—पण काय सांगावें, कसें सांगावें, ताई समोर असतांना कोणत्या शब्दांनीं सांगावें—मला कांहींच सुचेना ! आई पुन्हां पुन्हां विचारीत होती आणि मी नुसती रडत राहिलें होतें.

मध्येंच ताईनें विचारलें, "माई, कुठं गेली होतीस ?"

तिच्या त्या शब्दांत सर्व कांहीं सांटवलें होतें. तिच्या त्या एकाच शब्दानें मी शान्त झालें, देहभानावर आलें आणि उत्तर दिलें, "बनीच्या घरीं."

आई म्हणाली, "समजलं. कशाला गेली होतीस त्यांच्या घरीं ? ऐकलंस मथू, कुठं कुणाच्या घरीं जाऊं नकोस. दैवानं आपल्या पायाला खिळ घातली

आहे. घरांतच बसून रहात जा. वाटलं तर पोथी वाच. मलाही पोथी वाचून ऐकीव. कंटाळाच आला तर परसांत फिरून ये—पण दुसऱ्याच्या घरीं जाणं नको. मला अगदीं हेंच इथं वाटत होतं—तूं बनीच्या घरीं जाशील, तिथं तीं माणसं तुला कांहींतरी बोलतील आणि मग घरीं रडत येशील. शेवटीं झालंही तसंच."

मी डोळे पुसून आईच्या तोंडाकडे पाहिलें आणि म्हटलें, "नाहीं आई, मला कुणी तसं टाकून बोललं नाहीं."

"तर मग कां रडत होतीस?" आई म्हणाली.

"मला कांहीं तसं बोललं नाहीं कुणी—पण ताईचं नातं काढून घालूनपाडून बनी कांहींतरी आचरटासारखं बोलली." मी उत्तर दिलें.

आई अगदीं गंभीर झाली आणि स्तब्ध बसली.

अगदीं खिन्नपणानें हंसत ताई म्हणाली, "लोकांच्या बोलण्याचं असं वाईट वाटून घेऊन आतां चालायचं नाहीं. आतां ह्याच प्रसंगाशीं झगडायचं आहे. लोकं बोलणारच! तीं कांहीं केल्या थांबणार नाहींत! पापं केलीं आम्हीं आणि त्यांचीं फळं भोगावीं लागणार तुम्हांला! लोकांच्या भयानं जर असं गांव टाकलं तर मनाला घट्टपणा कसा येणार? आहे ही स्थिति कांही बदलतां येत नाहीं—आणि ही स्थिति आहे तोंपर्यन्त लोकं परोपरीनं टोमणे देत रहाणारच! हे टोमणे सहन करायला मन तयार केलं पाहिजे. अगदीं निगरगट्ट केलं पाहिजे. प्रत्येक टोमणा अगदीं थट्टेवारी—अगदीं हंसण्यावारी नेला पाहिजे—म्हणजे आपोआपच त्याचा तीव्रपणा कमी होईल."

ताईचें हें व्याख्यान मी अगदीं झांकल्या कानानें ऐकत होतें. माझ्या मनावर त्याचा यत्किंचितही परिणाम झाला नाहीं. अंतःकरणाच्या कुठल्या तरी भागांत ते शब्द कुठेंतरी प्रतिबिंबित झाले असतील—पण त्या वेळीं मी तिकडे लक्ष पुरवायचें नाहीं असेंच ठरवलें होतें. मला कोणत्या प्रकारानें तीं माणसें बोललीं असतील ह्याची जी कल्पना ताईनें केली ती अगदीं बरोबर होती. ताईचें हें अचुक निदान पाहून मलाही तिच्या थोरपणाबद्दल आदर वाटला.

मला राहून राहून राग येत असे तो आईचा! एवढ्या दिवसांनीं मी घरीं आलें तर माझ्याशीं बोलायचें टाकून ती घटकाच्या घटका ताईबरोबर बोलत बसे. माझ्यामुळें हिची ओळख.—त्या मलाच टाकून त्या दोघींनीं प्रहरचे प्रहर बोलत

बसावें हें पाहून माझ्या अंगाचा तिळपापड होत असे. पण पुन्हां विचार करूं लागलें म्हणजे मनाला वाटे, ह्यांत कांहीं वावगें नाहीं. सारख्या वयाचीं दोन माणसें चार दिवसांच्या सहवासासाठीं एका जागीं आलेलीं-एकाच दुःखानें दोघांना बांधलेसें वाटलें तर बोलेनात का! चार दिवसांनीं ताई जाणार आहे-तोंपर्यन्त काय तें बोलून घेतील-नन्तर मी आहेंच!

एके दिवशीं बनी आणि बनीची आई आमच्या घरीं आली. ह्या धिंडका आलेल्या पाहून माझें पित्त अगदीं खवळून गेलें! असें वाटलें, कीं कुणी सांगितलें होतें यांना इथें यायला? प्रत्यक्ष विचारावें असें देखील क्षणभर माझ्या मनांत आलें, पण कसाबसा मी मनाला आळा घातला. पुण्याच्या गोष्टी सुरू झाल्या. बराच वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर बाई मूळपदावर आली-बनीच्या आईनें अगदीं उघड उघड विचारलें—,

“ ही मथीची मुलगी वाटतं! बरं झालं-मुलीला आई मिळण्यापेक्षां आईला आपली एक आईसारखी मुलगी मिळाली. आतां तुम्हांला कांहीं काळजी करायला नको.”

ताई म्हणाली, “ कां काळजी करायला नको? मी कांहीं पुण्याला असत नाहीं. मी असतें इकडे कोंकणांत.”

“ पुण्याच्या मुली कोंकणांत देतात म्हणायचं तर? ” बनीची आई आश्चर्यचकित होऊन म्हणाली.

ताईनें उत्तर दिलें, “ ज्यावेळीं माझं लग्न झालं त्या वेळीं आम्हीं सारींच कोंकणांत होतों. माझं माहेर आणि सासर तुमच्या बनीप्रमाणंच एकाच गांवीं होतं. आतां माझ्या माहेरचं असं कांहीं शिल्लक राहिलेलं नाहीं. घरसुद्धां पडून गेलं. दादांना पहिल्यानं पुण्याला नोकरी होती. तिथं सदाशिवपेठेंत त्यांनीं एक लहानसं घर विकत घेतलं आणि अशा रीतीनं आम्हीं पुण्याचीं बनलों. माझं सासर इथं कोंकणांतच असल्यामुळें पुण्याला जायचा योग फारच क्वचित येतो. तुम्हीं जशा कोंकणच्या आहांत तशीच मीही कोंकणचीच आहें—असं लांब लोटून पहायला नको कांहीं माझ्याकडे! ”

ताईच्या ह्या भाषणानें बनीची आई बरीच ओशाळली—तरी पण अद्याप तिचा पीळ कांहीं गेला नव्हता.

युद्धाचा नवा डाव टाकण्याच्या इर्षेनं ती म्हणाली, " पण हें तुम्हाला कसं काय आवडलं ? या वयांत तुमच्याएवढी मोठी मुलगी असतांना तुमच्या वडिलांनीं लग्न केलं—हें तुम्हांला कसं खपलं ? "

ताई चटकन् म्हणाली, " मुलगी म्हणजे कांहीं मुलगा नव्हे. आपल्याला पुढं पाणी द्यायला आधार असावा असं कुठल्या पुरुषाला वाटत नाहीं ? निपुत्रिकाला नरकवास मिळतो असं आपलीं शास्त्रंच सांगत आलीं आहेत ! तुम्हांला मुलगा नसता आणि तुमच्या घरीं मुलगी हयात असतांना दुसरं लग्न केलं असतं तर तुम्हीं काय केलं असतं ? अशीं लग्नं पुष्कळ झालीं आहेत—इथंही झालीं आहेत, पुण्यांतही झालीं आहेत."

बनीच्या आईचें तोंड अगदीं बंद झालें. ताईचा ह्या सडेतोडपणा पाहून आईही थक्क झाली. मला काय वाटलें तें आज मुळींच सांगतां येत नाहीं. ताईनें बनीच्या आईला भला चांगला टोला मारला असें वाटून मला क्षणभर आनंद झाला—एवढेंच.

बनीची आई बोलत नाहीं असें पाहून ताईनें पुढें बोलण्यास सुरवात केली.

" दादांच्या मनांत पुनर्विवाह करायचा होता. अगदीं एवढ्याशा मुलीशीं लग्न करणं त्यांच्या जिवावर आलं होतं—पण करायचं काय, पुनर्विवाह केला असता तर सर्वांनीं वाळींत टाकलं असतं. हल्लीं पुण्यांत चारदोन पुनर्विवाह झालेही आहेत. कांहीं अगदीं पहिलंच उदाहरण असं नाहीं—पण आजूबाजूला पहावं लागतं. जगाविरुद्ध जायचं धैर्य कांहीं सर्वांच्याच अंगीं नसतं. निपुत्रिकपणा घालवायचा आणि पुनर्विवाह तर करायचा नाहीं, तेव्हां राहिला एकच उपाय. तो उपाय अमलांत आणला म्हणून तुमच्यासारख्या समजंस माणसांनीं आमच्या दादांना नांवं ठेवावीं आणि ह्या गरीब बिचाऱ्या निरपराधी मुलीला वेळीं अवेळीं टोंचून बोलावं ह्याचं मला बाई फारच आश्चर्य वाटलं ! "

बनीच्या आईचा सपशेल पराभव झाला. ती चटकन् उठली आणि म्हणाली, " तिन्हीसांजा झाल्या, आतां घरीं जातें."

आईनें करंडा आणून दोघींनाही कुंकू लावलें आणि दोघींनींही आमचा निरोप घेतला. जातांना बनीची आई म्हणाली, " आतां जातें, उद्यांपिद्यां येईन गोष्टीला." जातांना बनी मला म्हणाली, " मथे, असं काय बरं हें ! त्या

दिवशी मी तुला बोललें त्याचं वाईट वाटलं का ? वाईट वाटलं असेल तर मी क्षमा मागतें—अशी रुसूं नकोस गडे ! उद्यां मीं कांहीं सासरीं जाणार नाहीं—येशील ना उद्यां दुपारीं ? ”

मी कांहीं न बोलतां आईकडे पाहिलें. ताईची आईची नजरानजर झाली. ताई बनीला उद्देशून म्हणाली, “ येईल बरं ती उद्यां ! ”

त्या दोघी नजरेच्या टापूआड जाईपर्यंत आम्हीं कांहीं न बोलतां तिघीही त्यांच्याकडे टक लावून पहात होतों. त्या नजरेआड होतांच आई ताईला म्हणाली, “ धन्य आहे तुमची ! इतकं उघड उघड बोलायचं तुम्हाला धैर्य तरी कसं झालं ? ”

ताई म्हणाली, “ प्रसंग पडला म्हणजे अवसान आणावं लागतं. मी त्यांना सांगितलेल्या गोष्टी मला स्वतःला पटल्या आहेत का ? काय झालं निपुत्रिकाचं मरण आलं म्हणून ?—पाणी द्यायला एक आहे पुतण्या मागें—पण निपुत्रिकाच्या भयानं एका पोरीच्या जन्माचं मातेरं करायचं, ही कुठली माणुसकी ? स्वतःसाठीं एका निरपराध पोरीला जन्मभर नरकांत खितपत ठेवायचं, हा कुठला शास्त्राधार ? आग लावा म्हणावं ह्या असल्या शास्त्रांना ! काय अशी मोठी इस्टेट वायां जात होती ? आपल्याच वडिलांबद्दल आपण वाईट बोलूं नये म्हणून मूग गिळून स्वस्थ बसावं लागतं !—पण समोर भेटतील तर अशी खरड काढीन कीं जन्माची आठवणच राहील त्यांना ! एवढ्यासाठींच मी मुंबईला जायचं टाळलं आणि परभारेंच इकडे आलें. ”

ताईचें हें उग्र स्वरूप पाहून मी अगदीं स्तंभित झालें. माझ्या परिस्थितीबद्दल इतक्या स्पष्टपणें निघालेले उद्गार मी पहिल्यानेंच ऐकले. आपल्या नशिबीं पुढें कांहीं तरी भयंकर प्रसंग आहेत याची जाणीव मला त्या वेळींच उत्पन्न झाली.

माझें डोकें भणभण करूं लागलें. विलक्षण चमत्कारिक आकृति माझ्यासमोर दिसूं लागल्या. त्या आकृति विद्रूप चेहरे करून नाचतनाचत माझ्याभोंवतीं घिरट्या घालीत आहेत असें मला वाटूं लागलें. मी अगदीं भेदरून गेलें आणि एक किंकाळी फोडून बेशुद्ध झालें.

मी शुद्धीवर आलें त्या वेळीं, आई आणि ताई माझ्या शेजारीं बसल्या होत्या. आई हलक्या आवाजानें म्हणाली, “ मथू, शुद्धीवर आलीस का ? आतां कसं वाटतं आहे ? ”

मी बिछान्यांत उठून बसलें. आई मला दाबून निजवूं लागली. मी आईला म्हटलें, "उगीच कुठं थोडीशी भोंवळ आली त्याचं एवढं हें कशाला? आतां मला अगदीं साफ बरं वाटतं."

ताई म्हणाली, "माई, बाळ, असं मनाला लावून घेऊं नये. मी एकदां तुला सांगितलं ना, कीं आतां तुला लहान राहून चालायचं नाहीं. देवानं लहानपणींच तुला मोठेपणा दिला आहे. अगदीं अंधारांत डोळे मिटून चालण्यापेक्षां तुझ्या मनांत आपल्या आयुष्याबद्दलचा थोडा तरी प्रकाश पडावा म्हणून मी बोलतांना आडपडदा ठेवला नाहीं. मनाच्या लाजेनं किंवा जनाच्या लाजेनं आम्ही वडील माणसं हीच चूक करतों. ज्याला त्याला आपल्या परिस्थितीची पुरी जाणीव करून देत नाही. आणि ज्या वेळीं आकाशींची कुऱ्हाड माथीं येऊन पडते त्या वेळीं तो प्रसंग सहन करण्याचें धैर्य अंगीं रहात नाहीं." माझ्या आईकडे वळून ती पुढें म्हणाली, "माझं म्हणणं तुम्हांला रुचणार नाहीं कदाचित्! पण हें असंच झालं पाहिजे. अगदीं आडपडदा ठेवून उपयोगी नाहीं. तुमच्या मुलीच्या कपाळीं सुखाचा वांटा नाहीं हें अगदीं देव बोलून गेला आहे. माझ्या दादांना हें त्रेपन्नावं वर्ष. अशीं जाऊन जाऊन किती वर्षे जातील? फार तर आठदहा! त्या वेळीं ही माई फार तर अठरावीस वर्षांची असेल. ज्या वयांत संसाराला सुरवात व्हायची त्याच वयांत हिच्या संसाराचा शेवट होईल. दीराची स्वारी कशी काय आहे त्याचं वर्णन तुम्हांला सांगितलंच आहे. हें तुमचं घर देखील दोनच माणसांचं आणि तुम्ही तरी तिच्या आयुष्याला किती दिवस पुरणार आहांत? म्हणून म्हणतें, एव्हांपासून हिच्या मनाची तयारी केली पाहिजे. अशी एक वेळ येणार आहे, कीं त्या वेळीं हिला आपल्या पायावर उभं रहाण्यापेक्षां दुसरा उपायच उरणार नाहीं. त्या पुढल्या मरणाची आज तजवीज केली पाहिजे. जेमतेम हिचं तिसऱ्या इयत्तेपर्यन्त शिक्षण झालं आहे–एवढं तरी बरं आहे. इथं आहे तोंपर्यंत हिच्याकडून नित्य कांहींतरी वाचून घेत जा. तेवढीच कांहींतरी अक्षरओळख राहील—आणि माई, तूंही संस्कृत शिकवण्याविषयीं शास्त्रीबोवांना सांग. मीही माझ्या परीनें सांगून पाहीन. इंग्रजी शिकवणारं कुणी असतं तर बरं झालं असतं! पण तें कांहीं शक्य नाहीं. म्हणून म्हणतें, संस्कृत शिकायची सोय आहे तेवढी संधि पदरांत पाडून घे."

आईला ही कल्पना आवडली–पण बाबांना तसें सांगण्याची तिला छाती होईना. संध्याकाळीं बाबा परत आले त्या वेळीं ह्या विषयाचा ताईनेंच उपक्रम केला.

त्यावर बाबा म्हणाले, “ मुलींनीं संस्कृत शिकून काय करायचं आहे ? त्यांना थोडीच कुठं पुराणं सांगायची आहेत ? ”

ताई म्हणाली, “ सांगितलीं मुलींनीं पुराणं तर काय बिघडलं त्यांत ? कांहीं वर्षांपूर्वी पुण्याला अशीच एक बाई आली होती. ती विधवा होती. तिचीं पुराणं एकून मोठेमोठे विद्वानही थक्क होत असत. त्या वेळीं शास्त्रीपंडितांनीं तिचा छळ केला आणि हिन्दु पण्डितांच्या जाचाला कंटाळून विचारी ख्रिस्ती झाली. तिचं नांव पंडिता रमाबाई. ”

बाबा हंसत हंसत म्हणाले, “ मग हिनंही उद्यां बाटावं अशी तुमची इच्छा आहे कीं काय ? ”

ताई थोड्याशा कठोरपणानें म्हणाली, “ नुसतं संस्कृत शिकल्यानं कांहीं ती बाटली नाहीं. तिच्या बाटण्याला तशींच कांहीं कारणं झालीं असतील. आम्हांला कुठं सर्व हकीकत कळली आहे ? संस्कृत शिकल्यानं पुरुषांचं कांहीं अकल्याण होत नाहीं, मग बायकांचं कां होईल ? दुर्दैवानं स्वतःचं पोट स्वतः भरण्याची पाळी आली तर हें संस्कृत शिकणंच हिला उपयोगी पडेल. ”

बाबा म्हणाले, “ बरं, बरं. कोणत्याही गोष्टीला जितकीं साधक तितकींच बाधकही कारणं काढतां येतात. मथूला संस्कृत शिकवणं मला कांहीं कठीण जाणार नाहीं. तिला पुष्कळसं संस्कृत ऐकण्याचा सराव आहे. मी नित्य संहिता वाचून अर्थ सांगतों तो तिच्या कानावर आहेच. कानाला कोणत्याही भाषेचा सराव असला म्हणजे ती जिव्हेवर यायला फारसं कठीण जात नाहीं. होऊन जाऊं द्या—तेवढाच एक चांगला शिष्य तयार होईल ! ”

दुसऱ्या दिवसापासून ताईच्या देखत बाबांनीं माझ्या हातांत रुपावली दिली आणि माझा संस्कृतचा अभ्यास सुरू झाला. आतां मी बाबांसारखी विद्वान होऊन पुराण सांगूं लागणार ह्या कल्पनेनें मी अगदीं हुरळून गेलें आणि मोठ्या झपाट्यानें दिलेले धडे तयार करूं लागलें. माझी उत्सुकता पाहून बाबांनाही मला शिकवण्याचा हुरूप येत असे—आणि त्यांच्या अपेक्षाबाहेर माझ्या अभ्यासाची प्रगति होत असल्याचें पाहून ताईलाही आनन्द होई.

चार दिवसांसाठीं रहायला आलेली. ताई, आईच्या आग्रहानें सहज पंधरा दिवस राहिली. ती घरची स्वतः मुखत्यार असल्यामुळें महिनापंधरा दिवस मागेंपुढें

रहाणें तिला अशक्य नव्हतें. ज्या दिवशीं जायची गोष्ट निघाली त्या दिवशीं थोडे दिवसांकरतां तरी मला बरोबर नेण्याची इच्छा ताईनें प्रदर्शित केली. आई म्हणाली, " नुकतीच कुठं ती आली आहे. घटकाभर माझ्याजवळ स्वस्थसुद्धां बसली नाहीं—म्हणून इतक्यांतच पाठवायचं माझ्या जिवावर येतं. तुम्ही आणखी पंधरा दिवस रहात असाल तर मी तिला तुमच्याबरोबर पाठवतें. "

थोड्या आढ्यावेढ्यानंतर ताईनें आईची ही अट कबूल केली आणि आणखी पंधरा दिवसांनीं मी ताईबरोबर तिच्या गांवीं गेलें.

# प्रकरण सहावें पुनर्विवाह ?

ताईचें गांव खेडें असलें तरी आमच्या गांवापेक्षां कितीतरी पटीनें मोठें होतें. ताईचें घरही जुन्या काळचें चौसोपी घर असून फार मोठें आणि प्रशस्त होतें. ताईचे यजमान त्या गांवचे खोत होते आणि त्यांचें नुसतें त्या गांवांतच नव्हे, तर आजूबाजूच्या पंचक्रोशींत चांगलेंच वजन होतें. ते मॅट्रिकची परीक्षा पास झालेले होते. वकिलीच्या परीक्षेला तीन चार वेळां बसून नापास झाल्यामुळें तो नाद सोडून आपल्या खोतीची व्यवस्था पहाण्याचें त्यांनीं पत्करलें होतें. असें करण्याबद्दल लोक त्यांना नांवें ठेवीत. त्या काळांत कोंकणांत इतकीं शिकलेलीं माणसेंही फार थोडीं असत–त्यामुळें भास्कररावांनीं खेड्यांत राहून आपल्या आयुष्याचा अपव्यय केला असेंच सर्व लोक म्हणत असत.

भास्कररावांचा लौकिक फार मोठा होता आणि त्यांचें वजनही सर्व प्रकारच्या लोकांत सारखें होतें. ते जितके हिन्दूंना प्रिय होते तितकेच मुसलमानांचे आवडते होते. ब्राह्मण त्यांना जितका माना देत, त्यापेक्षांही कुणबी लोकांचें त्यांच्यावरचें प्रेम जास्त होतें. गांवची सारी रयत त्यांना देवासारखा मान देत असे.

घर एवढें मोठें होतें खरें, पण त्यांत रहायला माणसें मात्र फारच थोडीं होतीं. घरचीं रहाणारीं म्हणजे भास्करराव आणि ताई. भास्कररावांचा भालचन्द्र ह्या नांवाचा एक धाकटा भाऊ रत्नागिरी येथें हायस्कुलांत शिकत होता. एक पुजारी ब्राह्मण, एक पुराणिक, दोन कारकून, शिवाय स्वयंपाकीणबाई–ही सर्व मंडळी भास्कररावांच्या घरींच रहात असे. भास्कररावांच्या घरचा तो राजदरबारी थाट पाहून मला ताईच्या वैभवाबद्दल फार अभिमान वाटला.

मी तेथें येऊन पोहोंचलें त्या वेळीं पुन्हां माझ्या मनांत संकोच उत्पन्न झाला. इथलीं लोकं काय म्हणतील–ही भीति नजरेसमोर उभी राहिली. भास्कररावांचा स्वभाव फार दिलदार होता. आल्या दिवसापासून ते मला 'मथू' म्हणूनच हाक मारूं लागले. ताईना हें आवडलें कीं नाहीं तें मला सांगतां येत नाहीं. त्यांनीं 'मथू' म्हणून हाक मारतांच ताईनीं नुसतें, 'काय हें!' म्हणून हंसावें!

पहिल्याच दिवशीं ताई म्हणाल्या, "ती आपली सासूबाई आहे हें ध्यानांत आहे ना!"

भास्करराव म्हणाले, " ही कसली सासू! असल्या दहा सासवा मी माझ्या खिशांत घालून नेईन! तें कांहीं नाहीं. मी हिला मथूच म्हणणार. कुणाच्या बापाचंसुद्धां ऐकणार नाहीं!"

ताई म्हणाल्या, " समजलं बरं मला–पण लोकं काय म्हणतील?"

भास्करराव म्हणाले, " लोक काय म्हणणार? एवढ्याशा पोरीशीं म्हाताऱ्यानं लग्न केलं तर तें लोकांना खपतं–मग त्या पोरीला पोर म्हटलं तर कां खपणार नाहीं? काय ग मथू, तुला मी मथू म्हटलं तर वाईट नाहीं ना वाटणार?"

मी अगदीं तोंडभर हंसून उत्तर दिलें, " छेः मुळींच नाहीं. मथू म्हटलंत म्हणजे मला अगदीं घरीं असल्यासारखं वाटेल."

ताई म्हणाल्या, " बरीच लाघवी आहेस कीं ग! अशी मर्जी संपादन करूं पहातेस का?"

ताईंचें हें भाषण ऐकून भास्करराव मोटमोठ्यानें हंसले आणि म्हणाले, " आतां हा मत्सर सुरू होणार. हा असला मत्सर सवतिमत्सरापेक्षांही भयंकर!"

दोघेंही नवराबायको पोट धरधरून हंसलीं. त्यांच्या ह्या विनोदाचा मला कांहींच उलगडा न झाल्यामुळें मी नुसती टकमक पहात उभी राहिलें.

ताईच्या भीतीमुळें असो अगर इतर कांहीं कारणांमुळें असो, इथें आमच्या नात्याची मुळींच थट्टा झाली नाहीं. आमचें नातें सर्वांना माहीत होतें, पण त्याच्यावर टीका झालेली कांहीं माझ्या कानीं आली नाहीं. एकाद्या पाहुण्या मुलीसारखी मी घरीं आलें आणि पाहुण्याप्रमाणेंच इतर सर्वांनीं मला वागवलें. त्यापेक्षां त्या नात्याचा अधिक उल्लेख कुणीही कधीही केला नाहीं.

चारआठ दिवस मला चुकल्या चुकल्यासारखें वाटत असे. बऱ्याच दिवसांच्या गैरहजिरीनन्तर आल्यामुळें ताईला घरप्रपंचाकडे बरेंचसें लक्ष पुरवावें लागत होतें त्यामुळें मी बहुतेक एकटीच असें. रिकाम्या वेळीं एकादी पोथी काढून वाचीत बसत असें किंवा भास्कररावांनीं दिलेलें एकादें पुस्तक वाचण्याचा प्रयत्न करीत असें. ताईला इथें प्रत्यक्ष घरकाम असें जरी कांहीं करावें लागत नसे, तरी प्रपंच्याच्या मोठ्या पसाऱ्यामुळें तिचा बहुतेक वेळ इकडे तिकडे जाई. ताई जवळ नसली म्हणजे मला अगदीं चुकल्यासारखें वाटे आणि इथें येण्यांत आपण चूक केली कीं काय असाही प्रश्न माझ्या मनांत येई.

ही गोष्ट ताईच्याही लक्षांत आली. एके दिवशीं ती मला म्हणाली, "पुण्याला किंवा तुमच्या गांवीं मी सदासर्वदा तुझ्याजवळ असें—पण इथं मात्र मला तसं राहतां येत नाहीं. हें कळत होतं तर मला आणलीत कशाला, असं तूं म्हणशील ह्यावर, पण खरं पाहिलंस तर तुझ्याबरोबर सकाळपासून संध्याकाळपर्यंत बोलत बसायला मला कांहींच हरकत नाहीं. इतके दिवस मी इथं नव्हतें तरी इथलीं कामं चाललींच होतीं कीं नाहीं! पण मी आल्यावर तसं करून चालायचं नाहीं. मी समोर असूनही जर कामचुकारपणा केला तर नोकरांचाकरांजवळ माझा बोज रहाणार नाहीं. तुझ्यासाठीं म्हणून कांहीं दिवस ही गोष्ट विसरतां येईल, पण मी मुद्दामच कामांत गुंतून रहातें. तुला एकलकोंडेपणाचं शिक्षण मिळालं पाहिजे. भरल्या घरांत सुखासमाधानानं एकटी रहायला शिकशील त्याच वेळीं तुला या भरल्या जगांत एकटं रहातां येईल. एव्हांपासून वाचण्याचा व्यासंग ठेव. अगदीं वाचण्याचं व्यसन लावून घे. रोज कांहींतरी वाचल्याशिवाय झोंप घ्यायची नाहीं असा मनाचा निश्चय कर. उद्यांपासून तुला तितकं एकटं वाटणार नाहीं. उद्यां रत्नागिरीहून चंदू येणार आहे. चंदू म्हणजे माझे चंदूभाऊजी. मी चंदूच म्हणतें त्याला. भाऊजी म्हटलेलं आवडत नाहीं त्याला. तो आला म्हणजे तुला बरीच सोबत होईल."

कोणी परकी माणूस येणार म्हटलं कीं माझ्या छातींत धस्स होत असे. आतां-पर्यंत सर्व सुरळीत चाललें होतें पण हा चंदू आल्यावर कसा वागेल हा प्रश्न माझ्यासमोर उभा राहिला. चंदूचा स्वभाव जर भास्कररावांसारखाच असेल तर मला संकोच वाटणार नाहीं. नानासाहेबांसारखा असला तर मग माझें कसें होईल? चंदू हा ताईचा दीर. दीर हा शब्द म्हटला कीं माझ्यासमोर भीति उभी राहत असे. दीर म्हटला कीं नानासाहेबांची मूर्ति माझ्यासमोर उभी रहात असे—पण तसें कांहीं असतें तर ताईनें मला आधींच सावध केलें असतें. ज्या अर्थी तसें तिनें सावध केलें नाहीं त्या अर्थी चंदूची भीति बाळगण्याचें कारण नाहीं असेंही मनांत आलें.

दुसऱ्या दिवशीं चंदू आला. त्याचें वय सुमारें सोळा वर्षांचें होतें. तो मॅट्रिकच्या वर्गांत होता आणि रत्नागिरीच्या हायस्कुलांत तो एक पहिल्या दर्जाचा विद्यार्थी म्हणून समजला जात होता. त्याची मुद्रा प्रसन्न होती आणि त्याचा चेहरा सदा हंसरा होता. त्यानें डोक्यावर केंस राखले होते आणि त्या केसांच्या

एका बाजूला भांगही काढला होता. त्यांला शेंडी मुळींच नव्हती. हा त्याचा वेष पाहून मला फार आश्चर्य वाटलें आणि असे केंस राखायला—असलें धर्मबाह्य वर्तन करायला—भास्कररावांनीं संमति तरी कशी दिली अशी शंकाही माझ्या मनांत आली.

पाय धुऊन घरांत येतांच चंदूनें ताईंना नमस्कार केला. मी जवळच होतें—माझ्याकडे पाहून त्यानें ताईला विचारलें,

"ही कोण ?"

ताई म्हणाली, "ही माझी सावत्र आई. तूं हिला माई म्हणायचं—बरं का ? ह्याबाबतींत कमीजास्त कांहीं बोलायचं नाही."

चंदू माझ्याकडे सारखा टक लावून पहात उभा राहिला. माझ्याकडे पहात असतां त्याच्या डोळ्यांतून दोन आसवें येऊन पटकन् खालीं पडलीं. त्याचा तो सदा हंसरा चेहरा एक क्षणभर काळवंडल्यासारखा दिसला.

मी ताईकडे वळून विचारलं, "आणि मी ह्यांना काय म्हणूं ?"

ताईचें उत्तर यायच्या पूर्वींच चंदू बोलला, "नुसतं 'चंदू.' अहोजाहो म्हणायचं नाहीं कांहीच—ऐकलंस का माई, माझ्या नांवाचा मोठा वांधा पडला आहे, काका म्हणतात 'भालु' आणि वहिनी म्हणते 'चंदू.' मी इतर लोकांप्रमाणेंच काका म्हणतों त्यांना. ह्या उभयतांनीं माझं नांव असं हें वांटून घेतलं आहे. त्यामुळं माझं नांव आतां हरवायची भीतीच राहिली नाहीं ! 'भालू' म्हटलेलं मला आवडत नाहीं. आमच्याकडे म्हाताऱ्या कोल्हीला 'भालू' म्हणतात—तेव्हा तूं आपली चंदूच म्हणत जा."

चंदूच्या प्रत्यक्ष परिचयानें माझी पूर्वींची भीति पार मावळली. तेवढेंच मनाला हायसें वाटलें. आतां एक सोबती मिळाला आणि तोही गोंदूसारखा बावळा किंवा बनीसारखा कुरढा नाहीं हें पहातांच मला मोठा आनंद झाला. आम्हीं दोघेंही घटकान् घटका सारखीं बोलत बसत असूं. चंदू मला आपल्या शाळेंतल्या किती तरी गंमतीच्या गोष्टी सांगे. त्या ऐकल्यामुळें हें असलें आनन्दाचें जिणें आपल्याला अंतरलें-ही कल्पना मनांत येऊन मला अतिशय वाईट वाटत असे. कुणाही मुलाचा मला इतका निकट सहवास घडला नव्हता. मला भाऊ नव्हता त्याची उणीव भरून आल्यासारखें मला वाटलें. तो उन्हाळ्याच्या सुटींत घरीं आला होता त्यामुळें महिना सव्वा महिना इथेंच रहाणार होता. पुढल्या दिवाळीच्या

सुमारास त्याची परीक्षा होती म्हणून त्याला नेटानें अभ्यास करायचा होता. तो नित्य नियमानें अभ्यासाला बसे आणि काकाही मधून मधून त्याचा अभ्यास घेत असत. ते दोघेही इंग्रजी बोलूं लागले म्हणजे आपणही इंग्रजी शिकावें असें मला वाटूं लागे—आणि एके दिवशीं मी चन्दूजवळ तसें म्हटलेंही !

त्यावेळी चन्दूनें उत्तर दिलें, " काय करूं ! हा परीक्षेच्या अभ्यासाचा बोजा नसता तर मोठ्या आनन्दानं मी तुला इंग्रजी शिकवलं असतं. ह्या सुट्टीच्या महिन्यांत सहज तुझं हॉवर्डचं पहिलं पुस्तक झालं असतं ! पण काय करणार ? माझा नाईलाज आहे. मॅट्रिकच्या परीक्षेंत मला शक्य तितका वर नंबर मिळवला पाहिजे तरच पुढें कॉलेजांत स्कॉलरशिप् मिळेल. शिवाय जगन्नाथ शंकरशेट स्कॉलर्शिप् मिळवण्याचाही माझा प्रयत्न आहे. शास्त्रीबुवा माझ्या संस्कृतावर स्पेशल मेहनत घेत आहेत आणि इतर संस्कृत वाचण्यासाटीं मी भांडारकर मास्तरांच्याही घरीं जात असतों. रत्नागिरी हायस्कूलची परंपरा राखली पाहिजे. संस्कृतची स्कॉलर्शिप दुसऱ्या हायस्कूलला जातां कामा नये. मी जर स्कॉलर्शिप् बुडवली तर शास्त्रीबुवांना मोटा धक्का बसेल. भांडारकर मास्तरांनाही अतिशय वाईट वाटेल. एवढ्यासाटींच मला अभ्यासाचा धोपा लावला पाहिजे. इंग्रजी शिकण्याची तुला इच्छा व्हावी आणि मला शिकवण्याची सवड नसावी हें जितकं तुझं तितकंच माझंही दुर्दैव आहे ! "

चंदूचें हें भापण ऐकून मला फार वाईट वाटलें. आमच्या गांवीं असतांना मी इंग्रजी शिकावें अशी ताईनें बराच वेळ इच्छा प्रदर्शित केली होती. आईला त्या वेळीं तें रुचलेलें दिसलें नव्हतें, तरीही माझ्या मनांत इंग्रजी शिकण्याची आशा अनिवार झाली होती. ताईच्या सांगण्यावरून बाबांनीं मला संस्कृत शिकवण्यास सुरवात केली होती, पण इकडे आल्यामुळें तें शिक्षण तेवढेंच राहिलें होतें.

मी चंदूला विचारलें, " इंग्रजी नाहीं तर नाही, बाबांनीं मला संस्कृत शिकवायला सुरवात केली होती, तेंही अर्धवटच राहिलं आहे. मधूनमधून तेवढं तरी मला सांगशील का ? "

बाबा कोणत्या पद्धतीनें मला शिकवीत होते तें विचारून घेतल्यावर चंदू म्हणाला, " हेंही तितकंच कठिण आहे. मी शिकलों आहे भांडारकरांच्या पुस्तकावरून—म्हणजे तेंही इंग्रजीवरूनच. तुझ्या शिक्षणाचा आरंभ झाला आहे रूपावली

आणि समासचक्रानं–त्यामुळं मला तें थोडंसं कठिणच जाणार–तरी त्यांतल्या त्यांत प्रयत्न करून पाहीन, पण तुझे दिवस फुकट जाऊं देणार नाहीं."

संस्कृत शिकण्याच्या कामीं अशा रीतीनें चन्दूनें मला मदत करायला सुरवात केली हें पाहून ताईनाही आनंद झाला. मधूनमधून भांडारकरांच्या संस्कृत पुस्तकांतील धड्यांची भाषान्तरें सांगून त्यांतीलही कांहीं धडे चन्दूनें आणि काकांनीं माझ्याकडून करून घेतले.

अभ्यास करून स्कॉलरशिप् मिळविण्याचा चन्दूचा उत्साह पाहून मला राहून राहून कौतुक वाटे. असें कोणतें पाप माझ्या हातून घडलें होतें, कीं त्यामुळें मला पुरुषाचा जन्म आला नाहीं ? मी मुलगा झालें असतें तर माझ्या कपाळींच्या ह्या सर्व कर्मकटकटी टळल्या असत्या. मी सुखानें शाळेंत गेलें असतें, अभ्यास केला असता, परीक्षाही दिल्या असत्या. आतां अभ्यास करायची सुद्धां चोरी. काकांचें तसेंच वजन होतें म्हणून कुणी उघड उघड बोलत नसत. स्वतःच काका मला शिकवीत असत त्यामुळें इतरांच्या तोंडाला कुलूप बसलें होतें. तरीही संधि साधून आंतून चार टोमणे मारायला मंडळी कमी करीत नसत.

पुराणिकबोवा आणि एक कारकून एके दिवशीं बोलत होते. पुराणिकबोवा म्हणाले, " काका आमचे यजमान आहेत. त्यांना नांवं ठेवण्याचा आमचा अधिकार नाहीं. पण हल्लीं जें हें चाललं आहे तें पाहून आमच्यासारख्याला स्वस्थ रहावत नाहीं. आमच्या खेडेगांवांत हे सुधारकी चोंचले नको होते, पण काकांनींच स्वतः असले उपक्रम केल्यावर आम्ही आश्रितांनीं काय करावं ? आतां ही गांवांत एक मुलीची शाळा ह्यांनीं आपल्या खर्चानं सुरू केली आहे ! ब्राह्मणांच्या मुलींबरोबर शूद्रांच्या मुलीही शिकूं लागल्या आहेत ! हें पाहिलं कीं आंगाचा कसा तिळपापड होतो ! ह्या मुली शिकून पुढं काय दिवे लावणार आहेत ? कशाला हवं आहे मुलींना शिक्षण ? पण ह्या म्लेंच्छ शिक्षणानं काकासाहेबांसारख्या घरंदाज माणसाचीही बुद्धि भ्रष्ट होऊं लागली आहे. पुराणांत तरी हेंच आहे ! म्लेंच्छांचा जोर ह्या आपल्या आर्यावर्तांत झाल्यावर सर्वत्र भ्रष्टाकार माजणार, सबगोलंकार होणार, ब्राह्मणांचं ब्राह्मणत्व नाहीसं होणार आणि म्लेंच्छाचाराच्या प्राबल्यांत अतिशूद्रापासून ब्राह्मण ओळखतां येणार नाहीं अशी स्थिति होणार, हें पुराणंच सांगून चुकलीं आहेत ! "

कारकून म्हणाले, " पुराणांत जर असं भविष्यंच सांगितलं आहे तर मग तें टळणार कसं ? "

तपकिरीची एक चिमूट नाकांत घालून पुराणिकबुवानीं उत्तर दिलें, " भविष्य आहे खरं, पण तें टाळण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आतां हेंच पहा, यजमानीण-बाईच्या वडिलांनीं लग्न केलें–पुत्रेच्छेनें लग्न केलं–तर काका चार मंडळींत आपल्या श्वशुरांना उद्देशून वाटेल तसें तडातड बोलतात. ही पोरटी तें ऐकत असते. ह्याचा परिणाम तिच्या मनावर काय होईल ? पुत्रकामना होती तर पुनर्विवाह करायचा होता असं धडधडीत म्हणतात. अगदीं उघड उघड पुनर्विवाहाचं नांव घेतात. आतां ह्यांना ब्राह्मण म्हणावं कीं काय म्हणावं ? एव्हांपासून पोरीच्या कानांवर पुनर्विवाहाच्या गोष्टी जाऊं लागल्या आहेत. उद्यां तो म्हातारा कदाचित् सोंपला तर हे राजश्री ह्या पोरीचा पुनर्विवाह लावून देतील कीं काय अशी भीति मला वाटूं लागली आहे ! वाटेल तें करोत. आपल्याला काय करायचं आहे ? काळजी वाटते ती एवढीच, कीं उद्यां त्यांनीं हिचा पुनर्विवाह लावला तर असल्या धेडाच्या घरचं अन्न खात आपल्याला रहावं लागणार ! "

कारकून म्हणाले, " आजच पुढल्या कल्पना करा कशाला ? अजून कांहीं तिचा नवरा मेला नाहीं, मग पुनर्विवाहाची शंका काढण्यांत काय हंशील ? "

पुराणिकबुवा म्हणाले, " आतां असं पहा, आज जरी मेला नाहीं तरी चार दोन वर्षांत मरणार ह्यांत कांहीं शंका नाहीं आणि तो मेला तर आमचे काका तिचा पुनर्विवाह लावल्याशिवाय रहात नाहींत हें तर ब्रह्मवाक्य आहे. "

कारकून म्हणाले, " कुणी कांहीं करोत, आपल्याला त्याच्याशीं काय करायचं आहे ? पण पुराणिकबुवा, तुम्हांला मी एक सांगून ठेवतों, माझ्याकडे बोललांत तें एक पुरे झालं–दुसऱ्या कुणाकडे ह्या गोष्टी बोलाल आणि त्या काकांच्या कानीं जातील तर तुम्हांला आपली तळी इथून उचलावी लागेल. "

पुराणिकबुवा आपल्याशींच पुटपुटले, " हा मेला कारकूनसुद्धां ह्यांच्या संगतीनं बिघडला आहे ! "

ते जातांच मी दाराआडून निघून माझ्या खोलींत गेलें. मनाला कशी तळमळ लागली ! पुराणिकबुवांच्या म्हणण्याचें मला विशेष कांहीं वाटलें नाहीं, पण मी सर्वांच्या चर्चेचा विषय होऊन राहिलें आहें ह्याच गोष्टीचें मला दुःख होत होतें. कुठली कोण मी, कुणाचा कसलाही गुन्हा माझ्या हातून घडला नाहीं, असें असतां वाटेच्या वाटसरानेंसुद्धां माझ्या भवितव्याची काळजी कां वहावी ? एका म्हाताऱ्यानें माझ्याशीं लग्न करण्याचा गुन्हा केला, त्याचें प्रायश्चित्त मी एका

निरापराध मुलीनें कां भोगावें ? इतरांप्रमाणें माझें लग्न झालें असतें तरीही ह्या लोकांनीं अशीच चर्चा केली असती का ? बनीचें एका बावळ्या मुलाशी लग्न झालें आहे–कुणी सांगावें तिच्या आयुष्यांत पुढें काय होणार आहे तें ?–पण त्याबद्दल कोण कुठें चर्चा करीत नाहींत ते ? माझा संसार देखील सुखाचा होणार नाहीं कशावरून ? पुराणिकबुवांच्या बोलण्यानें ह्या कल्पना माझ्या मनांत आल्या–पण ताई तरी काय म्हणाली होती ?

पुराणिकबुवाचें भाषण विषारी होतें आणि ताईचें प्रांजल होतें. दोहोंचाही अर्थ एकच. माझ्या कपाळीं वैधव्य असल्याचें भविष्य दोघांनीही सारखेंच केलें होतें. शास्त्रीबुवांच्या बोलण्यांत मात्र एक नवीन शब्द आला होता, तो म्हणजे पुनर्विवाह. बनीच्या आईशीं आपल्या वडिलांसम्बन्धानें बोलतांना ह्याच शब्दाचा उल्लेख ताईनेंही केला होता.

पुनर्विवाह म्हणजे काय ?

पुन्हां पुन्हां तो एकच प्रश्न माझ्या डोक्यांत घोळूं लागला !

पुनर्विवाह म्हणजे कांहीं तरी भयंकर आहे, एवढीच कल्पना ताईच्या किंवा पुराणिकबुवांच्या भाषणावरून मला झाली होती.

माझ्या चौकसपणाला ऊत आला. मी माझ्या मनाशीं ठरवलें, कीं संधि येतांच ह्या शब्दाचा पहिल्यानें उलगडा करून घ्यायचा. एकदां मनांत आलें, कीं ताईलाच विचारावें–पण पुन्हां मनांत आलें, कीं ताईनें विचारल्यास पुराणिकबुवांची हकीकत सांगावी लागेल आणि त्यामुळें पुराणिकबुवा कदाचित् आपल्या चाकरीला मुकतील ! ह्याच कारणामुळें काकांकडे देखील ह्या विषयाच्या बाबतींत बोलणें शक्य नव्हतें.

रहातां राहिला चन्दू—संध्याकाळीं संस्कृतचा धडा झाल्यानंतर मी चन्दूला विचारलें, “ पुनर्विवाह म्हणजे काय ? ”

चन्दू आश्चर्यानें सारखा माझ्या तोंडाकडे पहात राहिला.

मी म्हटलें, “ एवढासा शब्द देखील येत नाहीं वाटतं ? मग स्कॉलरशिप् कसली मिळवणार ? ”

“ हा शब्द तुला कुठं मिळाला ? ” चन्दूनें विचारलें.

मी हंसत म्हटलें, " सकाळीं केर काढीत होतें तों दाराच्या कोंपऱ्यांत सांठवलेला मिळाला !"

चन्दू गंभीर होऊन म्हणाला, " नाहीं, खरंच सांग, हा शब्द तुला कां आठवला ?"

" अगदीं खरंच सांगतें, दाराआडच्या कोंपऱ्यांतच मला तो शब्द मिळाला."

" हा थट्टेचा विषय नव्हे-अगदीं खरं खरं सांग."

मी पुराणिकबुवाचा आणि कारकुनाचा संवाद जशाचा तसा त्याला सांगितला. तो ऐकत असतांना त्याचा चेहरा रागानें हिरवापिवळा होत होता.

हकिकत सांगून झाल्यावर तो म्हणाला, " ह्या चोरांना कशाला हवी आहे ही उठाठेव ? आतांच्या आतां ही हकीकत काकांना जाऊन सांगतों आणि पुराणिकबुवांची एकदम वासलात लावतों."

मी थोडेंसें ताईचें अनुकरण करून म्हटलें, " ह्यांत पुराणिकबुवांचा काय अपराध ? झालंच आहे तसं, मग लोकांनीं कां बोलूं नये ? पुराणिकबुवांचं सध्यां राहूं दे, पण पुनर्विवाह ह्या शब्दाचा अर्थ मला सांगतोस ना ?"

तो हंसत हंसत म्हणाला, " विवाह म्हणजे लग्न-पुनर् म्हणजे पुन्हां-पुनर्विवाह म्हणजे पुन्हां लग्न."

एवढा सोपा शब्द मला कळला नाहीं ह्याचें माझें मलाच आश्चर्य वाटलें. पण पुराणिकबुवांनीं त्या साध्या शब्दाच्या सभोंवार जें अवडंबर पसरून ठेवलें होतें त्यामुळें त्या शब्दाचा अर्थ मला कळला नव्हता.

मी चन्दूला विचारलें, " हात्तिच्या ! एवढंच ना ? मग पुराणिकबुवांना त्यांत एवढं भयंकर काय वाटलं ?"

चन्दू म्हणाला, " पुरुषांच्या विवाहाला, म्हणजे पुन्हां केलेल्या लग्नाला पुनर्विवाह हा शब्द लावित नाहींत. पुरुषांनीं कितीही लग्नं केलीं तरी तो नुसता विवाह-आणि स्त्रीचं दुसरं लग्न झालं कीं त्याला म्हणतात पुनर्विवाह !"

" तरीही मला ह्यांत भयंकर असं कांहींच वाटत नाहीं !"

अधिकच गंभीर होऊन चंदू म्हणाला, " तें खरं आहे. पण जगाला तसं वाटतं. उच्च वर्णांतील पुरुषांना वाटेल तितके विवाह करण्याची जशी शास्त्रांत सवलत दिली आहे, तशी स्त्रियांना दिलेली नाहीं."

" कां नाहीं ? "

" काकाही हेंच म्हणतात. अशी सवलत कां नसावी ? पण नाहीं एवढं खरं. आपण सध्यां लहान आहोंत, आपल्याला ह्या शास्त्रांच्या उठाठेवी कशाला ? पुढं मोठेपणीं ह्याच गोष्टींचा विचार करायचा आहे. सध्यां आपण आपला नुसता अभ्यास करूं म्हणजे झालं." असें म्हणून पुस्तक उघडून चन्दू वाचूं लागला.

मी कांहीं वेळ तशीच जवळ बसून राहिलें होतें.

चन्दू कांहीं बोलत नाहीं असें पाहून मी त्याला म्हटलें, " मला जास्त कांहीं सांगायचं नसलं तर खुशाल सांगूं नकोस ! पण माझं एक सांगणं ऐक, पुराणिक-बुवांची हकीकत काकांना सांगूं नकोस. तुला माझी शपथ आहे."

अगदीं रुक्षपणें ' बरं आहे ' असें म्हणून चन्दूनें अभ्यासाला सुरवात केली आणि मीही उठून आंत गेलें.

विषय माझ्या बुद्धिपलिकडचा होता खरा, पण तो एकच विषय माझ्या डोक्यांत घोळूं लागला.

पुरुषांना एकापेक्षां जास्त लग्नें करण्याची सवलत असावी आणि बायकांना कां असूं नये ?

पुन्हां पुन्हां हाच प्रश्न मनांत घोळवण्यापलीकडे त्याचें उत्तर मिळणें मला शक्यच नव्हतें.

कोण मला ह्या प्रश्नाचें उत्तर सांगेल ?

मनाचा एकदां निश्चय केला आणि ताईला विचारायचें असें ठरवलें.

ताईही इतक्यांत तिथें आली आणि मला पाहून म्हणाली,

" एकटीच बसून कसला विचार करते आहेस ? "

" चन्दूचा अभ्यास चालला आहे तेव्हां त्याला व्यत्यय होऊं नये म्हणून उगीच आपली विचार करीत बसलें होतें."

" कसला विचार करीत होतीस ? "

मी सर्व हकीकत ताईला सांगितली आणि म्हटलें, " शास्त्रानं दोघांसाठीं हे दोन नियम कां केले ? "

" तें आज तुला कळायचं नाहीं. हा विचार करण्यासारखा विषय आहे ह्यांत

शंका नाहीं, पण हा विचार करण्याइतकं तुझं वय नाहीं. अजून चारदोन वर्षं जाऊं देत म्हणजे आपण जगलों वांचलों तर ह्या विषयाची चर्चा करूं."

" तूं केला आहेस का या विषयाचा विचार ? "

ताई अगदीं गंभीर होऊन म्हणाली, " होय. मी विचार केला आहे असं म्हणण्यापेक्षां, अधिकारी माणसांचे ह्या विषयावरचे विचार मी वाचले आणि ऐकले आहेत."

एवढेंच बोलून ताई तेथून निघून गेली. मी पुढें कांहीतरी प्रश्न करीन तो टाळण्यासाटींच ती एकदम निघून गेली, असें माझ्या मनानें घेतलें. ह्या एका साध्या शब्दाचें रहस्य असें काय भयंकर आहे ह्या विचारानें मला स्वस्थता वाटेना. मी कांहीं विचारलें आणि ताईनें त्याचें समर्पक उत्तर दिलें नाहीं असें ह्यापूर्वी केव्हांच झालें नव्हतें आणि ज्या अर्थी ताई ह्या विषयावर बोलण्याचें टाळते त्या अर्थी पुराणिकबुवांनीं म्हटल्याप्रमाणें तो विषय खरोखरच भयंकर असावा अशी माझी खात्री झाली.

त्या रात्रीं मला झोंप कशी ती मुळींच लागेना. त्या एकाच शब्दानें मला वेड लावलें होतें. जसजसा मी त्या शब्दाचा विचार करूं लागलें तसतसा त्याचा अर्थ माझ्यापासून दूर पळूं लागला. माझें मस्तक सारखें भणभणूं लागलें. काय होईल तें होवो, उद्यां काकांना हा विषय विचारायचाच, असा मनाचा निश्चय केल्यावर मला झोप लागली.

दुसरे दिवशीं सकाळीं काकांनीं माझा संस्कृतचा धडा घेतल्यावर मी त्यांना त्याच शब्दाचा अर्थ पुन्हां विचारला.

त्यासरशीं ते एकदम दचकून म्हणाले, " कुणी ऐकवला हा शब्द तुला ? "

खोटें बोलण्यापेक्षां कांहींच उत्तर देऊं नये म्हणून मी गप्प राहिलें.

काका म्हणाले, " ह्या विषयाचा अर्थ कळून घेण्याइतकं अजून तुझं वय झालं नाहीं."

मी काकांना विचारलें, " कोणत्या वयांत कोणत्या विषयाची चर्चा करायची ह्याची मला एक यादी करून द्याल का ? "

काका अगदीं मोठमोठ्यानें खो खो करून हंसले. ते एवढ्या मोठ्यानें हंसले

कीं ताई देखील त्यांचें हंसणें ऐकून धांवत बाहेर आली आणि म्हणाली, "एवढं हंसायला काय झालं ?"

ते हंसत हंसत म्हणाले, "आज आमच्या सासूबाईनीं आम्हांला चीत मारलं..."

ह्या त्यांच्या उद्गारांचा मला कांहींच अर्थ कळला नाहीं. मी सहज कांहीं विचारलें आणि काकासारख्या विद्वानांनीं चीत होण्याजोगें त्यांत होतें काय, हें त्या वेळीं मला मुळींच कळलें नाहीं.

मी वेड्यासारखी त्या उभयतांच्या तोंडाकडे आळीपाळीनें पहात राहिलें.

"काय बावळेपणाचं सोंग आणते आहे पहा ! ऐकलंस का ? हिनं आतांच माझ्यापाशीं एक यादी करून मागितली—कसली यादी कळली का ? ही म्हणाली, 'कोणत्या वयांत कोणत्या विषयाची चर्चा करायची ह्याची मला एक यादी करून द्याल का ?'—आणि प्रश्न कसला विचारीत होती कळलं का तुला ? प्रश्न विचारीत होती पुनर्विवाहाचा. पुनर्विवाहाचं नांव निघालं कीं मला स्फुरण चढतं हें कुणी तरी हिला सांगितलं असावं."

ताई गंभीरपणें माझ्याकडे वळून म्हणाली, "काल मी सांगितलं तेवढ्यानं समाधान झालं नाहीं वाटतं ?"

मी म्हटलं, "काय सांगितलंस ? एव्हां चार वर्षें विचारूं नको—म्हणूनच ना ? काकांनीं देखील तेंच उत्तर दिलं."

"होय ना ? आतां तरी खात्री पटली ? वडील माणसांनीं सांगितलेलं ऐकावं—उगीच जास्त प्रश्न विचारूं नयेत."

"वडील माणूस कोण ? तुम्हीं कीं मी ?"

दोघेंही मोटमोठ्यानें हंसत निघून गेलीं आणि मी एकटीच तेथें राहिलें. माझ्या प्रश्नाचें उत्तर कांहीं मला मिळालें नाहीं.

मला सर्वांचा राग आला आणि त्या रागासरशीं मी जोरानें जमिनीवर हातपाय आपटले.

चन्दू कुठून आडून पहात होता कोण जाणे, तो एकदम पुढें होऊन म्हणाला, "काय रागूबाई, झाली कीं नाहीं फजिती ? मी सांगितलं तेवढ्यावरून शहाणं

व्हायचं, पण विश्वास नाहीं ! ताईना विचारलें, काकांना विचारलं, शेवटीं निष्पन्न काय झालं ? "

मी रागानें पाठ फिरवून म्हटलें, " आजपासून मी तुझ्याशीं मुळीं बोलायचीच नाहीं. "

" अगदीं संस्कृत शिकायला सुद्धां ? "

मी थोडीशी ओशाळलें आणि म्हणाले, " तेवढ्यापुरती बोलेन, इतर वेळीं बोलणार नाहीं. "

" बरं झालं, तेवढाच माझा अभ्यास चांगला होईल ! "

मला चन्दूचा भारीच राग आला आणि दांत उघडून त्याला वेडावून मी रागानें निघून गेलें.

ताईच्या घरीं माझे दिवस मोठ्या आनन्दांत जात होते. ह्या दिवसांत मला माझ्या आईची सुद्धां आठवण झाली नाहीं. ताईच माझी आई, अशी कांहीं विलक्षण भावना माझ्या हृदयांत उत्पन्न झाली होती. ताईही माझ्यावर मुलीसारखेंच प्रेम करीत असे. काकाही माझें कोडकौतुक पुरवण्यास सदा तत्पर असत. शेजाऱ्यापाजाऱ्यांना देखील वाटावें, कीं ही त्यांचीच मुलगी, असें त्यांचें माझ्याशीं वर्तन असे. जरी एकाददुसरा महिनाच मी तेथें येऊन राहिलें होतें तरी जन्मापासून ह्याच घरीं वाढलें कीं काय असें मला वाटूं लागलें होतें. परकेपणाचा संशयसुद्धां माझ्या मनीं येत नव्हता.

पण हे आनन्दाचे दिवस थोडेच टिकणार होते ? केव्हांतरी माहेरीं जाणें अवश्य होतेंच. माहेरीं गेल्यानंतर पुढें सासर ! सासरची कल्पना मनांत आली, कीं माझ्या अंगावर कांटा उभा राहात असे. आतां पुन्हां तिथें गेलें, कीं प्रसंगीं धीर द्यायला ताईही नाहीं, ह्या जाणिवेनें माझ्या हृदयाचा थरकांप होई. कुठलें कुणाचें घर तें ? त्या घरीं मी कां जावें, कां त्यांचा छळ सोसावा, माझा छळ करण्याचा त्यांना अधिकार काय—आणि त्यांचा छळ सोसून रहाण्याइतकी मी तरी गोगलगाय कां व्हावें ? अशा नाहीं नाहीं त्या कल्पना रिकाम्या वेळीं माझ्या मनांत येत असत. एक जिज्ञासा होती, ती मात्र हा वेळपर्यंत पुरी झाली नव्हती. ज्यांच्याशीं माझें लग्न झालें ते आहेत तरी कसे, हें कुणाला ना कुणाला तरी विचारावें असें पुन्हां पुन्हां मनांत येत असे. ताईच्या घरीं तरी एकादा फोटो असेल असें मला

वाटलें होतें पण तीही निराशा झाली. ताईच्या घरीं तरी त्यांच्यासंबंधीं कांहीं गोष्टी निघतील अशी कल्पना होती, पण तीही फुकट गेली. हा तोंड बांधून बुक्कयाचा मार मला असह्य झाला. विचारावेंसें मनांत आलें तरी विचारण्याचा धीर होईना. मनांतील जिज्ञासा तशीच्या तशीच अतृप्त राहिली.

इतक्यांत बाबांचें पत्र आलें. मला पाठवून देण्याविषयीं त्यांनीं निकडीचा आग्रह केला होता. त्यांना स्वतः यायची सवड नसल्यामुळें कुणीतरी खात्रीचा मनुष्य सोबतीला देऊन मला पाठवून देण्याविषयीं त्यांनीं पत्रांत लिहिलें होतें. त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं काकांनीं स्वतःच मला घेऊन जावें असें ठरलें.

मला निरोप देतांना ताईला रडें कोसळलें. हुंदके देत अर्ध्या वाटेपर्यन्त ती आमच्या गाडीमागोमाग येत होती. चन्दूही तिच्याबरोबरच होता. तो कांहीं तिच्यासारखा रडला नाहीं. मी रडत होतें आणि ताई दृष्टिआड होतांच मला जो एक जोराचा हुंदका आला त्यामुळें माझें रडें कांहीं केल्या आवरेना. काकांनीं परोपरीनें माझें सांत्वन केलें आणि ‘पुन्हां लवकरच घेऊन येईन’ असें आश्वासन दिलें. रडत असतांनाच गाडीच्या आंदुळण्यामुळें मला झोंप लागली.

## प्रकरण सातवें माझें वैधव्य ?

गांवाच्या बाहेर येऊन गाडी उभी रहातांच. मी जागी झालें. त्या वेळीं चांगला डोक्यावर दिवस आला होता. आम्हीं खालीं उतरून गांवांत जाण्यास निघालों.

काय असेल तें असो, माझीं पावलें अगदीं जड पडूं लागलीं. उगीच उरांत धडकी भरली आणि जीव अगदीं कासावीस झाल्यासारखा झाला. गाडीच्या प्रवासानें तसें झालें असेल असें त्या वेळीं मला वाटलें. घराच्या जसजशी जवळ येऊं लागलें तसतसें घरीं जाऊं नये असें वाटूं लागलें आणि समोर घर दिसूं लागतांच माझ्या छातींत धस्स झालें. दारांत बऱ्याच मंडळींचा घोळका जमला होता. तो घोळका पाहून काकांनाही आश्चर्य वाटलें. घराच्या जवळ येतांच मोठमोठ्यानें रडण्याचा आवाज मला ऐकूं आला. मी जड पावलानें तशीच धांवत पुढें गेलें. मी घरांत शिरतांच दारांतील मंडळी बाजूला होऊन त्यांनीं मला वाट दिली. बाबा डोक्यावर हात धरून खालीं मान घालून बसले होते. आजूबाजूला शेजारची परिचित मंडळी बसली होती. मला पहातांच बाबा एकदम 'मथे' म्हणून मोठ्यानें ओरडले आणि टाहो फोडून रडूं लागले. मी तशीच आंत गेलें. आई माजघरांत बसून मोटमोठ्यानें हंबरडा फोडून रडत होती. मला पहातांच ती अगदीं भयंकर आवाजानें ओरडून म्हणाली,

"मथे, मथे, काय ग झालं हें ?"

मी एकदम जाऊन आईच्या गळ्याला मिठी मारली आणि मीही रडूं लागलें. मी कां रडत होतें तें माझें मलाच कळत नव्हतें.

मी रडत रडत आईला विचारलं, "आई काय ग झालं ?"

माझ्या शब्दासरशीं आईला रडण्याचा मोठा उमाळा आला. ती काळीज फुटेपर्यंत रडूं लागली. मी 'काय झालं' म्हणून पुन्हां पुन्हां विचारीत होतें आणि ती उत्तर देण्याचा प्रयत्न करीत पुन्हां पुन्हां टाहो फोडीत होती. तशाच त्या रडण्यांतून एकदम हंबरडा फोडून ती म्हणाली,

"पोरी, तुझं कपाळ फुटलं !"

मी आईच्या गळ्याचा हात सोडला आणि दूर उभी राहिलें.

आई पुन्हां ओरडून म्हणाली, " पोरी, तुझं कुंकू गेलं–मंगळसूत्र तुटलं ! "

मी मटकन् खालीं बसलें. आईचा तो दुःखावेग पाहून माझी आंतडीं तटातट तुटूं लागलीं. आई रडते म्हणून मी रडत होतें, पण आतां माझें रडणें थांबलें. मला रडण्याचा हुंदका येईना. बाजूला जमलेला बायकांचा घोळका माझ्याकडे टक लावून पहात होता. माझी दृष्टि कुठेंच नव्हती. मला कांहींच दिसत नव्हतें तरी माझ्या डोळ्यांसमोर काळोखी आली नव्हती. सर्व कांहीं दिसत असून माझी दृष्टी शून्य झाली होती. मी जमिनीवर आंग टाकलें आणि तशीच पडून राहिलें. आई मोठमोठ्यानें हंबरडा फोडीत होती. आजुबाजूच्या बायकाही उगीच सुस्कारे सोडीत होत्या. बाहेर पुरुषमंडळींतही कुजबूज सुरू होती, पण ह्या कोणत्याही गोष्टीचा माझ्या मनावर कांहींच परिणाम होत नव्हता. आई एवढ्या मोठमोठ्यानें रडते आणि मला रडूं कां येत नाहीं हाच मला प्रश्न पडला होता.

इतक्यांत एक बाई बोलली, " काय बाई भयंकर प्रसंग ! ही बारा वर्षांची पोर. पुढचं उभं आयुष्य कसं निघावं ? मेला नवरा नव्हे–पूर्वजन्मींचा वैरी होता. ह्या जन्मीं नवरा होऊन आला आणि असा हा दावा साधला ! काय म्हाताऱ्यांशीं कधीं कुणाचीं लग्नं झालीं नाहींत ! पण जिथं बळीच घ्यायचा–तिथं कसला म्हातारा आणि कसला तरणा ! "

काय झालें तें आतां माझ्या लक्षांत आलें. एकूण मी विधवा झालें ! म्हणूनच आई रडते आहे ! आई कोणासाठीं रडते आहे ? कशासाठीं रडते आहे ? कुणी तरी मेलें म्हणून कीं मी विधवा झालें म्हणून ? मेलेल्यासाठींच रडत असेल असें म्हणावें तर तिनें त्यांना पुरतेपणीं पाहिलेंसुद्धां नव्हतें. माया लोभ दूरच राहो, पण नुसती तोंडओळख सुद्धां नव्हती. गांवांतलें कुणी अनोळखी माणूस मेलें किंवा असेंच साधारण तोंडओळखीचें माणूस मेलें तर कुठें आई रडत नव्हती ती ! आतांचें तिचें रडणें मी विधवा झालें म्हणून का ? मी विधवा झालें म्हणजे काय झालें ? मी आहें तशीच आहें. माझ्यांत कांहीं फरक झाला नाहीं. हातापायानें, नाकाडोळ्यानें आहें तशीच शाबूद आहें, मग मी विधवा झालें म्हणजे काय झालें ?

आईच्या शेजारीं बसलेल्या बायका रडत होत्या त्या खोट्या रडत होत्या, हें मला अगदीं स्पष्ट कळत होतें. आईचें रडणें मात्र खोटें नव्हतें. आई रडते म्हणून थोड्या वेळापूर्वीं मीही रडत होतें, पण आतां कां रडावें हें माझें मलाच समजेना.

जिथें लाभ नाहीं, लोभ नाहीं, दया नाहीं, माया नाहीं, प्रेमाचा एक टिपूसभरही ओलावा नाहीं–नुसती तोंडओळख सुद्धां नाहीं–अशा एका व्यक्तीच्या मृत्यूमुळें मी कां रडावें ?

रडायचें नाहीं म्हणून मी रडत नव्हतें असें नाहीं. मला रडण्याचा उमाळाच येत नव्हता. शेजारणीसारखें खोटें रडूं आणणें मला लाजिरवाणें वाटलें. मी उठून बसलें आणि सगळीकडे पाहूं लागलें. मी उठून बसलेली पहातांच आईला पुन्हां दुःखाचा उमाळा आला आणि मोठमोठ्यानें हंबरडा फोडून ती रडूं लागली.

"झालं गेलं आतां येतं का परत ? उगि उगि–" असं म्हणून आजूबाजूच्या बायका तिचें सांत्वन करूं पहात होत्या.

माझे डोळे मात्र अगदीं कोरडे ठणठणीत होते.

माझ्यामागें उभी असलेली एक बाई म्हणाली, "काय तरी बाई दुष्ट कार्टी ! निर्दयपणाची कमाल झाली ! डोळ्यांत एक टिपूससुद्धां नाहीं. कशी घट्टासारखी बसली आहे पहा !"

त्या बाईचा मला राग आला, पण तिच्या बोलण्याची लाज वाटली नाहीं. 'आगीवांचून कढ नाहीं आणि मायेवांचून रड नाहीं' अशी जी म्हण मी ऐकत असें ती मला त्या वेळीं आठवली. सहवास नाहीं, नुसतें पाहिलें सुद्धां नाहीं, तिथें माया कुठली ? आणि मायेशिवाय रडें तरी कसें यावें ? मी स्तम्भित होऊन नुसती बसलें होतें इतक्यांत एक वृद्ध विधवाबाई पुढें आली आणि माझ्या हाताला धरून तिनें मला परसदारी नेलें. तिनें आपल्या हातानें माझें कुंकू पुसलें, माझें मंगळसूत्र तोडून टाकलें आणि न्हाणिघरांत नेऊन मला थंड पाण्यानें आंघोळ घातली.

दिलेली साडी नेसून मी परत माजघरांत येऊन दगडासारखी भिंतीला टेंकून स्वस्थ बसलें.

तितक्यांत आईही आंघोळ करून आली आणि माजघराच्या दुसऱ्या बाजूला एक चटई टाकून हुंदके देत आडवी झाली.

जमलेली मंडळी हळुहळू जाऊं लागली.

आतां मी कुंकू लावायचें नाहीं हें माझ्या ध्यानीं आलें. कां लावायचें नाहीं ? लहानपणापासून मी कुंकू लावीत नव्हतें का ? मग आजच कां लावायचें नाहीं ?

मला असें वाटलें, कीं घरांत जावें, कुंकवाचा करंडा घेऊन यावें आणि कुंकू लावावें. कुंकू लावल्याशिवाय स्नान केल्यासारखें मला वाटेना, पण आईचे शब्द आठवले, "पोरी तुझं कुंकू गेलं, मंगळसूत्र तुटलं!"--आतां ह्यापुढें कुंकू लावायचें नाहीं, कधीं कधीं म्हणूनसुद्धां कुंकू लावायचें नाहीं, असा त्या शब्दांचा अर्थ होता का ? मंगळसूत्र तोडल्याचें मला कांहींच वाटलें नाहीं. गळ्यांत जे दोन पोत होते त्यांतला एक गेला काय आणि राहिला काय मला दोन्ही सारखींच होतीं!

पण मी कुंकू कां लावायचें नाहीं ?

कुणाला हा प्रश्न विचारूं ?

दोन प्रहरीं बनीच्या आईनें आपल्या घरून जेवण करून आणून आम्हांला वाढलें. आईला एक घांसभरसुद्धां अन्न गेलें नाहीं. रडून रडून तिचा घसा अगदीं कोरडा पडला होता. अन्न तोंडाशीं नेतांच तिला ओकारी येऊं लागली. मी अगदीं रोजच्यासारखी जरी नाहीं तरी चांगली जेवलें. बाबा आणि काका आधींच जेवले होते. जेवण होतांच आई चटईवर जाऊन पडली. मीही तशीच भिंतीशीं टेकून स्वस्थ बसलें होतें. बाबा आणि काका कांहींच न बोलतां बाहेर स्वस्थ बसले होते.

कुणीच कांहीं बोलत नाहींसें पाहून काकांनीं बोलायला सुरवात केली. ते बाबांना म्हणाले, "आजच मी यावं आणि हा प्रसंग यावा ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे. इतक्या लवकर पोरीवर असं आभाळ कोसळेल असं मला वाटलं नव्हतं. आतां झाल्या गोष्टीला उपाय नाहीं. तुम्ही स्वतःच असं डोकं धरून बसूं लागलांत तर त्या बायकांनीं काय करावं? तुम्ही विद्वान् आहांत, शास्त्रंपुराणं तुम्हीं वाचलीं आहेत, लोकांना ऐकवलीं आहेत, तुम्हींच जर असे धीर सोडूं लागलांत तर अशिक्षित माणसांनीं काय करावं ? प्रसंगीं दुःखितांना धीर देण्याचा अधिकार तुमचा आहे."

अगदीं खोल आवाजानें बाबा म्हणाले, "माझाच जिथं धीर सुटला आहे तिथं दुसऱ्यांना मी धीर कुठला देऊं ? मुलीला मंगळ होता म्हणून चांगलं मंगळाचं स्थळ पाहून दिलं, वयाकडे सुद्धां पाहिलं नाहीं त्याच्या, अखेरीस हा परिणाम झाला ! कसलीं शास्त्रं आणि कसली विद्वत्ता ! ह्या साऱ्या शास्त्रांवरचा माझा विश्वास पार उडाला."

काका म्हणाले, " हें नुसतं स्मशानवैराग्य आहे. मी बोलतों आहें त्याचा राग मानूं नका. शास्त्रावरचा तुमचा विश्वास उडाला नाहीं. शास्त्रावरच्या ह्या खुळ्या विश्वासामुळं तुम्हीं उघड्या डोळ्यांनीं मुलीला खाईत लोटलं आणि शास्त्रावरल्या विश्वासाला यापुढेंही कवटाळून मुलीच्या पुढल्या आयुष्याचं मात्र मातेरं कराल!"

एक दीर्घ विश्वास टाकून बाबा म्हणाले, " आतां मातेरं तें काय व्हायचं राहिलं आहे?"

काका म्हणाले, "असं कां म्हणतां? सारी बारा वर्षांची मुलगी. उभं आयुष्य अजून तिच्यापुढं आहे. त्या आयुष्यावर दैवानं घाला घातला असला तरी तो दूर सारून पुढलं आयुष्य सार्थकी लावण्याचा उपाय तिला दाखवून दिला पाहिजे. आतां नुसतीं नांवं ठेवण्याचे दिवस राहिले नाहीत. अमक्यानं अमुक केलं आणि तमक्यानं तमूक केलं अशा नुसत्या कुचाळ्या केल्यानें दैवाचा घाला दूर होत नाहीं. प्रसंगाला तोंड दिलं पाहिजे. प्रसंगाला तोंड देण्याचं धैर्य आणि ताकद मुलीच्या अंगीं आणली पाहिजे. काय प्रसंग आला आहे ह्याची त्या बिचारीला कल्पना सुद्धां नसेल! तिला असं अंधारांत ठेवून चालणार नाहीं. तिच्या ताकदीची तिलाच पारख करतां येईल अशा प्रकारचं शिक्षण तिला दिलं पाहिजे. मुलीला शिक्षण द्यायचं म्हटलं कीं तुम्हीं जुन्या काळचीं माणसं नाकं मुरडतां. एक वेळ मुलाच्या शिक्षणाची आबाळ झालेली पत्करेल पण मुलीच्या शिक्षणाची खबरदारी आधीं घेतली पाहिजे. स्वतःच्या पायावर उभं रहातां येईल इतकी ताकद तिच्या अंगीं आली पाहिजे, तरच पुढलं आयुष्य तिला अब्रूनिशीं काढतां येईल. आतां ह्या तुमच्याच मुलीची स्थिति पहा. तिच्या सासरचीं माणसं इतकी खट्याळ आहेत, कीं असल्या स्थितींत त्या घरीं एक महिनासुद्धां काढणं तिला कठीण जाईल. तुमचीही परिस्थिति अशी नाहीं कीं मुलीला तुम्हीं जन्मभर पोसाल. दुःखाचा भार हलका करण्यासाठीं नुसतं डोक्यावर हात ठेवून बसून चालणार नाहीं. ह्या क्षणापासून पुढल्या उद्योगाला लागलं पाहिजे. मुलीचं लग्न झालंच नव्हतं असं समजा. कसलं तें लग्न? नुसती लग्नाची शपथ झाली. एकमेकांची पुरती तोंडओळखसुद्धां झाली नाहीं. गेलेल्या माणसांना नांवं काय ठेवायचीं म्हणा, पण असले हे अविचार पाहिले कीं अंगाचा कसा भडका होतो!"

बाबा मान खालीं घालून नुसते मुळुमुळु रडत होते.

पडल्या जागेवरूनच आई काकांचें सर्व भाषण लक्षपूर्वक ऐकत होती.

बाबा कांहीं बोलत नाहींत असें पाहून काकाही स्वस्थ बसले.

कुणीच कांहीं बोलत नव्हतें !

भर दिवसा भयाण रात्रीची कळा आली होती. त्या अवकळेमुळें माझ्या अंगावर शहारे आले. मी दचकून घाबरून उठलें आणि आईजवळ येऊन बसलें. मी जवळ येतांच मोठ्या कष्टानें आईही उठून बसली. तिनें माझ्या तोंडाकडे पाहिलें आणि माझ्या फटफटित कपाळाकडे तिची नजर जातांच ती पुन्हां हंबरडा फोडून रडूं लागली. काका घाबरून आंत आले आणि दाराजवळ उभे राहिले. काकांना पहातांच आई उठून उभे रहाण्याचा प्रयत्न करूं लागली, पण पायांत जीव न राहिल्यामुळें ती पुन्हां कोलमडून खालीं पडली.

आईची ही स्थिति पाहून काका म्हणाले, " कांहीं उठण्याचं कारण नाहीं. मी कुणी परका नाहीं. तिला जशी तुम्हीं बहीण म्हणून मानलं, तसाच मलाही आपला भाऊच समजा. तिच्या तोंडच्या गोष्टी ऐकून मी मोठ्या उल्हासानं तुम्हां उभयतांचा परिचय व्हावा म्हणून आलों तों ह्या अशा वेळीं येऊन पोहोंचलों ! आतां असं रडून काय होणार ? तुम्हीच रडूं लागलांत तर त्या मुलीनं कुणाच्या तोंडाकडे पहावं ? डोळे पुसा, दुःख विसरा आणि त्या मुलीला धीर द्या. आतां गांवांतलीं माणसं दुखवट्यासाठीं म्हणून येतील आणि पुन्हां पुन्हां तीच गोष्ट उकरून काढतील अन् त्यामुळं समाधानाऐवजीं मनस्ताप मात्र अधिक वाढेल. कुणीं कितीही आठवणी काढल्या तरी दुःखाचा उमाळा येऊं देऊं नका. आपल्यावर काय दुःख कोसळलं आहे ह्याची जाणीव ज्या मुलीला नाहीं त्या मुलीच्या मनाला तुमच्या रडण्यानं काय भयंकर वेदना होतील तें ध्यानांत घ्या."

काकांचे हे शब्द ऐकून आईनें डोळे पुसले. मग काका माझ्याकडे वळून म्हणाले, " मथू, ऊठ. त्या आंतल्या खोलींत जाऊन बैस आणि कुणी माणसं आलीं तरी मुळींच बाहेर येऊं नकोस. वहिनी, तुम्हीही ध्यानांत ठेवा. कुणी कांहीं बोललं तरी हुंदका म्हणून येऊं द्यायचा नाहीं. "

मी खोलींत जाऊन आडवी झालें आणि काका बाहेर गेले. त्यांनी बाबांना कसलीशी पोथी काढायला सांगितली आणि कसल्याशा भाष्यावर ते बाबांशीं चर्चा करीत बसले.

एकामागून एक गांवची मंडळी दुखवट्यासाठीं येऊं लागली. लोक येऊन बसतांच बाबांनीं त्यांच्याकडे वळून बोलण्याचा प्रयत्न करावा आणि काकांनीं भाष्य विचारण्याचा आरंभ करून त्यांचें बोलणें बंद पाडावें, असें चाललें होतें !

आलेली मंडळी कंटाळून एकामागून एक निघून गेली.

बायकांचें मात्र तसें झालें नाहीं. बायकांनीं जो त्रास द्यायचा तो दिलाच. सांत्वनाच्या नांवाखालीं जितकें म्हणून घालून पाडून बोलून घेतां येणें शक्य होतें तितकी संधि प्रत्येकीनें साधून घेतली. स्वतः च्या दुःखापेक्षां हीं टोमणे ऐकण्याचींच दुःखें आईला जास्त झालीं.

खोलींत बसल्यामुळें मी मात्र ह्या सर्व संकटांतून अनायासें सुटलें होतें.

पुन्हां पुन्हां मला वाईट वाटत असे एका गोष्टीचें, सारे जण दुःखानें चूर होऊन गेले होते पण माझ्या मनाला दुःखाचा लवलेशही शिवला नाहीं. आईच्या दुःखाशीं समरस होण्याचा मी पुष्कळ वेळां प्रयत्न करून पाहिला पण तो साधला नाहीं. माझा मलाच राग येऊं लागला. हें असें कां व्हावें ह्याचें निदान मला ठरवतां येईना. मुलीचें लग्न झालें, ह्यामुळें आईला सौख्य झालें होतें. एकच वर्षाच्या आंत तिला वैधव्य आलें. तें वैधव्य जरी अनपेक्षित नव्हतें, तरी अपेक्षे-पेक्षां पुष्कळच लवकर आलें म्हणून आईच्या मनाला धक्का बसला. तिला दुःख झालें. माझें लग्न झालें एवढें मला नुसतें कळलें होतें. नुसतें लग्न होण्यापेक्षां जास्त असा लग्न झाल्याचा कोणताच अनुभव मला आला नव्हता. एवढेंच नव्हे, तर ज्यांच्याशीं माझें लग्न झालें त्यांना मी पुरतेपणीं पाहिलेंही नव्हतें. त्यामुळेंच मला दुःख झालें नाहीं काय?

रात्रीं काका माझ्या खोलीच्या दाराशीं येऊन बसले आणि मला म्हणाले, "मथू, मनांत कांहीं ठेवूं नकोस. जें कांहीं वाटत असेल तें स्पष्टपणें मला सांगून टाक. तेवढंच दुःख हलकं होईल."

मी म्हटलें, "काका, मला दुःखच झालं नाहीं तर हलकं कसलं व्हायचं? मी आलें त्या वेळीं आई रडत होती म्हणून क्षणभर मला उमाळा आला. त्यानंतर माझं रडं थांबलं. त्यानंतर आतांपर्यंत मी डोळ्यांतून एकही टिप टाकलं नाहीं कीं हुंदका दिला नाहीं."

काका म्हणाले, "ठीक आहे. असंच कर. तूं रडलीस तर तुझ्या आईचं दुःख वाढेल. तिच्या दुःखाची तुला कल्पना करतां येणार नाहीं. हें दुःख केवढं मोठं आहे ह्याची जाणीव तुला आज होणार नाहीं. ज्या वेळीं तुला समज येईल, बाहेरच्या जगाशीं झगडावं लागेल, त्या वेळीं आज तुझ्या आईच्या डोळ्यांतून पडत आहेत त्यापेक्षां शंभरपट टिपं तुझ्या डोळ्यांतून पडतील. दुःखाचा प्रत्यक्ष

चटका बसल्याशिवाय रडत बसावं लागेल. आज तुला कांहींच कळत नाहीं हेंच टीक आहे. ”

काका तसेच उठून बाहेर गेले. मीही पडल्या जागीं झोपों गेलें. झोंप येतां येतां बाहेर बाबा आणि काका कांहीं तरी बोलत आहेत असें साधारणपणें ऐकूं येत होतें, पण डोळ्यांवर झोंपेची झांपड असल्यामुळें ते काय बोलत होते तें ध्यानांत राहिलें नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्हीं जागीं झालों तरी घरावरची कालचीच अवकळा कायम होती. कुणीच कुणाशीं कांहींच बोलत नव्हतें. जिकडे तिकडे कसें सामसूम वाटत होतें. स्तब्धतेमुळेंच मला भीति वाटूं लागली. आईच्या जवळ जावें तर ती पुनः रडूं लागेल अशी शंका येई. आई अंग धुऊन घरांत आली अशी संधि साधून मी स्नान करून घेतलें. नित्याच्या संवयीप्रमाणें कुंकवाच्या करंड्याकडे हात गेला. ‘ लावूं न लावूं ? ’ अशी शंका मनांत आली. पुन्हां पुन्हां वाटे, कीं कुंकू लावावें, पण आईचे ते शब्द आठवले कीं पुन्हां हात मागें यावा. मी घोटाळून तशीच उभी राहिलें होतें. काका माझ्यामागें केव्हां येऊन उभे राहिले तें मला कळलें नाहीं. त्यांनीं माझ्या नांवानें हांक मारतांच मी दचकून बाजूला झालें.

काका म्हणाले, “ मथू, बाळ, तो करंडा आतां तुला कायमचा अंतरला. आतां यापुढं त्या कोनाड्याकडे जाऊं सुद्धां नकोस. ”

मी मान खालीं घातली आणि कांहीं न बोलतां खोलींत जाऊन बसलें.

काका त्याच दिवशीं निघून आपल्या गांवीं जाणार होते, पण बाबांनीं आग्रह करून त्यांना राहून घेतलें.

बाबा म्हणाले, “ तुमच्या शब्दांनीं तर मी उभा रहातों आहें. एवढे अकरा दिवस तरी तुम्हीं जाऊं नका. ”

काका म्हणाले, “ जो प्रसंग इथं आहे तो तिकडेही आहे. तिची स्थिति काय झाली असेल ह्या काळजीनं मला चैन पडत नाहीं. मन दोहोंकडे ओढतं आहे. कुठं जावं आणि कुठं राहावं हेंच मला निश्चित करतां येत नाहीं. ”

बाबा म्हणाले, “ ताई समजूतदार आहेत. त्या आपल्या मनाचं समाधान कसंही करून घेतील. आम्हीं मूर्ख आहोंत, अज्ञान आहोंत, निराधार आहोंत,

गांवांतील लोकं आम्हांला छळण्यासाठीं टपून बसलीं आहेत. तुम्हीं होतां म्हणून कालचा दिवस निभावला. दुखवट्याच्या नांवाखालीं हे लोक मला फाडफाडून खातील. मी सर्वस्वी अपराधी आहें. माझ्या मूर्खपणामुळं मी पोरीच्या गांठीला वैधव्य बांधलं हें मला कळतं आहे, पण हीच गोष्ट दुसऱ्यानं सांगितली म्हणजे हृदयाला घरे पडतात. कुणी भेटायला येतील ह्याची त्यामुळंच भीति वाटते. एवढ्या-साठीच दया करा आणि आम्हांला टाकून जाऊं नका."

काकांचे डोळे ओले झालेले मला दिसले. ते म्हणाले, "बरं आहे. आज तसं एक पत्र लिहून टाकतों. तुम्हीं ज्या वेळीं परवानगी द्याल त्याच वेळीं मी इथून जाईन. मग तर झालं ना ?"

काकांना आमच्या घरीं जेवायचें नसल्यामुळें ते गोपाळभटजींच्या घरीं जेवायला जात असत. ते जेवायला गेले म्हणजे घरांत एकटें राहणें आम्हांला मोठें कठीण जाई. मला आईची भीति वाटे, आईला बाबांची भीति वाटे आणि बाबांना आम्हां दोघींची भीति वाटे. एकमेक एकमेकांशीं चोरासारखीं झालों होतों. काका जेवून आल्यावर आमची ही स्थिति मी त्यांना सांगितली. त्यांनीं बाबांना बोलावून कसली तरी पोथी काढण्यास सांगितलें. बाबा म्हणाले, "गरुड-पुराण काढूं का ? ह्या दिवसांत गरुडपुराण वाचावं असं आहे." काकांनीं उत्तर दिलें, "तूर्त गरुडपुराण राहूं दे. मी तें पुष्कळ वेळां ऐकलं आहे. महाभारत असलं तर तेवढं भीष्मपर्व ऐकायची माझी फार इच्छा आहे."

बाबांनीं महाभारताची पोथी काढली आणि भीष्मपर्व वाचण्यास सुरवात केली. वाचण्याची बैठक माजघरांत ठेवली होती. दुपारीं दुखवट्यासाठीं येणाऱ्या मंडळींची येरझार सुरू झाली. पुराण सुरू असल्यामुळें कुणालाच कांहीं बोलतां आलें नाहीं. पुराणाच्या जागींच आई बसलेली असल्यामुळें आलेल्या बायकांचा आज तिलाही त्रास झाला नाहीं. रोज नित्य नियमानें महाभारताचें वाचन सुरू होतें. रोज दुखवट्यासाठीं म्हणून पुरुषबायकामंडळी येत असे आणि कांहीं न बोलतां त्यांना निराश होऊन परत जावें लागत असे. चारदोन दिवसांत मंडळी येण्याचें बंद झालें. पुराण मात्र नित्य सुरू होतें. महाभारत हा बाबांच्या अत्यंत आवडीचा विषय होता आणि काकांसारखे श्रोते मिळाल्यामुळें पुराण सांगण्याचा त्यांना उल्हास येत असे. त्या उल्हासामुळें ते आपलें दुःख विसरले आणि आईही पुष्कळच लक्षपूर्वक पुराण श्रवण करूं लागली.

आलेल्या प्रसंगाबद्दल कुणाच्या तोंडून एक अवाक्षरही निघूं नये ह्याची काका खबरदारी घेत होते त्यामुळें ह्या प्रसंगानें खचून गेलेली माझी आई लवकरच सांवरली. पुराणाखेरीज जो इतर वेळ जात असे त्या वेळीं काका निरनिराळीं शास्त्रवचनें बाबांना विचारून तीं टिपून ठेवीत असत. अशा प्रकारें काका असेपर्यन्तचा वेळ सारखा उद्योगांत गेला.

आल्या प्रसंगाचा विचार करण्यापेक्षां काकांनीं केलेल्या चर्चेचाच मी जास्त विचार करूं लागलें.

आईही हळूहळू माझ्याशीं न दचकतां बोलूं लागली.

मीही नित्याप्रमाणें हळूहळू आईच्या कामाला हातभार लावूं लागलें.

बाराव्या दिवशीं बाबांचा निरोप घेऊन काका जायला निघाले त्या वेळीं बाबांचें हृदय अगदीं भरून आलें. त्यांनीं काकांना कडकडून घट्ट मिठी मारली आणि त्यांच्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा वाहूं लागल्या. काका म्हणाले, " आहे हाच क्रम चालू ठेवा. शिवाय मथूचं संस्कृत शिक्षण थांबलं आहे तें पुन्हां सुरू करा. कुणाची भीडभाड धरूं नका. कांहीं दिवस लोक नांवं ठेवतील, पण तुम्हीं त्यांची मुर्वत ठेवीत नाहीं असं दिसल्यावर आपोआप टीका बंद पडेल. मी तिकडे आमच्या गांवीं मथूला संस्कृत शिकवण्याचा उपक्रम सुरू ठेवला होता. तिथं तिची बरीच प्रगती झाली आहे. तसंच सोडून द्याल तर ती शिकलेलं विसरून जाईल. ह्या वेळीं तिला सदोदित तुमच्या सान्निध ठेवा. संस्कृत शिकवून तिला उत्तम तरबेज करायचं हें एकच ध्येय मनांत बाळगा. उद्यां तुमच्याप्रमाणेंच तिला व्यासपीठावर बसून पुराण सांगतां आलं पाहिजे एवढं शिक्षण तिला द्या. ह्यांत यत्किंचितही हयगय करूं नका अशी माझी हात जोडून तुम्हांला विनंति आहे."

सर्वांचा निरोप घेऊन काका निघून गेले, तेव्हां मात्र मला जिकडे तिकडे अंधार पडल्यासारखें वाटलें. आई देखील पहिल्या दिवसाप्रमाणें चटई टाकून रडत पडली. बाबाही डोक्यावर हात ठेवून ओटीवर स्वस्थ बसून राहिले.

घरांत पुन्हां जिकडे तिकडे भयाण वाटूं लागलें.

मी मनाचा हिय्या केला, बाबांच्या समोर आलें आणि विचारलें, " पुराण सांगायचं ना ?"

बाबा क्षणभर माझ्याकडे वेड्यासारखे पहात राहिले.

मी पुन्हां विचारलें, " पुराण सांगायचं ना ? "

बाबा एकदम दचकले आणि गहिंवरून म्हणाले, " पोरी, हें तुझं पांढरं फटफटीत कपाळ—हें पांढरं फटफटीत कपाळ पहाण्यापेक्षां माझे डोळे फुटले असते तरी बरं झालं असतं. "

केविलवाण्या मुद्रेनें उच्चारलेले ते बाबांचे उद्गार ऐकून माझा धीर सुटला. रडें अगदीं माझ्या ओठाशीं आलें, पण हा वेळपर्यंत न रडलेली मी जर ह्याच क्षणीं रडूं लागलें तर घरांत सर्व कल्लोळ माजेल, ही कल्पना मनांत येऊन मी दांतओंठ खाऊन आलेला हुंदका गिळून टाकला आणि म्हणालें, " काकांनीं जातांना काय सांगितलं आहे ? "

बावरल्यासारखें करून बाबा म्हणाले, " खरं आहे, खरं आहे, त्या पुण्यात्म्याचा शब्द मोडीन तर मला नरकांत सुद्धां जागा मिळणार नाहीं. "

बाबा तसेच उठले आणि पोथी घेऊन बसले. मी समई नेऊन चौरंगाशीं ठेवली आणि पुराणाला सुरवात झाली. पुराण सुरू होतांच चटईवर अंग टाकून पडलेली आईही उठून बसली. शून्य मुद्रेनें ती पुराण ऐकत होती, पण पुराणाचा विषय तिच्या लक्षांत येत होता कीं काय ह्याची मला शंकाच होती.

पुराण संपलें, पोथी गुंडाळून बाबा बाहेर गेले, तरीही आई अगदीं दगडासारखी स्वस्थ बसली होती.

मी आईचा बिछाना घातला आणि ती उठत नाहींसें पाहून तिच्याजवळ गेलें आणि हळूच तिच्या कानाशीं लागून म्हणालें, " आई, आतां निजायचं ना ? "

आई एकदम दचकून कावऱ्याबावऱ्या मुद्रेनें इकडे तिकडे पहात उठली आणि बिछान्यावर जाऊन पडली.

मीही दुसरा बिछाना न घालतां तिच्याजवळ जाऊन तिच्या पांघरुणांत शिरलें. मी जवळ आलेली पहातांच आईनें मला इतक्या जोरानें कडकडून मिठी मारली, कीं मला श्वासोच्छ्वास सुद्धां करतां येईना.

गहिंवरानें दाटलेल्या शब्दांनीं ती म्हणाली, " पोरी, आतां तुझं कसं होणार ? आम्हीं चांडाळांनीं आपल्या हातानं तुझं कुंकू पुसून टाकलं ! दैवाला कसला दोष द्यायचा ? जसं व्हायचं तसं झालं असतं आणि मग हा प्रसंग आला असता तर तितकं दुःख झालं नसतं. म्हातारपणामुळं कांहीं त्यांना मरण आलं नाहीं. ह्या

प्लेगानं तरणीताठीं माणसं सुद्धां पटापट मरत आहेत–त्यांतलाच हा एक घाला. तरीही मनाला वाटतं, कीं अपराध आमचाच. काका इतकं परोपरीनं सांगत होते, पण माझी कुठली समजूत पडायला ? बारा वर्षांची पोर विधवा ! अहेवपणा म्हणजे काय हें जिला पुरतेपणीं कळलं नाहीं तिच्या कपाळीं हें वैधव्य ! पोरी, आतां पुढं तुझं होणार तरी कसं ? सासरचीं माणसं तर तशा प्रकारचीं, माहेर हें असं मोडकंतोडकं, आतां पुढं तुझं कसं होणार ? ”

आई पुन्हां हुंदके देऊन रडूं लागली त्यासरशीं मलाही रडें कोसळलें. आम्हीं दोघींही घटकाभर फुलून फुलून रडत होतों. आसवांत आसवें मिसळलीं जात होतीं. हुदक्यांना हुंदक्यांची साथ मिळत होती. धडधडणाऱ्या हृदयांचे ठोके एका आवाजांत पडत होते.

अजूनही ती आठवण येतांच मला नकळत हुंदका येतो. जगाशीं टक्कर देतांना आज जरी मी निगरगट्ट बनलें आहें तरी आईच्या त्या निस्सीम दुःखाच्या आठवणीनें आजही माझ्या सर्वांगाला थरकांप सुटतो. आकाशांतली कुऱ्हाड माझ्या मस्तकांत पडली तरीही मी डगमगलें नव्हतें. दुःखाचें दुःख मला जाणवलें नव्हतें, पण सुखाच्या आशेनें अधीर झालेल्या माझ्या आईच्या दुःखाचीं दोनच आसवें माझ्या गालांवर पडतांच माझ्या हृदयानें ठाव सोडला.

आईच्या त्या रडण्याची आठवण झाली म्हणजे अजूनही एक प्रकारचा आनंद होतो. मातेच्या निस्सीम प्रेमाचा तो अश्रुबिंदु दुःखाच्या अंधकारांत हिऱ्यासारखा चमकत असलेला अजूनही माझ्या नजरेसमोर दिसत असतो. तें दोन हृदयांचें अश्रुमीलन गंगायमुनेच्या संगमासारखें पवित्र होतें. त्यांत विकाराची छाया नव्हती. विचाराचा तापही नव्हता. दोन हृदयांना झालेल्या वज्राघाताचा तो पाझरलेला प्रतिध्वनी होता. इतके दिवसपर्यंत डोळ्यांतून एक टिपूसही गळलें नाहीं, त्याचें आजच्या आसवांनीं सार्थक झालें असें मला वाटलें. दररोज झोंपी जातांना अंतःकरणांत उसळणाऱ्या दुःखाच्या लहरींचा–कल्पनेच्या तरंगाचा–आज मागमूसही राहिला नव्हता. आम्हीं दोघीही रडत होतों; निर्मळ, सोज्वळ, सात्विक रडें रडत होतों. त्या रडण्याच्या मुळाशीं दुःखाची भावना नव्हती. त्या रडण्याच्या सात्विक आनन्दांत परस्परांच्या गळ्यावर गळा टाकून आम्हीं झोंपीं गेलों. त्या झोंपेंत रोजच्याप्रमाणें भीतिप्रद स्वप्नांचा मला संपर्कही झाला नाहीं. केवळ दुःखाच्या गाढ आनंदाची ती गाढ झोंप होती.

## प्रकरण आठवें थारेपालट

दुसऱ्या दिवसापासून आमचा परस्परांतील संकोच पार मावळला. नित्याचे व्यवहार पूर्ववत् सुरू झाले आणि घरावरील अवकळेची छाया हळुहळू कमी होऊं लागली. माझा संस्कृतचा अभ्यासही सुरू झाला आणि मला शिकवण्याच्या बाबतींत बाबा पूर्वीपेक्षां जास्त मन लावूं लागले.

असेच कांहीं दिवस गेले. त्या दिवसांत नित्याचे व्यवहार यंत्रासारखे चालले होते. विशेष असें कांहीं घडलें नाहीं. मी कधींच कुणाच्या घरीं जात नसें.

बनी मधूनमधून दुपारच्या वेळीं आमच्या घरी बसावयास येत असे. तिच्या पूर्वीच्या वृत्तींत हल्लीं बराच फरक पडला होता. पूर्वीप्रमाणें ती मला कांहींतरी घालूनपाडून बोलेनाशी झाली होती. तिचा नवरा गोन्दू रत्नागिरी येथील हायस्कुलांत शिकत होता. शिक्षणाच्या बाबतींत त्यानें कशी काय प्रगति केली होती हें आम्हांला इकडे गांवीं कळणें शक्य नव्हतें.

एके दिवशीं ताईचें पत्र आलें, त्यांत चन्दू पास झाल्याची हकीकत होती. त्याच्या आकांक्षेप्रमाणें त्याला स्कॉलर्शिप् मिळाली आणि साऱ्या मुलांत त्याचा दहावा नंबर आला. ही हकीकत ऐकून मला अतिशय आनन्द झाला. ह्यावेळीं चंदू प्रत्यक्ष भेटला असता तर किती बरें झालें असतें असें माझ्या मनाला वाटलें. एकवेळ ताईच्या घरीं जावें असेंही मनांत आलें, पण आतां कुठल्या तोंडानें ताईच्या घरीं जाणार ? तसें पाहूं गेलें तर आतां ताईचा माझा काय संबंध राहिला होता ? हा विचार मनांत येतांच मला फार वाईट वाटलें. ताईचें घर म्हणजे मला माहेराहून माहेर झालें होतें. प्रत्यक्ष आईपेक्षांही ताईचें प्रेम मला अधिक वाटूं लागलें होतें. त्यांतूनही भेटीचा योग दुरावल्यामुळें त्या प्रेमाचा ओढा ज्यास्त तीव्र भासूं लागला होता. कितीवेळ तरी माझ्या मनांत आलें, कीं एकदां ताईला पत्र लिहावें. बाबांचीं पत्रें काकांना जात असत, पण बाबांना माझ्या मनांतील इच्छा सांगून तसें पत्र लिहायला लावायचा मला धीर होईना. बाबांचा एरव्हींचा तो संतापी स्वभाव जरी हल्लीं बहुतेक निवळला होता, तरी तो पुन्हां केव्हां उचल खाईल ह्याची मला भीति वाटत असे. मी हल्लीं आपल्या सावलीला सुद्धां भीत असें.

आईशीं बोलतांना देखील मी अगदीं जपून मोजकेच शब्द बोलत असें, मग बाबांकडे बोलण्याची गोष्ट तर अर्थातच दूर राहिली.

एके दिवशीं पुण्याहून मला तिकडे पाठवून देण्याविषयीं पत्र आलें. बाबांना विचार पडला. इतके दिवस आईचें थांबलेलें रडणें पुन्हां सुरू झालें. मलाही पुन्हां सासरची आठवण झाली. आतां सासरीं जावें लागलें तर माझ्यावर काय प्रसंग ओढवेल ह्या भीतीनें माझ्या छातींत धडकी भरली.

मी आईला म्हटलें, " आई, कसंही करून मला पुण्याला पाठवूं नकोस. मला तिकडे जायची भीति वाटते."

आई म्हणाली, " न पाठवून कसं चालेल? आमची सत्ता तुझ्यावर आहे कुठं? तूं त्यांच्या घरची आहेस. इथं रहाणं म्हणजे चार दिवसांचा पाहुणचार. केव्हांना केव्हांतरी तुला आपल्या सासरीं हें गेलंच पाहिजे."

आईचें हें भाषण ऐकून मी अगदीं हताश झालें.

आईच असें म्हणूं लागली तर मी पहावें तरी कुणाच्या तोंडाकडे?

मला ताईची आठवण झाली.

मी आईला म्हटलें, " पाठवायचंच असलं तर मला ताईकडे पाठीव."

आई म्हणाली, " मी तुला आनन्दानं का पाठवणार आहें? तूं मला नकोशी का झाली आहेस? त्यांनीं बोलावणं धाडलं आहे म्हणून पाठवायच्या गोष्टी बोलायच्या. तुला पुण्याला पाठवायचं आजपर्यंत कधीं नांव तरी काढलं होतं का? बरं, ताईकडेही तुला पाठवलं असतं, पण त्यांनीं बोलावल्याशिवाय कसं पाठवायचं?"

आईच्या ह्या भाषणानें माझी पुरी निराशा झाली. आतां पुण्याला जावें लागणार ह्या भीतीनें माझ्या अंगावर कांटा उभा राहिला. त्या वेळीं ताईचा तरी आधार होता. आतां मी तिथें एकटीच! काय होईल आणि काय न होईल याची मला कल्पनासुद्धां करतां येईना.

एक दोन आठवडे तसेच गेले. पुण्याहून निकडीचें पत्र आलें कीं, " कांहीं महत्त्वाच्या कामाकरितां तुमचीही फार जरूर आहे. ह्यासाठीं तुम्हीं स्वतःच सावित्रीबाईंना घेऊन एका दिवसाचाही विलम्ब न लावतां निघून यावें."

आतां मुळीं उपायच राहिला नव्हता. त्या दिवशीं सर्व बांधाबांधी करून आम्हीं जायची तयारी केली. बाबा म्हणाले, " माझी काय जरूरी आहे! आतां

मी तरी जाऊन विशेष काय करणार आहे? त्यांनींच कुणी आपला मनुष्य पाठवला असता तर मुंबईला पाठवून दिली असती. ह्यापुढं त्या घरांत पाय देण्याचा प्रसंग येणं मला मरणप्राय वाटतं."

आल्या प्रसंगाला तोंड देण्याखेरीज गत्यंतर नव्हतें. कसाबसा मनाचा धडा करून बाबा मला घेऊन निघाले आणि आम्हीं पुण्याला येऊन पोहोंचलों.

आम्हीं घरांत पाऊल टाकतांच रडण्याचा एकदम कल्लोळ उडालेला ऐकूं आला. मी चोरासारखी एका कोंपऱ्यांत जाऊन उभी राहिलें. नानासाहेब देखील मोठमोठ्यानें हेल काढून रडत होते. बाबा मान खालीं घालून स्वस्थपणें ओट्यावर बसले होते. काय करावें हें मला कांहींच सुचेना. कुणीच आमच्याकडे पाहीना. कशाला उगीच इकडे आलें असेंही मनाला वाटूं लागलें. रडण्याचा समारंभ उरकल्यावर थोड्या वेळानें नानासाहेब बाबांजवळ येऊन बसले आणि त्यांनीं बोलावयास प्रारंभ केला. ते म्हणाले, "दादांच्या आधारावर सर्व व्यवहार चालले होते. आज आम्हांला दाही दिशा उघड्या झाल्या. प्रसंगाच्या वेळीं कुणाच्या तोंडाकडे पाहीन म्हटलं तर कुणी राहिलं नाहीं. अठरा रुपये पगारांत आतां हा एवढा प्रपंच चालवावा तरी कसा? त्यांतून ही धोण्ड आणखी दादासाहेबांनीं मागं ठेवली आहे!"

बाबा एकदम मध्येंच म्हणाले, "असं म्हणूं नका. माझी मुलगी मला जड नाहीं. माझ्या मुलीचा भार वाहाणं मला कांहीं कठीण नाहीं. मला तरी दुसरं कोण आहे? एवढी एकुलती एक मुलगी. तुम्हीं निकडीनं बोलावलंत म्हणूनच मी तिला घेऊन आलों. नाहींतर तिच्याबद्दल एका शब्दानंही तुम्हांला विचारलं नसतं."

नानासाहेब गंभीर मुद्रा करून म्हणाले, "असं कुठं झालं आहे? जिथलं माणूस तिथंच पाहिजे. प्रपंचाचं काय? कशीही वेळ निभावून जाते. पण आम्हीं तिची चौकशी केली नाहीं, तिला आपल्या घरीं आणली नाहीं तर लोकं आमच्या तोंडांत शेण घालतील! व्यवहार म्हणून कांहीं आहेच. आला प्रसंग कांहीं आतां टळत नाहीं. एका माणसाच्या भारानं कांहीं आम्हीं मरत नाहीं. माणसाची जरूरी कुणाला नाहीं? साऱ्या उणिवा भरून येतात पण माणसाची उणीव कांहीं भरून येत नाहीं. आतां तीच आमची वडील माणूस. प्रपंचाचीं सर्व सूत्रं आतां तिच्या हातीं द्यायचीं. ती जसं सांगेल तसं वागायचं. ती घालील तें खाऊन रहायचं.

तिनं नाहीं म्हटलं तर तक्रार करायची नाहीं. तात्पर्य काय, ह्यापुढं ती आम्हांला दादांच्या जागीं आहे."

नानासाहेबांच्या ह्या भाषणानें बाबांचें बरेंच समाधान झाल्यासारखें दिसलें. मला मात्र त्यांत सत्याचा लवलेशही दिसला नाहीं. त्यांच्या भाषणांत मूर्तिमंत कांगावखोरपणा दिसत होता. आतां बाबांवर कांहींतरी डाव टाकण्याचा त्यांचा हेतू आहे अशी माझ्या मनाची पक्की खात्री झाली आणि म्हणून संधि सांपडतांच ह्या बाबतींत बाबांना सावध करावें असेंही मला वाटलें.

पण संधि सांपडणें शक्य नव्हतें. परिस्थिति मोठी बिकट होती. दारांतील सर्व माणसांनीं माझ्यावर सारखी नजर ठेवली होती. एवढ्या खड्या पहाऱ्यांतून निसटून बाबांना सावध करणें मला अशक्य वाटलें आणि दैवावर भार ठेवून मी तशीच स्वस्थ राहिलें. बाबा त्याच दिवशीं दुपारीं जायला निघाले. नानासाहेबांनीं आग्रहाचा अगदीं सपाटा लावला,—"चार दिवस तरी राहिल्याशिवाय जाऊं नका. तसे गेलांत तर तुम्हीं आम्हांला परके मानतां असं मी समजेन." अशा प्रकारच्या लाघवी बोलण्यांनीं बाबांना भुरळ पाडण्याचा नानासाहेबांनीं पुष्कळ प्रयत्न केला.

पण बाबांचा ठाम निश्चय झाला होता. ते म्हणाले, "तुमचं माणूस आणून तुमच्या स्वाधीन केलं आहे. आतां माझं काम संपलं. ज्या वेळीं तुम्हाला पाठवावंसं वाटेल त्या वेळीं मला एक कार्ड टाका, मी येऊन तिला घेऊन जाईन. असूकच वेळीं पाठवा असा केव्हांही आग्रह करणार नाहीं. सर्व कांहीं सुरळित असतं तर चार दिवसांच्या ऐवजीं चार महिनेही राहिलों असतों, पण अशा ह्या परिस्थितींत चार क्षण देखील मला चार युगासारखे वाटतात."

बाबांचा निश्चय बदलत नाहींसें पाहून नानासाहेबांनीं फडताळांतून दोन कागद काढले, काकांच्या पुढें ठेवले आणि डोळे पुशीत ते म्हणाले, "काय करूं, जिवावर येतं पण नाईलाज आहे. प्रसंग आला तरी व्यवहार कांहीं थांबत नाहीं. जें जसं व्हायचं तसं झालंच पाहिजे. ह्या दोन कागदांवर खुणा केल्या जागीं तेवढ्या दोन सह्या करून द्या म्हणजे झालं."

बाबा हातांत लेखणी घेऊन विचार करीत बसले. त्यांनीं लेखणी दौतींत बुडवली, अगदीं कागदाजवळ नेली आणि त्यांच्या मनांत काय आलें कोण जाणे, ती तशीच फेंकून दिली.

बाबांचें हें चमत्कारिक वर्तन पाहून नानासाहेब म्हणाले, " असं काय करतां? गाडीची वेळ झाली. एकदां चटकन् सह्या करून टाका म्हणजे तुमचीही मोकळीक होईल आणि माझीही होईल."

बाबा म्हणाले, " हे कसले कागद आहेत? मला इंग्रजी येत नाहीं आणि ह्यांत काय लिहिलं आहे तें कळल्याखेरीज मी त्यांच्यावर सही करणार नाहीं."

" कांहीं विशेष नाहीं. दादांच्या वेळच्या व्यवहाराचे हे कांही कागद आहेत. ती सज्ञान असती तर तिचीच सही चालली असती, पण ती अज्ञान असल्यामुळं तुमच्या सहीची जरूरी आहे."

" ती अज्ञान असली तरी आतां तिचा माझा काय संबंध? तिचे पालक तुम्ही आहांत, तुम्हींच सही करा म्हणजे झालं."

नानासाहेब अगदीं शांतपणाणें म्हणाले, " सर्व गोष्टी कायद्याप्रमाणें झाल्या पाहिजेत. कायद्याच्या दृष्टीनं ह्या कागदांवर तुमच्या सह्या पाहिजेत. नुसत्या माझ्या सहीनं भागणार नाहीं."

बाबा अगदीं निश्चयाच्या स्वरानें म्हणाले, " ज्या व्यवहारांत मला कांहीं कळत नाहीं त्या व्यवहारांत मन घालणं मला प्रशस्त वाटत नाहीं."

असें म्हणून बाबा जाण्याच्या तयारीनें उठून दारापर्यंत गेले. कागद उचलून हातांत घेऊन नानासाहेब बाबांच्याजवळ जाऊन उभे राहिले आणि म्हणाले, " शास्त्रीबोवा, काय हें? कोणतीही अयोग्य गोष्ट करायला मी तुम्हांला सांगेन असं तुम्हांला वाटलं तरी कसं? चला, चटकन् सही करून टाका म्हणजे उगीच व्यवहार खोळंबून रहाणार नाहीं. "

" आतां माझं मन स्थिर नाहीं. मला कांहींच सुचत नाहीं. हे कागद असेच भास्कररावांकडे पाठवून द्या नी मला कळवा, म्हणजे मी मुद्दाम त्यांच्या गांवीं जाईन आणि ते सांगतील त्याप्रमाणें व्यवस्था करीन. "

नानासाहेबांना पुढें बोलायचा अवसर न देतां बाबा जे तडक निघाले ते टांग्यांत जाऊन बसले.

बाबा गेलेले पहातांच नानासाहेबांनीं आपलें खरें स्वरूप प्रकट केलें. ते मोठ्यानें ओरडून म्हणाले, " पाहिलंस अक्का, म्हातारा कसा बदमाष आहे तो? म्हणे भास्कररावांकडे कागद पाठवून द्या. दोघेही कोंकणचेच चोर कीं नाहीं—दोघेही

एकमत करतील आणि माझ्या गळ्यावर सुरी फिरवतील. ह्या कोंकणच्या लोकांशीं कुठला हा संबंध आला ? हे कोंकणचे लोक म्हणजे आधींच नांवाजलेले कज्जेदलाल, माझ्यासारख्या नोकरपेशाच्या माणसाला थोडेच दाद देणार ? आणि म्हणे भास्कररावांकडे पाठवा ! काय त्यांचा माझा संबंध ? काय तो माझा वरिष्ठ आहे कीं बाप आहे कीं आजोबा आहे ? मी सांगितलं तेवढ्यानं त्या म्हातारड्याचं समाधान कां होऊं नये ? नुसत्या दोन सह्या करायच्या, त्यासाठीं एवढा द्राविडी प्राणायाम कशाला ? म्हणे मी भास्कररावांकडे कागद पाठवायचे, नन्तर भास्कररावांनीं ह्यांना कळवायचं, त्यानन्तर ह्यांनीं भास्कररावांकडे जायचं–तो आहेच कीं नाहीं एक कायदेबाज–दहा वेळ वकिलीच्या परीक्षेला बसला तरी पास झाला नाहीं !–आणि ह्या दोघांनीं मिळून खलबतं करायचीं आणि शेवटीं सही केल्याशिवाय कागद माझ्याकडे परत यायचे ! त्यापेक्षां चुलींत का जाईनात ते पैसे ? मिळाले असते तर हिलाच उपयोगी पडले असते. मी कांहीं थैल्या उरावर घेऊन स्वर्गावर जाणार नव्हतों ! बरं, रक्कम तरी आहे तशी कांहीं दहा पांच लाखांची ?–तर तेंही नाहीं. एवढ्याशा गोष्टीसाठीं एवढे आडवेतिडवे उपद्व्याप करण्यापेक्षां सगळी रक्कम जहांन्नममध्यें गेली तरी मला त्याची पर्वा नाहीं ! कागदावर सही केली नाहीं ती नाहींच आणि पोरीला मात्र इथं ठेवून गेला ! सही करायची नव्हती तर हिलाही बरोबर घेऊन जायचं होतं ! कशाला ही धोण्ड आणून आमच्या उरावर घातली ? आतां हिचं पोट कोण भरणार ? कीं आतां हें घर बाजारांत विकून हिचं पोट भरूं, कीं हिलाच नेऊन बाजारांत विकूं ? ”

नानासाहेबांचा हा थयथयाट पाहून माझ्या अंगाचा संताप झाला. मला घेऊन येण्याबद्दल बाबांनीं कांहीं आग्रह केला नव्हता, किंवा मला पोसण्याबद्दल बाबांची तक्रारही नव्हती.

मनुष्यस्वभावाचा हा विलक्षण मासला पाहून मी आश्चर्यचकित झालें.

सकाळपासून नानासाहेबांचीं बाबांबरोबर जीं गोडगोड भाषणें चाललीं होतीं त्याचें कारण आतां माझ्या लक्षांत आलें. ती नुसती प्रस्तावना होती. आतां पुढल्या ग्रंथाला आरंभ झाला होता. एकदां मनांत आलें, कीं एक सणसणीत उत्तर देऊन टाकावें, पण पुन्हां विचार केला, कीं कांहीं दिवस येथें काढायचे आहेत त्याची सुरवात अशा कलागतीनें न व्हावी.

तो सारा दिवस नानासाहेब सारखे धुसफुसत होते. अगदीं ऐकूं नये अशा प्रकारांनीं बाबांवर लाखोली वहात होते.

त्या वेळीं वन्सं म्हणाल्या, " आतां नुसतं आरडून ओरडून काय होणार ? ह्या ठकांशीं गांठ पडली आहे, आपणही आतां ठकच बनलं पाहिजे. तुझ्या ओळखींचे इथं कोणी वकील असतील त्यांच्याकडे एकदां जा आणि ह्यांतून कांहीं मार्ग निघतो का पहा."

नानासाहेब म्हणाले, " वकिलाकडे जायला कशाला हवं ? आमचं हपीस म्हणजे पुण्यांतल्या साऱ्या वकिलांचा अड्डा आहे. मला ही शंका आलीच होती, म्हणून मी आधींच विचारून घेतलं होतं. त्या थेरड्याच्या सहीशिवाय कांहीं व्हायचं नाहीं. त्यानं सह्या दिल्या नाहींत तर रकमा तशाच पडून रहातील आणि आम्हांला एक फुटकी कवडीसुद्धां मिळणार नाहीं."

" पण त्यांना परभारें पैसे काढून घेतां नाहीं ना यायचे ? "

" ती भीति नको. त्यांच्या सहीशिवाय जसे आम्हांला मिळणार नाहींत तसे आमच्या सहीशिवाय त्यांनाही मिळणार नाहींत "

" बरं, अशी रक्कम तरी किती आहे ? "

" त्याची उठाठेव तुला कशाला ? रक्कम कितीही असली तरी ती आज आपल्याला मिळत नाहीं ना ? मग रिकाम्या पंचायती करण्यांत काय फायदा ? "

ह्या भाषणानें वन्संच्या तोंडाला कुलूप बसलें. नानासाहेबांचा मोर्चा मग माझ्याकडे वळला. त्यांनीं माझें सामान कुठें आहे म्हणून विचारलें, ट्रंकेची किल्ली माझ्याकडून मागून घेतली, ट्रंक उघडली आणि आंतील सर्व सामान काढून बाहेर अस्ताव्यस्त फेंकून दिल्यावर हातपाय आपटीत रागानें मला म्हणाले,

" दागिन्यांचा डबा कुठं आहे ? "

" मला माहीत नाहीं. "

माझ्या थोबाडींत एक भडकावून नानासाहेब म्हणाले, " माहीत नाहीं ह्याचा अर्थ काय ? आपले दागिने आपल्याबरोबर आणूं नयेत ? आतां तुझ्या बापानं ते दागिने विकून खाल्ले तर त्याचं जोखीम कुणावर ? चांगले दोन हजारांचे दागिने होते. बरी चंगळ झाली आहे म्हाताऱ्याची. "

त्या फटक्यासरशी मला तिरमिरी आली.

नानासाहेब सारखे ' दागिने बाहेर काढ ' म्हणून ओरडत होते. माझ्या तोंडून एक शब्दही येत नव्हता. माझ्या बखोटीला धरून त्यांनीं मला फरफटत ओढीत

माजघरांत नेलें आणि फडाफड थोबाडींत लगावित विचारायला सुरवात केली, " दागिने कुठं आहेत ? "

" मला कांहींच माहीत नाहीं—मग मी काय सांगूं ? "

नानासाहेबांनीं माझ्या कंबरेंत एक लाथ मारली.

मी खालीं पडलें आणि माझी शुद्ध नाहींशी झाली. सावध झालें आणि पहातें तों लिली माझ्या तोंडांत पाणी घालत होती. आजुबाजूला दुसरें कुणीच नव्हतें. नानासाहेब मात्र माझ्या आईबापांना सारखी शिव्यांची लाखोली वहात होते

मी डोळे उघडलेले पहातांच लिली म्हणाली, " काकू, सावध झालीस का ? "

मी कांहीं न बोलतां उठून बसलें. त्या पोरीनें माझ्या गळ्याभोंवतीं हात टाकला. आपल्या परकराच्या ओंच्यानें ती माझे डोळे पुसूं लागली. मी कांहींच बोलत नाहीं असें पाहून म्हणाली, " काकू, बाबा अगदीं दुष्ट आहेत—नाहीं ग ? "

मला एकदम भडभडून आलें. संकटाच्या काळांत माझ्या समाधानासाठीं कुणी ना कुणीतरी उभें रहातें, हें पाहून मला माझ्या दैवाचें कौतुक वाटलें.

त्या रात्रीं लीला माझ्याजवळच निजली. सकाळीं माझ्याच्यानें बिछान्यांतून उठवेना. मला सडकून ताप भरला होता आणि अंग फार ठणकत होतें.

लीलेनें आंत जाऊन मला ताप आल्याचें आपल्या आईला सांगितलें. तिनें तिचें सांगणें मनावर घेतलें नाहीं. नानासाहेब हपिसांत गेले होते. वन्सं माझ्या दाराशीं येऊन म्हणाल्या, " कण्हण्याकुंथण्याचं कितीही ढोंग केलंस तरी आम्हांला कांहीं खरं वाटायचं नाहीं. ऊठ, अंग धू आणि कामाला लाग."

मी तशीच थरथरत उठलें आणि अंग धुवून घरांत आलें. देवघरांत जाऊन सहाणखोड घेऊन गंध उगाळित बसणार इतक्यांत वन्संनीं धांवत येऊन माझ्या हातावर ताडकन् चापटी मारली.

" एवढी घोडी झालीस तरी अजून एवढंसुद्धां कळत नाहीं ? तुझ्या हातचं गंध देवाला कसं चालेल ? ह्या मेल्या कोंकणच्या माणसांना कांहीं रीतभातच नाहीं. माहेरीं देखील असंच करीत होतीस वाटतं. त्यांना चालतील असे भ्रष्टाकार, पण आमच्या इथं तसलं कांहीं खपायचं नाहीं. देव नाहीं, धर्म नाहीं, मेलीं माणसं आहेत कीं जनावरं आहेत ? म्हणे शास्त्रीबुवा ! लोकांना पुराण सांगतात आणि ह्यांच्या मुलींना अक्कल कोण शिकवणार ? शास्त्रीबुवांच्या पोरांनींच अशीं

थेरं मांडलीं तर आमच्यासारख्या गृहस्थांचीं मुलं काय करतील ? ऊठ तिथनं. नाहीं तर लाथच मारीन कंबरड्यांत."

मी तशीच तिरमिरत उठलें आणि कशीबशी देवघराच्या बाहेर आलें. लीलेनें तितक्यांत येऊन हात दिला नसता तर माझी काय स्थिती झाली असती कोण जाणे. मी तसाच तिचा हात धरून खोलींत गेलें आणि चटईवर आडवी पडलें.

बाहेर वन्संचा सारखा जळफळाट चालला होता.

"कामं करायला नकोत. नुसतं गिळायला हवं. लाजा कशा वाटत नाहींत मेल्यांना ? आम्हांला ताप कधीं आले नव्हते ? म्हणे ताप. कसला ताप ? कामं करावीं लागतात म्हणून नुसता संताप झालाय् झालं !"

लीला म्हणाली, "नाहीं हो आत्याबाई, तिला खरोखरच सडकून ताप भरला आहे."

लिलीच्या भापणानें वन्संचा राग अधिकच भडकला. त्या म्हणाल्या, "आतां ही आली तिचा कैवार घेऊन. गेल्या खेपेला ती एक होती म्हैस—आपल्या घरीं घेऊन गेली होती ! बापाचा गाढवपणा जगांत दाखवायला, कीं आपलं खोतीचं वैभव हिला दाखवायला ? त्याच बयेनं हिला भारून ठेवलं आहे. हिचा तो बापच पहा ना, सही करायला सांगितलं तर भास्कररावांचं नांव सांगतो. भास्कर-रावांचा आमचा काय संबंध ? ते असतील मोठे आपल्या घरचे खोत, पण आम्ही कुठं त्याचे तीन चव्वल लागतों आहोंत ? तिकडनंच शिकून आली आहे हीं सारीं थेरं. भद्रकपाळी मेली ! घरीं आली नाहीं तों एक वर्षाच्या आंतच नवऱ्याचं वाटोळं केलं. आतां आली आहे आमच्या मुळावर. खराच ताप येऊन मरून जाईल तर एक पीडा तरी टळेल."

वन्संच्या जिभेला कांहीं हाड नव्हतं. लिलीला माझी दया आली आणि ती वन्संना म्हणाली, "कांहीं बोलायचं असेल तर तें परसदारीं जाऊन बोला, इथं काकूंना त्रास देऊं नका."

लीलेच्या तोंडचे हे शब्द निघतांच वन्संचा भडका उडाला. त्या मारे थयथय नाचत हात वर करीत बडबडूं लागल्या—"तिनंच शिकवलंन वाटतं तुला असं बोलायला ? बाई, बाई, बाई, शर्थ झाली बाई अलिकडल्या ह्या पोरींची ! कांहीं वडिलधारं तरी ? छेः रामाचं नांव ! नुसते हणगोबा वाढले आहेत मेले ! मला म्हणते परसदारीं जा. ही—ही मला हुकूम करते ! अग, कोण समजली आहेस तूं

मला ? मी ह्या घरची मालकीण आहें. कांहीं फुकट नाहीं तुमच्या घरीं खात ! होतं नव्हतं तेवढं सासरचं गटलं आणून तुमच्या उरावर घातलं आहे—आणि मेल्यानों, मला हुकूम करतां ? तुझ्या बापाचासुद्धां हुकूम नाहीं मानायची मी."

ती आणखी काय काय बोलली तें लिहिणेंसुद्धां अशक्य आहे. ब्राह्मणांच्या बायकांच्या तोंडीं इतकी अभद्र भाषा असेल अशी मला कल्पनाही नव्हती. शिव्यागाळी देण्यांत तिनें कुणब्यांनाही लाजवलें.

हळुहळू ताप माझ्या मस्तकांत चढत होता. वन्संचें ओरडणें मला अगदीं दूरदूर गेल्यासारखें वाटलें. थोड्या वेळानें माझी शुद्ध नाहींशी झाली.

ज्या वेळीं मी शुद्धीवर आलें ती संध्याकाळची वेळ होती. माझ्या अंगांतून घामाच्या सारख्या धारा लागल्या होत्या. लीला जवळ बसून माझा घाम पुशित होती. दुसरें कुणीच माणूस जवळपास नव्हतें. मी खोल आवाजांत पाणी मागितलें. लीला दचकून माझ्याकडे वळली आणि म्हणाली, "काकू, आतां बरं वाटतं ना ? माझा जीव बाई अगदीं घाबरून गेला होता. आज तीन दिवस झाले, तुम्ही डोळे कांहीं उघडले नाहींत. आईला सांगितलं, बाबांना सांगितलं, आत्याबाईंना तर सांगायची सोयच नव्हती ! कुणी ढुंकून देखील तुमच्याकडे पाहीना ! मी आपली नुसती येऊन अंगाला हात लावून जात होतें. ताप आला तर काय उपचार करावे हें मला कुठं माहीत आहे ? शिवाय तुला विचारावं म्हटलं तर तूंही शुद्धीवर नाहींस—माझा जीव कसा घाबरून गेला होता."

मी म्हटलें, "माझा घसा कसा कोरडा पडला आहे. थोडं पाणी आण."

"पाणी आणूं कीं दूध आणूं ?"

"काय मिळेल तें आण, पण लवकर आण. जीव कसा कासावीस झाला आहे."

लीला निघून गेली आणि थोड्या वेळानें एका हातांत दुधाची वाटी घेऊन आली. मी चुळा भरून टाकल्या आणि लीलेनें तोंडाशीं धरलेलें दूध एका घोटासरशीं पिऊन गेलें. पुन्हां मला ग्लानी आली आणि मी बिछान्यावर पडलें, ती तशीच झोंपीं गेलें.

दुसऱ्या दिवशीं मला बरीच हुषारी वाटली. पोटांत भुकेनें कसा कल्लोळ केला होता. भिंतीला हात धरीत धरीत मी हळुहळू बाहेर गेलें. जाऊबाई परसदारीं होत्या, त्या मला म्हणाल्या, "तीन दिवस नुसत्या पडून राहिलांत—कांहीं वाटतं का मनाला ?

मी म्हटलं, "मला ताप आला होता. मुळीं शुद्धीच नव्हती. आतां सावध झालें ती ही बाहेर आलें. मला थोडीशी पेज करून देतां का?"

तशीच पुन्हां फरफटत मी खोलींत येऊन पडलें. एका घटकेनें लीला पेज घेऊन आली. ती पोटांत गेल्यावर मला पुष्कळशी हुषारी वाटली. दुसऱ्या दिवशीं मी साफ बरी झालें आणि अंग धुऊन घरकामाला लागलें. लीलेखेरीज माझ्याशीं कुणीच बोलत नसे. कुणाला कांहीं सांगायचें झालें तर तें लीलेच्या मार्फत सांगायचें.

अशा स्थितींत आणखी आठपंधरा दिवस गेले. त्या तसल्या जिण्याचा मला अगदीं वीट आला. मी लीलेकडे पैसे देऊन एक पोस्टाचें पाकीट आणवलें आणि कुणी नाहीं असें पाहून ताईला सर्व हकिकतीचें माझ्या मोडक्या तोडक्या भाषेंत एक पत्र लिहिलें.

चारसहा दिवसांनीं भास्करराव आले. माझी स्थिति पाहून त्यांना अगदीं गहिंवर आला. नानासाहेबांची त्यांनीं चांगलीच हजेरी घेतली. भास्कररावांच्या मागें नानासाहेब त्यांना कितीही शिव्या देत असले तरी तोंडासमोर एक वांकडा शब्द काढण्याची त्यांची छाती नव्हती. घरांत जाऊन त्यांनीं इकडे तिकडे बरीच आदळआपट केली, काकांचा राग मुलांवर काढला आणि कांहीं कारण नसतांना लीलेला उगीच सडकून चोप दिला.

दुसऱ्या दिवशीं मला घेऊन काका आपल्या गांवीं आले.

पहिल्या भेटीला ताईची स्थिति अगदीं चमत्कारिक झाली. मला पहातांच तिला रडण्याचा हुंदका येत होता, पण तो तसाच आवरून हंसतमुखानें तिनें हात धरून मला घरांत नेलें. मन मोकळें करून झालेल्या सर्व हकिकती बोलण्यांत एक दोन दिवस गेले. दोन दिवसांनीं मी ताईला मला माहेरीं पोहोंचवण्यास सांगितलें. ताई म्हणाली, "आतां हेंच तुझं माहेर. तुझ्या बाबांना पत्र लिहिलं आहे. तिकडली कांहीं हकीकत न कळवतां नुसतं इथं आणल्याचं कळवलं आहे."

तें ऐकून माझा जीव खालीं पडला. नानासाहेबांनीं बाबांना कांहींतरी भलतेंच लिहून कळवलें असेल आणि ते अगदीं घाबरून गेले असतील, अशी शंका माझ्या मनांत आली होती. तरीही अजून वाटे, कीं बाबांना पत्र न लिहितां मी ताईला लिहिलें ह्याबद्दल उद्यां ते मला दोष तर देणार नाहींत? ताईला मी तसें बोलून दाखवलेंही, तेव्हां ती म्हणाली, "तूं केलंस तें योग्यच केलंस. शास्त्रीबुवांना पत्र

लिहून कांहीं उपयोग झाला नसता. शास्त्रीबुवा मधें एकदां इथं आले होते. पुण्याला झालेली सर्व हकिकत इकडे सांगितली आणि त्या वेळीं त्यांनीं जे उद्गार काढले त्यावरून मला तर असं वाटतं, कीं तुला नेण्यासाठीं देखील ते पुण्याला गेले नसते. मला पत्र लिहिलंस तेंच बरं केलंस. नानासाहेबांना इकडचा फार वचक आहे. स्वतः जाणं झालं नसतं तर त्यांनीं तुला पाठवली सुद्धां नसती. "

चारसहा दिवसांनीं चन्दू आला. त्याच्या कॉलेजला सुट्टी पडली होती. मला पहातांच त्याचा चेहरा अगदीं गोरामोरा झाला. त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या.

ताईकडे पाहून तो म्हणाला, " काय हिची अशी स्थिति झाली ? "

ताईनें उत्तर दिलें, " तें एक रामायणच आहे. मग सांगेन तुला सावकाश. आतां दोनतीन महिने तूं इथं रहाणार आहेस, तितक्यांत हिला इंग्रजी शिकवायला सुरवात कर. संस्कृतची शिकवणी तिकडनं पत्करली आहे. अगदीं घडीभर सुद्धां हिला फुरसत द्यायची नाहीं. सारखा शिक्षणाचा रगाडा सुरू ठेवायचा—बरं का, चन्दूभाऊजी. "

चन्दू एकदम रागानें म्हलाला, " हें पहा वहिनी, तुला पुन्हां सांगतों, मला फिरून 'भाऊजी' म्हटलंस तर शेंडींत राख घालून गोसावी होऊन निघून जाईन."

" राख घालायला शेंडी तरी आहे का ? "

" तेवढ्यासाठीं प्रायश्चित्त घेऊन शेंडी ठेवीन. "

हंसत हंसत ताई म्हणाली, " आतां पूर्वीच्या सारखं वागून कसं चालेल ? आतां तुम्हीं मोठे झालांत, कॉलेजांत जाऊं लागलांत, उद्यां मोठमोठ्या परीक्षा द्याल, मुन्सफ व्हाल, मामलेदार व्हाल त्या वेळीं नुसतं चन्दू म्हणून कसं चालेल ? एव्हांपासून आपली मोठ्या नांवाची संवय करीत गेलेलं बरं. "

चन्दू गंभीरपणें म्हणाला, " मोठमोठ्या परीक्षा देईन, पासही होईन, पण वहिनी, तुला एक गोष्ट खात्रीनं सांगतों, कीं मी केव्हांही मुन्सफ किंवा मामलेदार होणार नाहीं. "

त्याला खिजवण्यासाठीं ताई म्हणाली, " मग वकील होशील ! लवकर श्रीमंत व्हायला वकिलीसारखं साधन नाहीं. "

चन्दू मुद्रेवरचा गंभीरपणा कायम ठेवून म्हणाला, " मी वकीलही होणार नाहीं. मी कोण होणार तें मी माझ्या मनाशीं ठरवलं आहे आणि त्याच मार्गाचा अवलंब मी करणार आहें. "

" भलतंच कांहीं मनांत आणलं असलंस तर त्याला तिकडची संमति मिळाली पाहिजे, हें ध्यानांत ठेव. "

इतक्यांत काका स्वतःच तिथें आले. ते म्हणाले, " कांहीं नाहीं बरं भाल्, तुला जें योग्य वाटेल तें तूं कर. तुझ्या मार्गांत मी केव्हांही अडथळा आणणार नाहीं. माझ्याच मर्जीप्रमाणें तूं वागलं पाहिजेस अशी मी केव्हांही सक्ति करणार नाहीं. तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास आहे आणि तूं अविचारानं कोणतीही गोष्ट करणार नाहींस अशी माझी खात्री आहे. "

ताई म्हणाली, " शेवटीं मलाच चांगली थप्पड बसली म्हणायची. "

काका हंसत हंसत निघून गेले. चन्दू मात्र तसाच उभा होता. ताई त्याच्या चेहऱ्याकडे सारखी रोखून पहात होती. अगदीं आपल्या स्वतःशींच बोलल्यागत चन्दू म्हणाला, " असा भाऊ मिळायला भाग्य हवं ! "

ताई म्हणाली, " खरं आहे. हल्लींच्या काळी तरी तें दुर्मिळ आहे चन्दू. तुझ्यावर त्यांनीं विश्वास ठेवला आहे, त्या विश्वासाचा अविश्वास करूं नकोस. "

त्या दिवसापासून माझ्या इंग्रजी शिक्षणाला प्रारंभ झाला. रात्रीं काका संस्कृत शिकवीत असत. चन्दूची शिकवण्याची हातोटी मोठी विलक्षण होती. तीन महिन्यांत हॉवर्डचें पहिलें आणि दुसरें पुस्तक संपवून सेकण्ड बुक सेकण्ड पार्टला सुरवातही झाली. त्याच वेळीं चन्दूला मुंबईला जावें लागलें.

मीही थोड्या दिवसांनीं माहेरीं गेलें. माहेरीं गेल्यावरही माझा संस्कृतचा अभ्यास सुरू होताच. इंग्रजी शिक्षणाची तिकडे कांहीं सोय नसल्यामुळें झालेल्या धड्यांची मी पुन्हां पुन्हां उजळणी करीत असें. भाषांतरपाठमालेंतील धडे आपल्या समजाप्रमाणें सोडवावे, ते लिहून दर आठवड्याला काकांकडे लिहून पाठवावे आणि काकांनीं ते दुरुस्त करून पाठवावे, असा क्रम सुरू होता. केवळ शिक्षणाच्या ठिकाणीं मन एकाग्र केल्यामुळें मला माझ्या परिस्थितीची आठवणही झाली नाहीं. शेजाऱ्यापाजाऱ्यांकडे मी शक्य तेवढें करून जात नसें, त्यामुळें तीं मला तुसडी म्हणत असत. त्यांनीं ठेवलेल्या नांवांचा माझ्यावर कांहींच परिणाम होत नसे.

## प्रकरण नववें तोच शब्द !

आजच्या काळाकडे पाहिलें तर मुलीला शिक्षण देणें म्हणजे फारसें महत्त्वाचें वाटत नाहीं. मुलाच्या शिक्षणाइतकेंच मुलीचें शिक्षण आज स्वाभाविक होऊन बसलें आहे. पण तो काळ तसा नव्हता. एकादी मुलगी नुसतें मराठी पुस्तक हातांत घेऊन बसली तरी त्याचा केवढा अट्टाहास केला जात असे! मग इंग्रजी शिकणें तर दूरच राहिलें. मुलीनें शाळेंत जाणें म्हणजे त्या वेळीं एक भयंकर पाप समजलें जात असे.

अशा परिस्थितींत माझें शिक्षण चाललें होतें. वर्षांतले माझे बरेच दिवस ताईच्याच घरीं जात असत. माहेरीं जाणें बहुतेक क्वचितच असे. संवयीसंवयीनें मला ताईच्या घरीं विशेष आपुलकी वाटूं लागली होती आणि खऱ्या माहेराबद्दल तितकाच परकेपणा वाढत चालला होता.

—म्हणजे माझें आईबद्दल प्रेम कमी झालें होतें असें मुळींच नाहीं. बाबा जरी माझ्याविषयीं उदासीनच असत, तरी मला संस्कृत शिकवण्याचें वचन त्यांनीं मुळींच सोडलें नाहीं. दोनतीन वर्षांत माझी संस्कृतची तयारी चांगलीच झाली होती आणि भागवतासारख्या ग्रंथांतील श्लोकांचें भाषांतरही मी सहज करूं शकत असें. माझ्यावर आभाळ कोसळल्यापासून आईची वृत्ति मात्र पूर्वीच्यासारखी राहिली नव्हती. ती जरी अगदींच भ्रमिष्ट झाली नव्हती, तरी तिच्या मेन्दूवर कांहीं तरी विलक्षण आघात झाला आहे हें थोड्याशा सहवासांत कुणाही पूर्वपरिचिताच्या सहज लक्षांत येत असे.

त्या वेळीं मी माहेरीं आलें होतें. मी ज्या दिवशीं माहेरीं आलें त्याच दिवशीं बनीला मुलगा झाल्याची हकिकत मला कळली. मी बनीला भेटायला मुद्दाम तिच्या घरीं गेलें. बनीला बाळंतीण होऊन वीस एकविसावा दिवस होता. मी जातांच तिनें आपलें मूल पुढें केलें. मी अगदीं हलक्या हातांनीं मुलाला मांडीवर घेतलें. मुलाला स्पर्श करतांच माझ्या मनांत विचारांच्या विलक्षण लहरी उठूं लागल्या. मूल जरी अगदीं गुटगुटीत नव्हतें तरी त्याचा चेहरा मोठा मोहक असून हंसरा होता. त्या मुलाच्या स्पर्शानें माझ्या हृदयांत अगदीं अननुभूत अशी भावना उत्पन्न झाली. ती बाळंतणीची खोली, तो पाळणा, त्या शेगड्या, तो ओव्याचा वास,

काजळानें भरलेला तो बनीचा चेहरा, ह्या सर्व उपकरणांचा माझ्या मनावर अगदीं चमत्कारिक परिणाम होऊं लागला. हृदयांत धडकी भरल्यासारखें झालें. हात थरथर कांपूं लागले. बनी म्हणाली, "इकडे दे त्याला. पाडशीलबिडशील कदाचित्." बनीच्या ह्या उद्गारांत अशी कांहीं सोज्वळ मोहकता आली होती, कीं मला तिचा मत्सर वाटला. मी मूल परत दिलें, पण मला त्याला पुन्हां घ्यावेंसें वाटूं लागलें. मी बनीला म्हटलें, "जरा–जरा पुन्हां दे पाहूं! दे, आतां नाहीं हात कांपायचा. पहिल्यानं मला उगीच भीति वाटली." बनीनें मूल माझ्याकडे परत दिलें. ती गालांतल्या गालांत खुदकन् हंसली. त्या हंसण्यांत पोरकटपणा नव्हता. ती पूर्वींची चिटवळ बनी आतां राहिली नव्हती. तिच्या चेहऱ्यावर विलक्षण गंभीरपणा आला होता. मातृत्वाची जाणीव तिच्या हृदयांत उत्पन्न झाली होती का? मी तिला अगदीं पोरकट वाटलें का? मी मुलाला घेऊन सारखी त्याच्याकडे पहात राहिलें. माझ्या डोळ्यांची तृप्ति होईना. मूल साऱ्या डोळ्यांत सांठवून घेऊं कीं काय असें वाटूं लागलें. त्याला जवळ घ्यावें, अगदीं हृदयाशीं कवटाळावें–आणखी काय?

इतक्यांत मूल रडूं लागलें. बनी म्हणाली, "इकडे आण त्याला. पाजायची वेळ झाली." मी मूल बनीच्या मांडीवर दिलें आणि तिनें त्याला पदराखालीं घेतलें.

मी घरीं जायला निघालें त्या वेळीं बनी म्हणाली, "अजून मला महिना झाला नाहीं. घरीं जातांच लुगडं बदलायची आठवण आहे ना?–कीं तीही विसरली आहेस इंग्रजी शिकतांना?"

मी हंसत हंसत म्हटलें, "मुळीं माहीतच नव्हती ती गोष्ट विसरणार कुठनं? साऱ्या जन्मांत बाळंतिणीच्या खोलींत ही मी पहिल्यांदाच आलें आहें."

बनी एक दीर्घ निश्वास सोडून म्हणाली, "होय, खरंच तें!"

मी घरीं परत आलें पण माझें चित्त ठिकाणावर नव्हतें.

आईनें विचारलें, "कुठं गेली होतीस?"

मी बनीच्या मुलाला पहायला गेल्याचें सांगितलें. आई जरी कांहीं बोलली नाहीं तरी तिला माझें हें जाणें आवडलें नाहीं असें तिच्या मुद्रेवरून वाटलें. त्या रात्रीं रामायणांतील कांहीं श्लोक बाबा मला समजावून देत होते. माझ्या दुर्दैवानें ती रामजन्माचीच कथा होती. त्या कथेच्या वाचनानें माझ्या हृदयांत पुन्हां दुपारची आठवण जागी झाली. पुन्हां तें मूल माझ्या नजरेसमोर दिसूं लागलें.

कौसल्येनें रामाला कसें मांडीवर घेतलें असेल, वार्धक्यांत झालेल्या त्या मुलाचें दशरथानें कसें कौतुक केलें असेल, ह्याचीं जिवन्त चित्रें माझ्या नजरेसमोर उभीं राहून मला कासावीस करूं लागलीं.

घडा संपला आणि मी बिछान्यावर जाऊन पडलें पण माझा डोळ्याला डोळा लागेना. लहानसहान बागडणारीं असंख्य मुलें माझ्या सभोंवर गोळा होऊन घिरट्या घालीत आहेत असा मला भास होऊं लागला. तीं मुलें गुटगुटीत होतीं, अगदीं बाळसेदार होतीं, अगदीं हंसतमुख होतीं, त्यांना पंख नव्हते तरीही तीं मुलें वर भराऱ्या मारून माझ्या मस्तकावर भिरभिरत होतीं. त्यांतील एका मुलानें येऊन हळूच माझ्या गालाला हात लावला आणि म्हटलें, ‘ आई ! ’

माझ्या हृदयाला थरकांप सुटला आणि मी खडबडून जागी झालें. मस्तक सारखें भणभणूं लागलें. जीव अगदीं कासावीस होऊं लागला. श्वासोच्छ्वास कोंडल्यासारखें वाटूं लागलें. काय होतें तें माझें मलाच समजेना !

त्यानंतर पहांटेपर्यंत मला मुळींच झोंप आली नाहीं. मस्तकांत सारख्या विचारांच्या लहरी सुरू होत्या. त्या विचारांचा इथें उच्चारही करवत नाहीं. मातृत्वाच्या जाणिवेला मी कायमचीं आंचवलें ह्या जागृतीनें माझ्या हृदयाला धक्का बसला होता. ही कुणाची चूक ? बाबांची ? आईची ? कोणत्या पापामुळें ह्या आत्यंतिक सुखाला आंचवलें ? कोणत्या पापानें हा गहजब माझ्याबर कोसळला ? कुणाच्या पापाचें हें प्रायश्चित्त मी भोगतें आहें ? हें अलौकिक सौख्य मला कायमचें पारखें झालें का ?— कीं अजूनही ह्याला कांहीं उपाय आहे ?

पुन्हां मनांत आलें, ह्याला उपाय आहे ! तो एक शब्द मला पुन्हां आठवला. मी ताईच्या घरीं पहिल्यानेंच गेलें होतें त्या वेळीं तो शब्द मी ऐकला होता. त्या शब्दाचा अर्थ विचारतांना सगळीकडून माझी फटफजिती झाली होती. मनांतल्या मनांत सुद्धां तो शब्द उच्चारण्याची मला लाज वाटली. जळजळीत अक्षरांनीं तो शब्द चोहोंकडे लिहिलेला माझ्या नजरेसमोर दिसूं लागला. कालाच्या उदरांत गडप झालेला तो शब्द बाहेर येऊन मला भेवडावूं लागला.

मी बिछान्यांत सारखी तळमळत होतें त्यामुळें आई जागी झाली आणि मला म्हणाली, “ मथे, झोंप नाहीं का येत ? ”

मी खोल आवाजानें म्हटलें, “ नाहीं. काय झालं आहे कोण जाणे ! ”

" कशाला गेलीस आज बनीच्या घरीं ? मला आधीं कळतं तर मी तुला जाऊं दिलं नसतं ! "

एकूण आईला देखील हा अंदाज आला ना ? कसा आला ? माझ्या अंतःकरणांत तिला कसें शिरतां आलें ! मी उघड बोललेंसुद्धां नाहीं, बनीच्या बाळाचें वर्णनही केलें नाहीं, तिथली हकिकतही बोललें नाहीं आणि माझ्या मनाची स्थिति मुळींच बोलून दाखवली नाहीं, असें असतां हें आईला कसें कळलें ? मातृहृदय म्हणतात तें हेंच काय ? अपत्याच्या आणि आईच्या हृदयांत कुठेंतरी धागादोरा जोडलेला असतो का ? अपत्त्याच्या हृदयांतले विचार अगदीं सहजासहजीं आईला कळतात का ? आईपासून कांहींच का चोरून ठेवतां येत नाहीं ? मग तो शब्द आईला कळला असेल का ?

आई म्हणाली, " आतां कसलाच कांहीं विचार करूं नकोस. डोळे मिटून स्वस्थ नीज पाहूं. "

आई आपल्या बिछान्यावरून उठून माझ्या शेजारीं येऊन पडली आणि हळूहळू माझें मस्तक थोपटूं लागली. मी अगदीं लहान मूल आहें असेंच आईला वाटलें का ? अगदीं लहानपणीं मला झोंप यावी म्हणून ती जशी थोपटीत असे तसेंच हें आतांचें थोपटणें होतें. तिच्या त्या थोपटण्यानें हळूहळू मला माझ्या वयाची विस्मृति होऊं लागली. मी आईच्या कुशींत शिरलें आणि तिनेंही मला घट्ट कवटाळून जवळ घेतलें. मला वाटलें, मी अगदीं लहान झालें. आईच्या हृदयाच्या स्पर्शानें मला प्रौढपणाची विस्मृति झाली आणि त्या थोपटण्याच्या नादांत मी तशीच झोंपीं गेलें.

दुसऱ्या दिवशीं जागृतिबरोबरच साऱ्या बऱ्यावाईट आठवणीही जाग्या झाल्या. मी घरांतलें कामकाज करीत होतें पण बनीचें बाळ प्रत्येक ठिकाणीं माझ्या नजरेसमोर दिसत होतें. त्या एवढ्याशा चिमुकल्या बाळानें माझी अगदीं पाठ पुरवली होती. मला अन्नपाणीही गोड लागेना.

माझी ही स्थिति आईच्या ध्यानांत आली आणि ती मला म्हणाली, " आज तुला असं झालं तरी काय ? "

मी सुस्कारा सोडून आईला म्हटलें, " आई, ह्याला कांहींच का उपाय नाहीं ? "

आईनें आश्चर्यचकित होऊन विचारलें " कशाला ? "

ी रडव्या तोंडानें आईला विचारलें, "आई, रात्रीं सर्व कांहीं तुला कळत आणि आतां कसं कळत नाहीं ?"

आई स्तब्ध झाली आणि क्षणभर दगडासारखी निश्चल राहून म्हणाली, "नाहीं, ग कांहीं उपाय नाहीं—आणि म्हणूनच मी अशी रडतें आहें. अविचारानं आम्हीं गळा कापला. आतां हा कापलेला गळा सांधता यायचा नाहीं. ब्राह्मणाच्या चं जिणं—हें विधवेचं लाजिरवाणं आयुष्य—असंच केरपोतेऱ्यावारीं फुकट ार !—त्याला कांहीं उपाय नाहीं. दुसऱ्याची सेवा करायची, दुसऱ्याचा संसार चा आणि दुसऱ्याच्या सुखानं सुखी व्हायचं, ह्याखेरीज ब्राह्मणाच्या विधवेला ा मार्ग नाहीं." असें म्हणून आई स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. आई रडते न आपणही रडावें असें माझ्या मनांत आलें—पण हुंदकाच येईना !

इतक्यांत हातांत पत्र घेऊन बाबा तिथें आले आणि म्हणाले, "पुण्याहून साहेबांचें पत्र आलें आहे आणि मथूला आजच्या आज घेऊन येण्याबद्दल ीं निकडीनं लिहिलं आहे. त्यांची बायको बाळंतीण झाली आहे आणि मथूची वेळीं तिथं फार जरूरी आहे." आई कांहींच बोलत नाहीं असें पाहून बाबा म्हणाले, "आज तीन वर्षे झालीं, मथूला आम्हीं सासरीं पाठवली नाहीं. ंही बोलावणं आलं नव्हतं. अशा स्थितींत मुलीस माहेरीं ठेवल्याबद्दल लोक रीनं नांवं ठेवतात. तरी ती बहुतेक ताईकडेच असते म्हणून बरं आहे ! ं थोडे दिवस इथं राहिलेली देखील लोकांच्यानं पहावत नाहीं. मग तुझं काय म्हणणं ?"

आई म्हणाली, "जो इकडला विचार तोच माझा निश्चय."

"आतां त्यांची ती बहीण वारली आहे. घरीं दुसरं माणूस नाहीं. अशा वेळीं ला न पाठवणं योग्य होणार नाहीं."

'मग पाठवावी तर. पण दागिन्यांचं काय करणार ? मागल्या खेपेला ान्यांमुळं तिला किती त्रास झाला त्याची आठवण आहे ना ? एकदां वाटतं, ा लाखांचा जीव गेला तिथं दागिन्यांची काय कथा ? पण पुन्हां वाटतं, कीं ाने एकदां का त्या कसाबाच्या हातीं गेले म्हणजे पुन्हां दृष्टीलासुद्धां पडणार त. तें तिचं स्त्रीधन आहे. तिची त्यांच्यावर सत्ता आहे. दागिन्यांशिवाय वली तर मला वाटतं, जातांना काकांच्या गांवाकडून जावं, दागिनेही बरोबर े आणि ते सांगतील तसं करावं."

बाबांना हा सल्ला अगदीं पसन्त पडला.

दुसरे दिवशीं बाबा मला घेऊन काकांच्या गांवीं आले. काका, ताई आणि बाबा ह्यांनीं बसून दागिन्यांबद्दल मोकळपणीं चर्चा केली. दागिने पाठवून द्यायला ताई संमति देईना. काका म्हणाले, " दीडदोन हजारांच्या दागिन्यांची काय पर्वा? मरूं दे त्याला एकदां दागिने घेऊन. तेवढ्यासाठींच पोरीच्या जिवाला त्रास नको. दागिने मिळाल्याशिवाय तो राक्षस तिला घडीभरही सुख लागूं देणार नाहीं."

ताई म्हणाली, "तें खरं आहे, पण हा आम्हां बायकांच्या हक्काचा प्रश्न आहे. हजार दोन हजारांच्या दागिन्यांनीं कांहीं जन्माची बेगमी होत नाहीं हें मलाही पटतं. माझ्या जिवांत जीव असेपर्यंत मी हिला अन्तर देणार नाहीं. बेहत्तर आहे त्यांनीं तिला घरांतून घालवून दिली तर! जन्मभर तिचा प्रतिपाळ करण्यासाठीं मी कुणाची सुद्धां चाड बाळगणार नाहीं. ती माझी आहे आणि मी तिची आहें. मी असेन तिथं तिला आसरा मिळालाच पाहिजे."

"तेंही खरं आहे. शिवाय मी तिला अन्तर देईन का? पण जिथलं माणूस तिथंच असलेलं बरं."

" आतां कुठं आहे 'तिथं'? आतां 'तिथं' चा कांहींच संबंध राहिला नाहीं. बाबांनीं तरी नानांशीं उभ्या आयुष्यांत कुठं संबंध ठेवला होता? तसंच आतां. जें कांहीं त्यांना करायचं असेल तें खुशाल करूं देत. माझं तर असं म्हणणं आहे कीं मथूला मुळीं पुण्याला पाठवूंच नये."

बाबा म्हणाले, " तसं कसं होईल? वेळप्रसंग सर्वांनाच आहे. त्यांच्या घरीं दुसरं कुणी माणूस नाहीं. आचारीपाणकी ठेवायची त्यांची ताकद नाहीं. अशा वेळीं मथूला तिकडे पाठवली नाहीं तर देवाच्या घरीं मी गुन्हेगार ठरेन."

ताई म्हणाली, " आणि अशा वेळीं जर तुम्ही मथूला तिकडे पाठवलीत तर तो चांडाळ तिचे वाभाडे काढल्याशिवाय रहाणार नाहीं. एकदां प्रत्ययच पहायचा असल्यास खुशाल पहा—पण दागिने मी तुमच्याबरोबर देणार नाहीं." असें म्हणून ताई घरांत निघून गेली.

बाबा काकांना उद्देशून म्हणाले, " आतां सर्व भार तुमच्यावर टाकला आहे, तुम्ही जें काय योग्य वाटेल तें करा. मी कोणत्याच गोष्टीला हरकत घेणार नाहीं. दागिने त्यांचे त्यांना द्यायचे असले तरीही त्याला माझी हरकत नाहीं."

" एका अर्थी तिचं म्हणणं मला खरं वाटतं. दागिन्यांची कांहीं मोठीशी किंमत नाहीं हें जरी खरं असलं, तरी पुढें पॉलिसीचा प्रश्न येणार. म्हातारी मेल्याचं दुःख नाहीं पण काळ सोकावतो. तुम्ही आम्ही सारे हिच्या आयुष्याला थोडेच पुरून उरणार आहोंत ? कांहीं तरी तिची स्वतंत्र व्यवस्था पाहिजेच. आहे काय तें एक घर आहे. शेतवाडी जमीनजुमला कांहीं नाहीं. नुसतं घर घेऊन काय चाटायचं आहे ? ते तेवढे बँकेंतले रुपये, पॉलिसी आणि दागिने, एवढाच काय तो हिला आधार आहे. एवढ्याच्या जोरावर सारं आयुष्य कंठायचं. पण हेंच जर मुळीं हातचं गेलं तर हिचे हाल पुढं कुत्रा खाणार नाहीं. त्या मांगाच्या घरीं जन्मभर राबत हिला मरावं लागेल. तेव्हां शास्त्रीबुवा, तुम्ही असं करा, तुम्हीं गांवीं जा, मी मथूला घेऊन पुण्याला जातों. कांहीं तरी कारण काढून तिथं कांहीं दिवस रहातों आणि नानाला थोडीशी हुलकावणी दाखवून परत येतों. तोंपर्यंत तुम्हीं त्यांच्याशीं कोणत्याही प्रकारचा पत्रव्यवहार करूं नका. नुसत्या खुशालीपेक्षां अधिक कांहीं लिहायचं नाहीं. त्यानं कांहीं लिहिलं तर त्याला कांहीं उत्तर द्यायचं नाहीं असा अगदीं पक्का निर्धार करून ठेवा. हीं कायद्याचीं त्रांगडीं मोठीं बिकट असतात. पत्र लिहिण्यांत कुठं कांहीं जरी गुंतून गेलांत तर पुढं फार जड जाईल."

दुसऱ्या दिवशीं बाबा आपल्या गांवीं गेले. काकांची योजना ताईलाही पटल्यामुळें काका व मी पुण्याला निघून गेलों.

माझ्याबरोबर काका आलेले पाहतांच नानासाहेब आश्चर्यचकित झाले. मनांतला जळफळाट तसाच दाबून हंसण्याचा खोटा आव आणून ते म्हणाले, " वाः भास्करराव, वहिनीला घेऊन तुम्ही याल ही मला कल्पनाही नव्हती. तसं कळलं असतं तर गोदूबाईलाही घेऊन यायला सांगितलं असतं. बाकी त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं म्हणा, तुमचं घर म्हणजे हल्लीं वहिनीचं माहेरच झालं आहे."

नानासाहेब पुढें लघळपणानें म्हणाले, " आतां आलांतच आहांत, तसे चार दिवस राहून जा. आक्का गेल्यापासून घर कसं खायला येतं. गोदू आली असती तर बरं झालं असतं. ह्या वेळीं घरांत कुणी तरी वडील माणूस पाहिजेच होतं. लीलेच्या लग्नाच्याही मी हल्लीं खटपटींत आहें. ह्या वर्षी तरी तिचं लग्न ठेवतां येत नाहीं. तुम्ही इथं असलांत म्हणजे चार स्थळं निवडणं सोपं जाईल. तेवढा माझा भार हलका होईल."

" चार दिवस कां, मी चांगला दोन महिने इथं राहाणार आहें. अवधी बराच आहे. लग्नाचंही कांहीं जुळतं का पाहूं. बाकी माझ्या मतें अजून कांहीं तिचं लग्नाचं वय झालं नाहीं."

नानासाहेब आश्चर्यचकित होऊन म्हणाले, " अजून लग्नाचं वय झालं नाहीं? म्हणजे, तिचं वय काय आहे असा तुमचा समज आहे ?"

" सोळा वर्षं तर खास नव्हे."

नानासाहेब हंसत म्हणाले, " आले तुमचे हे आगरकरी विचार. आमच्या इथं असलं हें मुळींच खपायचं नाहीं. आम्हीं अगदीं टिळकांचे अनुयायी आहोंत."

"टिळकांचे अनुयायी आहांत म्हणूनच म्हणतों, कीं अजून तुमच्या लिलीच्या लग्नाचं वय झालं नाहीं. टिळक भलत्या रूढींना चिकटून रहाणारे आहेत असा तुमचा समज असेल तर तो साफ चुकीचा आहे."

" तें तुमच्यापेक्षां मला जास्त कळतं. आम्हीं सदोदित त्यांच्या सहवासांत रहाणारीं माणसं, त्यांचे आणखी आमचे विचार अगदीं एकजीव झालेले, त्यांच्या हातून निघालेली प्रत्येक ओळ आम्हींच जगाला देत असतों."

" गाईच्या आचळाजवळ देखील गोचिड पुष्कळ असतात !"

ह्या वाक्यानें नानासाहेबांना राग आल्यासारखा दिसला, पण तो गिळून ते म्हणाले, " भास्करराव, तुम्हींच हें बोललांत म्हणून सहन करून घेतों. दुसरा कुणी बोलला असता तर त्याला केसरीच्या भाषेंत उत्तर दिलं असतं. पण जाऊं द्या. उगीच वादविवाद कशाला ? लीलेच्या लग्नाचा भार कांहीं तुमच्यावर नाहीं. तें जोखीम आहे माझं. माझं मी पाहून घेईन. तुम्हीं फक्त मुलगा पसंत करण्याची कामगिरी पत्करा म्हणजे झालं."

" जी गोष्ट मला पसंत नाहीं ती दुसऱ्याला बरं वाटावं म्हणून देखील मी कधीं करणार नाहीं. बाकी दोन महिने मला इथं राहिलंच पाहिजे. कोर्टांत माझं कांहीं महत्त्वाचं काम आहे त्याला सहज इतका वेळ लागेल. बरं, लीलेला शाळेंत घातली आहे का ?"

नानासाहेब त्रासिकपणानें म्हणाले, " हो, जाते आहे शाळेंत. आतां शाळेंतच गेली आहे. खरं म्हणाल तर मी तिला शाळेंत पाठवणार नव्हतों, पण गोदीनंच हें वेड तिच्या डोक्यांत भरवून दिलं. इतर मुलं शाळेंत जातांना रडतात, पण ही

पोरटी शाळेंत जाण्यासाठींच हट्ट धरून बसूं लागली. अगदीं त्रासच देऊं लागली तेव्हां शाळेंत पाठवूं लागलों."

त्यानंतर ह्या विषयासंबंधीं विशेष कांहीं बोलणें झालें नाहीं.

मी आलें तेव्हां जाऊबाईंना बाळंतीण होऊन चार दिवस झाले होते. मुलगा अगदीं नक्षत्रासारखा होता. त्याला घेऊन मी घटकाघटका वेड्यासारखी बसत असें. त्याचें न्हाणेंधुणें मीच करीत असें. सुईणीलाही हात लावूं दिला नाहीं. माझी मुलाविषयींची ही कळकळ पाहून जाऊबाईंनांही बरें वाटे.

हां हां म्हणतां एक महिना निघून गेला. जाऊबाई विहिराला शिवून घरांत आल्या तरीही घरचें सर्व कामकाज मीच करीत असें. घरांत काका असल्यामुळें नानासाहेबांच्या तोंडाला बराच आळा बसला होता. दागिन्यांविषयीं त्यांनीं स्वतः असें मला कांहींच विचारलें नाहीं. एके दिवशीं जाऊबाई मात्र म्हणाल्या, "तुझे दागिने कुठं आहेत ? बरोबर आणले आहेस कीं माहेरींच ठेवले आहेस ?"

मी खरी हकीकत सांगितली त्या वेळीं जाऊबाई म्हणाल्या, "काकांना तरी ह्या नसत्या पंचायती कुणी सांगितल्या होत्या ? तुझ्या बाबांनीं दागिने बरोबर घेतले आणि काकांनीं ते आपल्याकडे ठेवून घेतले—ह्याचा अर्थ काय ? समज, उद्यां काकांनीं ते दागिने खाल्ले तर तूं काय करशील !"

"काका असं करतील असं मला वाटत नाहीं. देवानं त्यांना मुबलक पैसा दिला आहे. विधवेच्या दागिन्यांचा ते कशाला अपहार करतील ?—आणि समजा, त्यांतून त्यांनीं खाल्लेच, तर मला काय त्याचं ? मला थोडेच अंगांवर घालायचे आहेत ते आतां ? कुठं तरी जायचे ते तिथं जातील."

जाऊबाई कपाळाला आंठ्या घालून म्हणाल्या, "म्हणजे ? आम्ही तुझे दागिने खाणार आहोंत असं तुझं म्हणणं आहे कीं काय ?"

"मी कशाला असं म्हणूं ? पण गेल्या खेपेची हकीकत मी कांहीं अजून विसरलें नाहीं."

तो विषय तेवढाच राहिला. पुन्हां दागिन्यांसंबंधीं कुठेंच कांहीं बोलणें निघालें नाहीं.

दुसऱ्या दिवशीं काकांनीं एका नवीनच विषयाचा उपक्रम केला. नानासाहेब हपिसांतील गप्पा सांगण्याच्या मोठ्या खुषींत आले होते. काकाही त्यांना मधून

मधून खुलवित होते. बोलतां बोलतां काका मध्येंच एकदम म्हणाले, " मथूला इथल्या इंग्रजी शाळेंत घालावी अशी माझी इच्छा आहे. मी तिचीं तीन बुकं करून घेतलीं आहेत, इथं सहज चौथींत बसवतां येईल. तिचा संस्कृतचा अभ्यास कॉलेजला पुरेल इतका झाला आहे. इतिहास, भूगोल, गणित हे विषयही मी भरपूर करून घेतले आहेत, त्याचा पुढंही फायदा मिळण्याचा संभव आहे. तुमचं कसं काय मत आहे ? "

ही ही करीत हंसत नानासाहेब म्हणाले, " म्हणजे ! आमच्या वहिनी एक पंडिता रमाबाईच आहेत असं म्हणा ना ! फक्त बाटायचं तेवढं शिल्लक राहिलं आहे. तेवढ्या बाटल्या कीं झालाच कुळाचा उद्धार ! "

काकाही ही ही करीत हंसत म्हणाले, " आधीं तुमच्या कुळांत बाटल्यानंच तिचा उद्धार झाला आहे. आणखी नवा उद्धार तो काय व्हायचा ? " जरा गंभीर होऊन काका पुढें म्हणाले, " नानासाहेब, आमच्या हिंदु मुली म्हणजे तुम्हीं काय समजतां ? नुसतं रमाबाईचं नांव कशाला घेतां ? तुम्हीं पुणेंकरांनीं छळलं नसतं तर रमाबाई खिस्ती कशाला झाली असती ? आनंदीबाई जोशीचीच हकीकत घ्या, अमेरिकेला जाऊन एम्. डी. होऊन आली पण नुसता पोषाख सुद्धां तिनं बदलला नाहीं. विलायती कपड्यांची तिनं एक चिंधीही वापरली नाहीं, मग अभक्षभक्षणाची गोष्ट दूरच ! अमेरिकेच्या लोकांना तिनं हिंदू केलं. तिथल्या बायकांना लुगडीं नेसवलीं, कुंकू लावलं. हिंदूंच्या कुंकवाचा टिळा पाताळच्या अमेरिकन बायांच्या मस्तकीं पहिल्यानेंच लावणाऱ्या त्या साध्वीचं चरित्र आठवलं म्हणजे आमच्या हिंदू मुलींच्या चारित्र्याबद्दल अभिमान वाटूं लागतो. ज्या प्रान्तांत जाऊन राजवाड्यासारखे पुरुषही चेकाळले तिथं एक अटरा वर्षांची मुलगी मिशनरीशीं टक्कर देऊन चार वर्षं राहून परकीयांना हिंदू करून आली. काय करूं, ईश्वरानं मला तेवढं सामर्थ्य दिलं असतं, तेवढी सत्ता दिली असती तर मथूला मी खास अमेरिकेला पाठवली असती. "

नानासाहेब आंबट तोंड करून म्हणाले, " खरं आहे. आमच्या आर्यस्त्रियांचं चारित्र्य तसंच उज्वल आहे. सीता पहा, सावित्री पहा, दमयन्ती पहा..."

" थांबा, दमयन्तीचं नांव घेऊं नका—ती पुनर्विवाहाला तयार झाली होती ! "

पुन्हां तोच शब्द ! माझ्या काळजांत धस्स झालें.

" त्या गोष्टी प्रक्षिप्त आहेत. काशिनाथशास्त्री लेल्यांना विचारा. पांगारकरांना विचारा. ते तुमची खात्री करून देतील."

" पुराणकालाशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. मी वर्तमानकालाकडे पहाणारा मनुष्य आहें आणि तुम्हीं नुसते वर्तमानपत्राकडे पाहाणारे मनुष्य आहांत. वर्तमानकाल आणि वर्तमानपत्र ह्यांच्यांत जमीन अस्मानाचं अन्तर असतं, तितकंच अन्तर तुमच्या–आमच्यांतही आहे."

काकांसाहेबांचें हें उग्र स्वरूप पाहून नानासाहेब हटले. तरीही थोडासा चिमटा घेण्याच्या उद्देशानें म्हणाले, " आणि तितकंच अन्तर तुमच्यांत आमच्यांत आहे. कारण आम्हीं पुण्यांत आहोंत आणि तुम्हीं कोंकणांत असतां ! "

काका हंसत हंसत म्हणाले, " तसं का म्हणाना ! पण तुम्हींही कोंकणांतच होतां हें विसरूं नका. तुमची मुंजही कोंकणांतच झाली होती आणि मी त्या वेळीं तुमच्या मुंजीला हजरही होतों."

नानासाहेब हंसत हंसत म्हणाले, " तें खरं आहे. पण आतां कोंकणशीं आमचा काय संबंध राहिला आहे ? जाऊं द्या. उगीच वादविवाद कशाला ? हा अप्रिय विषयच नको."

" बरं तर, हा तुमचा अप्रिय विषय बन्द करून मी आतां माझ्या प्रिय विषयाकडे वळतों. मी आज त्या शाळेच्या हेडमास्तरणीला भेटून आलों. पलीकडच्या घरांतील एक मुलगी शाळेंत जाणारी आहे, तिची मथूला सोबत होईल. तिनं शाळेंत जावं अशी माझी इच्छा आहे आणि तिलाही त्याची आवड आहे. तुम्हांला कदाचित् आवडत नसेल तर माझ्यासाठीं सहन करा. तिला शाळेंत जाऊं द्या. कुणी नांव ठेवूं लागलं तर माझं नांव सांगा."

" तुमचं नांव सांगून काय होणार ? तुम्हीं रहाल तिकडे कोंकणांत आणि इथं तोफेच्या तोंडीं सांपडणार आम्हीं. आम्हांला लोकं तोंड वर काढून देणार नाहींत."

" तुमच्या शेजारचीच मुलगी हायस्कुलांत जाते. तीं माणसं कांहीं माना खालीं घालून रहात नाहींत. असं पहा, तुमच्या वहिनींचं मन सध्यां दुखवूं नका. तिची शिकण्याची सध्यां हौस आहे. बिचारी अगदीं निराश्रित झालेली–ह्या वेळीं तिची ही हौस पुरवलीत–अगदीं तुमच्या मर्जीविरुद्ध पुरवलीत तर तिच्यावर उपकाराचा तेवढाच बोजा राहील–आणि..."

ह्या पुढील भाषण अगदीं एकमेकांच्या कानाशीं लागून होत होतें. तें मला ऐकूं आलें नाहीं. बराच वेळ हें कुजबुजणें चालल्यावर नानासाहेब मोठ्यानें म्हणाले, "ठीक आहे, होऊन जाऊं द्या एकदां तुमच्या मनासारखं. कुणी कांहीं बोललं तर मी तुमच्याकडे बोट दाखवीन आणि आम्हीं नामानिराळे राहूं. घरच्या कामाची मात्र तिच्याकडून हयगय होतां कामा नये."

"तें माझ्याकडे लागलं."

दुसऱ्या दिवसापासून मीं इंग्रजी शाळेंत जाऊं लागलें. त्या शाळेंत त्या वेळीं मुली फारच थोड्या होत्या. त्यांतील बऱ्याचशा मुली बाटलेल्या ख्रिस्ती लोकांच्या होत्या. माझ्या शेजारची मुलगी माझ्याच वर्गांत होती. तिचें लग्न झालें नसल्यामुळें शेजारची मंडळी तिची नाहीं नाहीं ती थट्टा करीत असत. पण ती मनाची मोठी खंबीर होती. कुणाच्याही थट्टेची ती केव्हांही पर्वा करीत नसे. आम्हीं दोघी रस्त्यानें जाऊं लागलों म्हणजे रस्त्यावरील मंडळी आम्हांला पाहून इतके चमत्कारिक उद्गार काढीत, कीं त्यामुळें पुरुषांबद्दल आम्हांला तिटकाराच उत्पन्न होत असे. त्या भाषणांत सभ्यतेचा लवलेशही नसे. अश्लीलपणाची ती परमावधि होती. सुबुद्ध म्हणवणाऱ्या पुरुषांच्या तोंडून इतकी हलकट भाषा येते तरी कशी ह्याचें मला आश्चर्य वाटे. रस्त्यानें जातांना त्यांनीं आमच्यावर कागदांचे बोळे किंवा खडे मारावे, खांकरावें, खोट्या शिंका काढाव्या, असें नित्य चाललेलें असे. आम्हीं रस्त्यानें जातांना वर नजर करून पहातही नसूं, पण चुकून एकादे वेळीं नजर वर झालीच तर त्यांनीं डोळे मिचकवण्यास कमी करूं नये. पुरुषजातीचे हे घाणेरडे मासले पाहून मला पुरुषजातीची अगदीं शिसारी येऊं लागली.

मी शाळेंत जाऊं लागल्यानंतर सुमारें एक महिन्यानें काका आपल्या गांवीं निघून गेले. आतां माझ्यावर काय प्रसंग येईल आणि काय नाहीं याची मला भीति पडली होती, पण चमत्कार हा कीं नानासाहेबांच्या वर्तनांत फरक झाला नाहीं. अशा कोणत्या मंत्रानें काकांनीं त्यांना भारून ठेवलें होतें कोण जाणे !

काकांच्या शिकवणीप्रमाणें मी घरकामांत कधींच कुचराई केली नाहीं. घरकामाच्या पायीं वारंवार माझ्या अभ्यासाची आबाळ होत असे, तरीही घरकाम आधीं आणि अभ्यास नन्तर, असें व्रत मीं चालू ठेवलें होतें. रात्रीं केव्हां केव्हां मी लीलेचा अभ्यास घेत असें. एके दिवशीं लीला मला म्हणाली, " मला इंग्रजी शिकायचं आहे. बाबा कांहीं मला इंग्रजी शाळेंत घालणार नाहींत. तूंच शिकव ना

थोडंथोडं. " तिच्या सांगण्याचें मला कौतुक वाटलें आणि मी तिला इंग्रजी शिकवण्यास सुरवात केली.

तिच्या पाटीवर इंग्रजी अक्षरांचा धडा पाहून नानासाहेबांच्या पायाची तिडिक मस्तकास गेली. लाथ मारून तिची पाटी फोडून टाकून ते म्हणाले, " ऐकलंत वहिनी , भास्कररावांच्या शब्दासाठीं आम्हीं तुमचीं थेरं चालूं दिलीं आहेत. लोकं आमच्या तोंडावर थुंकतात, पण भास्कररावांकडे पाहून आम्ही तें सहन करतों. परंतु माझ्या मुलीनं इंग्रजी शिकलेलं मला बिलकुल खपायचं नाहीं. हे म्लेंच्छाचार आम्हांला नको आहेत. तुमच्या तुम्हीं मुखत्यार आहांत. तुम्हीं काय वाटेल तें करा, पण हीं असलीं थेरं माझ्या मुलीला शिकवूं नका. "

त्या दिवसापासून मी लीलेला इंग्रजी शिकवण्याचें बन्द केलें. एवढेंच नव्हे, तर तिचा मराठी शाळेचा अभ्यासही न घेणें मला बरें वाटलें. त्या पोरीला मात्र अगदीं मेल्याहून मेलें झालें. चोरून शिकवण्यासाठीं मला ती पुन्हां पुन्हां आग्रह करी, पण मी तिचें बोलणें मनावर घेत नसें. म्हणजे लीलेला शिकवूं नये असें मला वाटत होतें असें नव्हे, पण माझा नाइलाज होता. तिला चोरून शिकवलें असतें आणि ते नानासाहेबांना कळलें असतें, तर तिच्या शिक्षणाबरोबर माझेंही शाळत जाणें बन्द झालें असतें. नानासाहेब मला इंग्रजी शाळेंत जाऊं कसे देतात हेंच एक मला मोठें गूढ होतें.

एके दिवशीं नानासाहेब रात्रीं ऑफिसांतून आल्यावर एक पत्र हातांत घेऊन माझ्यासमोर येऊन उभे राहिले आणि म्हणाले, " हें तुमच्या बाबांचं पत्र आलं आहे. त्यांत काय लिहिलें आहे तें तुम्हींच वाचा. "

" पत्र मला आलं आहे का ? "

नानासाहेब चमत्कारिक चेहरा करून म्हणाले, " पत्र मलाच आलं आहे–पण तें तुम्हींच वाचा. "

असें म्हणून पत्र माझ्या अंगावर टाकून ते निघून गेले. मी पत्र हातीं घेतलें. पण तें वाचित असतांना माझा हात थरथर कापूं लागला–कारण पत्रावर ' श्री ' कार नव्हता.

दोनच दिवस ताप येऊन माझी आई कैलासवासी झाल्याचा त्यांत मजकूर होता !

पत्र वाचतांच मी जोरानें एक किंकाळी फोडली आणि धाडकन् जमिनीवर आंग टाकून दिलें. नानासाहेब किंवा जाऊबाई कुणी जवळ सुद्धां आलीं नाहींत. लीली आणि तिची धाकटी बहीण माली माझी किंकाळी ऐकून धांवत आल्या. तें पाहून नानासाहेब म्हणाले, " अग, तिला शिवूं नका. इकडे या. "

समाधानाचा एक शब्द बोलणारें देखील जवळपास कुणी नव्हतें. आईच्या वियोगानें माझ्या मनाला केवढा धक्का बसला असेल याची कल्पना ह्या कुणालाच का झाली नाहीं? मी नुसती ' आई ' ' आई ' अशा हांका फोडीत रडत होतें आणि त्या दोघी मुली दारांत उभ्या राहून माझ्याकडे टकमक पहात होत्या.

दारांतून लीलेनें विचारलें, " काकू, कां रडतेस? काय झालं? "

माझ्या तोंडून उत्तर कुठलं येणार?

लीलेनें आपल्या आईला विचारलं, " आई, काकू कां ग रडते? "

अगदीं रुक्ष आणि तुसड्या आवाजानें जाऊबाई म्हणाल्या, " तिची आई मेली. "

मनाच्या कठोरपणाची ही प्रत्यक्ष साक्ष पाहून त्या तशा दुःखावेगांत देखील जाऊबाईचा मला भयंकर संताप आला. नानासाहेब तर कांहीं बोलतच नव्हते. ते एकदां नुसते ओरडले मात्र—" लीले, चला येऊन जेवायला बसा. काकूची वाट पाहूं नका. ती आज जेवायची नाहीं. "

मी तशीच त्या बापुडवाण्या स्थितींत आक्रंदत पडलें होतें. कुणीही माझी विचारपूस केली नाहीं. रडण्याच्या श्रमानें थकून मी जमिनीवर केव्हां झोंपी गेलें तें माझें मलाच कळलें नाहीं.

दुसऱ्या दिवशीं मी तशीच कोंपऱ्यांत पडून होतें. शाळेंत जाण्याच्या वेळेस शेजारची मनू आली. त्यावेळीं झालेली हकीकत सांगण्याचें मला धैर्यच होईना. मी पत्र तिच्यापुढें टाकलें. पत्र वाचतांच तिच्या डोळ्यांतून टचकन् पाणी आलें. तिच्या मनांत माझ्याशीं बसून बोलायचें होतें, पण शाळेची वेळ झाल्यामुळें तिला नाईलाजानें जावें लागलें. संध्याकाळीं शाळेंतून आल्यावर रात्र पडेपर्यंत ती माझ्याशीं बोलत बसली होती. तेवढाच वेळ काय तें माझ्या जिवाला बरें वाटलें. आईच्या वियोगानें माझ्या मनावर काय परिणाम झाला असेल ह्याची कल्पना माझ्यासारख्या एकाद्या बालविधवेलाच होईल!

ह्या गोष्टी वर्णनापलीकडच्या आहेत.

अशौच्याचे दिवस संपल्यावर मी पुन्हां शाळेंत जाऊं लागलें.

दुःखावर डागण्या म्हणतात त्या ह्याच. काकांकडून आज एक विलक्षण पत्र आलें. पत्र वाचतांच मनुष्यस्वभावाबद्दल मला फार आश्चर्य वाटलें. पुरुषजातीचा एक प्रकारचा तिटकारा उत्पन्न झाला. त्या पत्रांतील मजकूर जितका हृदयद्रावक होता तितकाच तो हास्यास्पद होता. पश्चात्ताप झाला असें ज्या वेळीं मनुष्य म्हणतो त्या वेळीं ज्या गोष्टीचा पश्चत्ताप झाला तशा प्रकारची गोष्ट त्याच्या हातून पुन्हां घडणार नाहीं असें आपण समजतों. मला वैधव्य आलें त्या वेळीं बाबांनीं केल्या चुकीबद्दल—म्हणजे माझ्या विजोड लग्नाबद्दल—केवढा मोठा पश्चात्ताप झाल्याचें दाखवलें होतें! किती परोपरीनें स्वतःच्या कृतीबद्दल स्वतःला दूषण लावून घेतलें होतें! माझ्या आयुष्याचा नाश केल्याच्या जाणिवेनें किती वेळां ऊर बडवून घेतलें होतें!

तो त्यांचा पश्चत्ताप कुठें गेला? म्हाताऱ्याशीं लग्न केल्यामुळें विधवा झालेली मुलगी धडधडीत नजरेसमोर असतांना त्यांनीं केवढें अघोर पाप केलें? काकांनीं पत्रांत असेच शब्द लिहिले होते. मी कायमची माहेराला मुकलें.

बाबांनीं पुन्हां लग्न केलें!

मी त्या पत्राची कुठेंच वाच्यता केली नाहीं. त्या पत्रामुळें माझ्या हृदयाला जो धक्का बसला तो आईच्या वियोगाच्या धक्क्याहूनही फार मोठा होता. दोनच महिन्यांच्या अवधींत माझ्यावर हीं दोन संकटें कोसळलीं. एक मातृवियोग आणि हा दुसरा—पितृवियोग म्हणायला काय हरकत आहे? मला आभाळ कोसळल्यासारखें झालें. आतां पुढील आयुष्यांत एकच आधार—ताई. ईश्वर तिला उदंड आयुष्य देवो!

मी नित्याप्रमाणें शाळेंत जात होतें.

नित्याप्रमाणें पुण्यांतील चटोर मंडळी आमची तशीच कुचेष्टा करीत होती. हल्लीं हल्लीं ही कुचेष्टा आमच्या अगदीं अंगवळणीं पडत चालली होती. कुचेष्टेची कळा मात्र दिवसेंदिवस वाढत होती. एके दिवशीं एका गृहस्थानें आम्हीं रस्त्यांतून येत असतां अगदीं समोर येऊन एका लहान कॅमेऱ्यानें आमचा फोटो घेतला.

एकदां तर एक गृहस्थ आम्हां दोघींना धक्का देऊन दोन बाजूला सारून आमच्या मधून निघून गेला. जातांना मान वळवून आमच्याकडे पाहून डोळे मिचकावायलाही त्याला शरम वाटली नाहीं.

गांवचे टवाळ लोक रोज कांहीं तरी नव्या नव्या प्रकारानें आमचा पाठपुरावा करीत होते.

लवकरच एक नवीन अडचण उत्पन्न झाली. मनूचें लग्न झालें आणि ती सासरीं निघून गेली आणि मी एकटीच राहिलें.

मनूच्या धीरावर चटोर लोकांच्या कुचेष्टा मी आजवर सहन केल्या होत्या. घरीं आल्यावर दोघींनीं मिळून ह्या गोष्टींची चर्चा करून खूप हंसावें. आम्हीं दोघी होतों त्यावेळीं ह्या असल्या चटोर लोकांची मीं कींव करीत होतें, पण आतां मी एकटीच पडल्यामुळें माझी मलाच कींव येऊं लागली. शाळेंत जाणें बंद करावें असेंही मनांत आलें, पण पुन्हां विचार केला, जगाला भ्यायचें तरी किती दिवस ? मी आतां एकटीच झालें होतें. आधीं विधवा, सासरच्या माणसांचा पाठिंबा नाहीं, आई सोडून गेलेली, बापही गेल्यासारखाच—आतां मला पाठिंबा देणारें कोण होतें ? मग आतां ही भीति सोडायची कुणाच्या जिवावर ? जगाशीं झगडायचें कुणाच्या आधारावर ? ईश्वरानें माझ्या नशिबीं एकटेपणाच दिला होता आणि तो एकटेपणा हेंच माझें जीवितसर्वस्व होतें–मग आतां भररस्त्यानें एकटी जायला मी कुणाला कां भ्यावें ? आजपर्यंत लोकांनीं थोडी का थट्टा केली ? तशीच पुढेंही करतील. ह्या थट्टेची तीव्रता घालवण्यासाठीं पूर्वी मनू सोबतीण होती— तसेंच आतां माझें मन मला सोबत नाहीं का करणार ? जशी मनूशीं बोलत होतें तशीच आतां मनाशीं बोलेन, असा विचार केला. मन अगदीं घट्ट केलें आणि शाळेंत जाऊं लागलें.

कुचेष्टेची पराकाष्ठा झाली. पहिल्यांदा रस्त्यानें एकटीच जातांना माझे पाय थरथर कांपूं लागत. माझा घाबरेपणा लोकांच्या नजरेला येऊं नये म्हणून मी हळुहळू मन खंबीर करीत चाललें, पण खड्यांचा आणि कागदांच्या बोळ्यांचा वर्षाव दिवसेंदिवस वाढूं लागला. एके दिवशीं तर एक विद्यार्थी गर्दीची संधि साधून माझ्या अंगाशीं अंग घासून जाऊं लागला. जातां जातां अगदीं माझ्या कानांशीं येऊन म्हणाला, "संध्याकाळीं बंडगार्डनवर फिरायला येशील का माझ्याबरोबर ? मी गाडी घेऊन येईन." मी दोन पावलें मागें हटलें—तसा तोही

मागें हटण्याचा प्रयत्न करूं लागला. माझ्या सहाय्याला तिथं कुणीच नव्हतें. मी अगदीं घाबरून गेलें. तो विद्यार्थी माझ्या आसपास तसाच घुटमळूं लागला हें पाहून आजुबाजूचे लोक हीः हीः करून हंसूं लागले. एकदोघांनीं त्या विद्यार्थ्याला पाठ थोपटून शाबासकी दिली. मी तशीच निसटलें आणि पुढें गेलें. कशीबशी घरापर्यंत मजल गांठली. घरीं येऊन पोंचतांच माझे पाय लुले पडले आणि उंबरठ्याला अडखळून मी खालीं पडलें.

मला वाईट वाटलें तें ह्याबद्दल, कीं तो एक विद्यार्थी होता. वडिलोपार्जित इस्टेटीवर पोट भरून गांवच्या उठाठेवी करणारा गांवगुंड नव्हता. विद्यार्थीदशेंत जर ही वृत्ती तर पुढें काय? पुढें काय होतें तेंही आज मी पाहिलें आहे. ह्यांतीलच कांहीं विद्यार्थी आज आमच्या पेठेंत प्रतिष्ठित व्यापारी होऊन बसले आहेत. अजूनही आमच्या पोरीबाळींना बुधवारच्या चौकांतून जातांना थरकांप सुटतो. नव्या पुलावर आज आपण काय पहात आहोंत? इतकीं वर्षें झालीं तरी ती परिस्थिति बदललेली दिसत नाहीं. पुण्याच्या तरुणांत तोच अपवित्रपणा अजूनही दिसून येतो. मुंबईत नाहीं का मुली रस्त्यावरून जात? पण त्यांची कुणी कधीं भररस्त्यावर थट्टा केल्याचें माझ्या ऐकण्यांत नाहीं. ही वृत्ति आमच्या पुण्यभूमींतच कुठून आली? दुसऱ्या बाजीरावाच्या पायधुळीनें अजूनही असहाय तरुणींची अशीच विटंबना होत रहाणार काय?

पुन्हां दुसरा एक प्रसंग आला. एक दिवस मी रस्त्यांतून जात असतां दोघांनीं माझा अगदीं पाठपुरावा केला. ते दोघे सारखे माझ्या मागून बोलत येत होते. मी वळणें घेऊन रस्ता चुकवण्याचा प्रयत्न केला, तरीही त्यांनीं माझी पाठ सोडली नाहीं.

पहिला म्हणाला, "काय रे, तूं आगरकरांचा अनुयायी आहेस ना? ही पहा वैधव्यपंकांत रुतलेली गाय समोरून जाते आहे, तिचा उद्धार करणार नाहींस का? पहा, ती चांगली शिकलेली आहे. नोकरी करून तुझं पोट भरील. तुला कांहीं उद्योग करावा लागणार नाहीं. नुसते तिचे जोडे पुसून घरीं स्वस्थ पडून रहायचं!"

दुसरा म्हणाला, "मी सुधारक आहें खरा, पण मी बोलका सुधारक आहें. मी हिच्याशीं पुनर्विवाह करणार नाहीं, पण पुनर्विवाह झाला असं नुसतं तोंडानं म्हणेन.—"

त्यानें पुढें जे शब्द उच्चारले ते लिहिण्यानें शाई देखील काळवंडून जाईल. दोघांची असलीच वटवट सारखी चालू होती.

मी घरीं येऊन पोंहोचल्यावर ते दोघेही आमच्या दारांत येऊन उभे राहिले आणि त्यांतील एकजण म्हणाला, "तर मग जाऊं का मी? टीक आहे, उद्यां येईन."

त्यानन्तर दोघेही हंसत हंसत निघून गेले!

मला अगदीं मेल्याहून मेलें झालें. सुदैवानें तिथें कुणीच नव्हतें. कुणी असतें तर माझ्याबद्दल त्यांचा किती भयंकर गैरसमज झाला असता? ह्या चांडाळांच्या हें मुळींच ध्यानांत येत नाहीं का?

अशा रीतीनें मी परिस्थितीशीं झगडत होतें. असेच आणखीही बरेच प्रकार झाले, पण त्यांचा उल्लेख मी करीत नाहीं—इतके ते अमंगळ होते. पूर्वी आम्हीं दोघीही जात असूं त्या वेळीं आमची थट्टा होत होती, तरी ह्या विटंबनेपेक्षां ती किती तरी सौम्य स्वरूपाची होती. हा फरक कां, ह्याचा मी विचार करूं लागलें. एकच उत्तर माझ्यासमोर आलें. 'मी विधवा.' नुसत्या मुलींची थट्टा होते खरी, पण विधवेची थट्टा—कुचेष्टा जास्त अमंगळपणानें होते. मी शाळेंत जातें एवढ्याचसाठीं माझी कुचेष्टा होत नसून मी विधवा होतें हेंच त्या अमंगळपणाचें कारण होतें असें मला वाटूं लागलें. शाळेंत जाणाऱ्या विधवेचीच थट्टा होते असें नसून शाळेंत न जाणाऱ्या कोणत्याही विधवेला असेच अमंगळ अत्याचार सहन करावे लागतात असेंही मला दिसून आलें. सवाष्ण मुलींची किंवा बायांची थट्टा होते, पण ती तुलनेनें फारच सौम्य असते. अशा वेळीं 'थट्टा करणारे मूर्ख आहेत' असें समजून तसल्या प्रकारची थट्टा सहन करतां येणें शक्य असतें, पण विधवेची जी थट्टा होते ती भयंकर विटंबनेच्या स्वरूपाची असते. मानवी स्वभावाच्या सहनशक्तीच्या पलीकडची असते. विधवा ही 'विधवा' आहे असें प्रत्यक्ष दिसून येतें, म्हणूनच असल्या विटंबनेला तिला बळी पडावें लागतें. विधवा ही विधवा आहे असें उघड उघड कळण्याचें जर साधन नसतें तर थट्टेची तीव्रता इतकी कडोविकडीला गेली असती का?

हा एकच विचार सदोदित माझ्या मनांत घोळूं लागला.

कपाळीचें कुंकूं लग्नापूर्वीपासूनचें आमच्या सत्तेचें आहे—वैधव्य आल्यावर तें आम्ही हरवून कां बसावें? मंगळसूत्रावर आमची सत्ता नाहीं, मंगळसूत्र पतीनें

बांधलें आणि पतीबरोबरच तें निघून गेलें तर त्यांत गैर असें कांहीं नाहीं, पण आम्हांला कुंकूं पुसायला लावतात हा जुल्म नाहीं का? गळ्यांत मंगळसूत्र नसलें तर तें कुणाच्या नजरेला येत नाहीं, पण कपाळीं कुंकूं नसलें तर घसकन् तें प्रत्येकाच्या नजरेस येतें. फटफटींत कपाळावरूनच ती विधवा असल्याचें प्रत्येकाला कळून येतें. कपाळींचें कुंकूं पुसून आम्ही चटोर लोकांना सांगत असतों, कीं 'पहा, मी विधवा आहें!' आमच्या वैधव्याचें अशा रीतीनें अन्यायानें प्रदर्शन होत असल्यामुळें आमची जी विटंबना होते तिचें जोखीम आमच्या ह्या खुळ्या रूढीवरच पडतें. धर्मशास्त्रांत तसें आहे असें म्हणतात, पण धर्मशास्त्रें ज्या वेळीं झालीं त्या वेळीं आजची परिस्थिति होती कीं काय, ह्याचा कुणी विचार करीत नाहीं. धर्मशास्त्राविरुद्ध जाऊन इतर पुष्कळसे आचार आम्हीं नाहीं का मोडले? आचार मोडले आहेत खरे, पण ते पुरुषांनीं!—रूढी मोडण्याच्या कामीं अजून आम्हीं बायकांनीं पुढाकार घेतला नाहीं. पूर्वीच्या काळीं कपाळींचें कुंकूं पुसून विधवा ही विधवा आहे हें दाखवून देण्यांत मूळ उपाययोजकाचा विधवेचें रक्षण करण्याचा हेतु असेल. त्या वेळीं मनोभावनेच्या जोरावर जगाचे व्यवहार चालत असतील. आज व्यवहाराच्या जोरावर जगाचा व्यवहार चालत आहे. भावनेला तेथें वाव नाहीं. अशावेळीं सोयीच्या दृष्टीनें आमच्या रूढींत आम्हीं नको का फरक करायला?

घटकाभर सोयी बाजूला राहोत, पण मला असें वाटतें, कुंकूं लावणें हा स्त्रीजातीचा जन्मसिद्ध हक्क आहे. तो हिरावून घेण्याचा कुणालाही अधिकार नाहीं. कशी ही रूढी प्रचारांत आली असेल ती असो, पण मला माझ्या त्या पोरवयांतसुद्धां ती मूर्खपणाची वाटली. ज्या दिवशीं माझ्यावर आभाळ कोसळलें त्या दिवसाची मला आठवण झाली. त्या दिवशींही मला असेंच कांहींसें वाटलें होतें. जगाच्या तापांचा अनुभव मिळून त्या वेळीं मी सुबुद्ध झालें नव्हतें. निर्मळ मनाची मी नुसती एक खेडवळ मुलगी होतें आणि माझ्या निर्मळ मनाला माझें कुंकू हिरावून घेतल्याचा त्या वेळीं विषाद वाटला होता. ती भावना अगदीं स्वाभाविक होती.

जी स्वाभाविक वृत्ति तीच खरी ईश्वरी वृत्ति आणि तोच खरा सनातन धर्म—असेंच नाहीं तर काय?

एका अजाण मुलीच्या निर्मळ मनांतून परमेश्वरच हें बोलला होता. त्या ईश्वरी आदेशाचा त्या वेळीं मी अव्हेर केला त्यामुळेंच आज मला हीं संकटें भोगावीं

लागत आहेत, अशी भावना माझ्या मनांत येऊं लागली आणि संधि येतांच माझें इक्काचें कुंकूं पुन्हां लावण्याचा मी निश्चय केला.

असेंच कांहीं महिने गेले. मी त्या वेळीं इंग्रजी सहाव्या इयत्तेंत होतें आणि शाळेंतील पहिल्या नंबरची विद्यार्थिनी गणली जात होतें. ह्या वर्गांतील अभ्यास आणि वाढतें घरकाम ह्यांचा मेळ बसवतांना माझी फार त्रेधा उडत होती.

—तरीही, आल्या वेळेपुढें मान वांकवून मी परिस्थितीशीं झगडत होतें.

एके दिवशीं बाबांची स्वारी येऊन थडकली. त्यांच्या बोलण्यावरून नानासाहेबांच्या आमंत्रणावरून ते आले होते असें मला कळलें.

बाबांना पहातांच मला आईची आठवण झाली, पण त्याबरोबरच बाबांच्या अविचाराचीही आठवण झाली. बाबाही माझ्याशीं बोलतांना चोरट्याचोरट्यासारखे वागत होते. मी घरची फारशी चौकशी केली नाहीं. आणि चौकशी तरी कुणाची करायची ? बाबाही विशेष मोकळेपणानें माझ्याशीं बोलले नाहींत. आम्हां दोघांमध्यें रक्ताचें नातें असून परकेपणाची भावना उत्पन्न झाली.

बाबा आणि नानासाहेब खोलींत बसून दाराला कडी लावून बराच वेळ बोलत होते. मधूनमधून दोघांचं भाषण भांडणाच्या मजलेपर्यन्त आल्याचा मला भास झाला. दाराला मुद्दाम कान लावून ऐकणं मला योग्य वाटलं नाहीं. कांहीं वेळानें दार उघडलें आणि दोघेही बाहेर आले. दोघांचेही चेहरे रागानें तारवटलेले दिसत होते. बाबा ओटीवरच बसले आणि नानासाहेब घरांत आले.

" वहिनी, एका शब्दांत उत्तर द्या. तुम्हांला तुमचा बाप हवा आहे कीं मी हवा आहें ? " घरांत आल्यावर नानासाहेबांनीं एकदम मला विचारलें.

" दोघेही मला सारखेच आहेत. "

" असं गुळमुळीत उत्तर मला नको आहे. तुम्हांला माझ्या मताप्रमाणें वागायचं आहे कीं तुमच्या बापाच्या मताप्रमाणं वागायचं आहे—ह्याचं स्पष्ट काय तें उत्तर द्या. " नानासाहेब जोरजोरानें म्हणाले.

मी मनाचा निश्चय करून ठांसून उत्तर दिलें,

" मला माझ्या स्वतःच्या मताप्रमाणं वागायचं आहे."

" स्वतःच्या मताप्रमाणं ? कसलं आलं आहे तुम्हांला मत ? शाळेंत जाऊन इंग्रजी शिकलं म्हणजे कांहीं अक्कल येते असं नाहीं ! बायकांना कसलीं आलीं

आहेत मतं ? त्यांतून तुम्हीं विधवा. मला हे सुधारकी चोचले नको आहेत. अगदीं सरळ सरळ काय तें उत्तर द्या. माझ्या मताप्रमाणें वागायचं असलं तर तुम्हांला माहेर वर्ज केलं पाहिजे आणि बापाच्या मताप्रमाणं वागायचं असलं तर सासरला रामराम ठोकला पाहिजे." नानासाहेब सन्तापून भडकून म्हणाले.

मी शान्तपणानें विचारलें, "मत कोणत्या बाबीसंबंधीं ?"

"कांहीं विशेष नाहीं. एका कागदावर सही पाहिजे. मी दाखवतों तिथं सही करा म्हणजे झालं."

बाबा ओटीवरून धांवून एकदम आंत आले आणि मला म्हणाले, "खबरदार सही केलीस तर! नुसत्या तुझ्या सहीनं भागायचं नाहीं—माझीही सही पाहिजे."

"कागद मला दाखवाल का ?"

"हो, खरंच तें. आतां तुम्हांला इंग्रजी येऊं लागलं आहे. आतां तुमचा आमच्यावर विश्वास कसा बसणार ?"

मी वाद मोडून काढण्याच्या उद्देशानें म्हणालें, "हे मतभेद कशाला उगीच? काका जसं सांगतील तसं मी करीन. उद्यां मी बाबांबरोबर काकांकडे जाणारच आहें. त्यांच्याकडे हे कागद पाठवून द्या म्हणजे झालं."

नानासाहेब म्हणाले, "भास्करराव समंजस माणूस आहे. ते अयोग्य असं कांहींच सांगणार नाहींत. मला कबूल आहे."

बाबा म्हणाले, "पण मला कबूल पाहिजे ना? किती झालं तरी ते तुमचे जांवई—माझे कुणीच नव्हत. कांहीं झालं तरी त्यांचा ओढा तुमच्याकडेच असणार."

मी मध्येंच म्हणालें, "काका केव्हांही माझ्या अकल्याणाची गोष्ट सांगणार नाहींत अशी माझी खात्री आहे."

एवढें बोलून मी घरांत निघून गेलें तरीही बाबा आणि नानासाहेब एकमेकांना टाकून बोलतच होते. त्या बोलण्यांत वादाच्या विषयाचा मात्र मुळींच उल्लेख होत नव्हता. भांडणाचें कारण त्या वेळेपर्यंत मला मुळींच कळलें नव्हतें.

दुसऱ्या दिवशीं मी बाबांबरोबर निघालें.

दाभोळ बंदरीं उतरतांच बाबांनीं काकांच्या गांवीं जाण्यासाठीं मला एक ओळखीचा माणूस सोबतीस दिला. प्रवासांत कारणाशिवाय बाबांचें आणि माझें मुळींच भाषण झालें नाहीं.

काय असेल तें असो, त्यांच्याबद्दल माझ्या मनानें अगदीं तिटकारा घेतला होता. बाप या नात्यानें त्यांच्याविषयीं असणारा माझा आदर आणि प्रेम समूळ नष्ट झालें होतें.

ताईच्या गांवीं येतांच मला माहेरीं आल्यासारखें वाटलें. ताई भेटतांच मला आईची आठवण झाली.

काय विलक्षण योग? मी ताईची आई होतें. नात्यानें ताई माझी सावत्र मुलगी होती. मुलीच्या भेटीनें मला आईची आठवण व्हावी–ही काय भवितव्यता!

काकांनीं आल्या दिवशीं माझ्या अभ्यासाची चौकशी केली. माझीं पुस्तकें घेऊन कांहीं प्रश्नही विचारले. मी त्यांचीं उत्तरें दिल्यावर ते मला म्हणाले,

" मथू, तूं मुलगा व्हायला पाहिजे होतीस. तूं मुलगी झाल्यामुळं महाराष्ट्र एका विद्वान् व्यक्तीला मात्र मुकणार."

"असं कां म्हणतां? स्त्रियांनीं विद्वत्ता सम्पादन केली तर पुरुषासारखीच त्यांना कर्तबगारी करून दाखवतां येणार नाहीं का?"

"येईल, खात्रीनं येईल. तुझ्यासारख्या मुलींनींच आतां जगाला हे धडे घालून दिले पाहिजेत, तरच मुलींना शिक्षण देणाऱ्या बाबतींत पुढील पिढी जास्त जागृत राहील. रूढीचीं बंधनं तोडून मुलींनीं आतां पुढं पाऊल टाकलं पाहिजे, तरच पुढल्या पिढींत कांहीं उन्नति होण्याची आशा आहे."

मला चटकन् आठवण होऊन मी म्हणालें, "रूढीचं नांव काढलंत त्यावरून मला आठवण झाली–एक प्रश्न विचारायचा आहे."

"एक कां? वाटेल तेवढे प्रश्न विचार. मला जेवढं कांहीं माहीत आहे तेवढंच तुला सांगेन."

"विधवांनीं कुंकूं कां लावूं नये?"

"तशी रूढी आहे आणि शास्त्राधारही तसाच आहे."

"हा शास्त्राधार गैर आहे असं नाहीं का तुम्हांला वाटत? हल्लीं जगांतील सर्व व्यवहार शास्त्राधाराप्रमाणेंच चालत आहेत का?"

"नाहींत, मुळींच नाहींत. किंबहुना हरएक बाबतींत शास्त्राविरुद्धच आचरण जास्त होत असतं. बहुतांशीं पाहिलं तर शास्त्रापेक्षां रूढीवरच जास्त जोर देण्यांत येतो."

" म्हणजे—रूढी या शास्त्राला अनुसरून नाहींत असंच समजायचं का ? "

" अर्थात् ! कोणतीही शास्त्रबाह्य गोष्ट पुष्कळ काळपर्यंत प्रचारांत येऊन स्थिर झाली–म्हणजे रूढ झाली–कीं तिला रूढी म्हणतात. "

" म्हणजे—शास्त्रबाह्य गोष्टी प्रचारांत आणणें अशक्य नाहीं, असंच समजायचं का ? "

" असंच तर काय ? तसं नसतं तर रूढी हा शब्दच प्रचारांत आला नसता ! "

" शास्त्रबाह्य समजली जाणारी एखादी गोष्ट जर आज प्रचारांत आणली, तर ती पुढं रूढी होऊं शकेल कीं नाहीं ? "

" आजपर्यंत बऱ्याच गोष्टी जर रूढ झाल्या आहेत तर ह्यापुढं आणखी कांहीं नवीन गोष्टी कां रूढ होणार नाहींत ? "

" विधवांनीं कुंकूं लावण्याच्या बाबतींत मला असंच करावंसं वाटतं. "

इतका वेळ ताई आमचें भाषण शांतपणें ऐकत होती. ती एकदम मध्यें तोंड घालून म्हणाली,

" इश्श ! हें काय भलतंच बोलतेस मधु !–असं कधीं झालं आहे का ? "

" असं कधीं झालं नाहीं म्हणूनच मी म्हणतें, कीं एकदां असं करून पाहिलं पाहिजे–आणि माझ्याकडे त्याला आधारही आहे. "

" कसला आधार ? शास्त्राधार का ? "

" शास्त्राधारच कांहीं नव्हे, पण शास्त्राधाराइतकाच तो आधार बळकट आहे. ताई, आतां तूंच मला सांग, आपण कुंकूं केव्हांपासून लावतों ? "

" आपण लावतों म्हणण्यापेक्षां आपले आईबापच आपणाला कुंकूं लावीत आले आहेत. कुंकूं लावणं म्हणजे काय हें जेव्हां कळत नव्हतं तेव्हांपासून आपल्या कपाळीं कुंकवाचा टिळा आहे. "

" हें खरं ना ? आतां असं सांग, मंगळसूत्र आपल्या गळ्यांत केव्हां येतं ? "

" लग्नाच्या वेळीं वराच्या हातानं वधूच्या गळ्यांत मंगळसूत्र बांधलं जातं. "

मी स्फुरण येऊन बोललें, " झालं तर–हाच माझा आधार. माझे आधार तूंच दिले आहेस. कुंकूं आपलं जन्माचं वैभव आहे. सौभाग्याचा किंवा वैधव्याचा

संबंध फक्त मंगळसूत्राशीं आहे. पतीनं मंगळसूत्र बांधलं–त्याच्यामागं तें वाढवलं. कुंकू आपलं हक्काचं आहे, तें कांहीं आपणाला पतीनं लावलेलं नाहीं–पतीच्या निधनानंतर तें काढून टाकण्याचा आपणाला मुळींच अधिकार नाहीं. आम्ही विधवा कुंकू लावित नाहीं हा माझ्या मतें शास्त्राचार नसून अनाचार आहे."

आनन्दानें गहिंवरून माझी पाठ थोपटीत काका म्हणाले, "शाबास पोरी, शाबास. आज तूं ह्या भास्कररावाला लाजवलंस. विधवांची स्थिति आणि स्त्रीशिक्षण ह्या दोन्ही विषयांचा मी सांगोपांग विचार केला आहे, असा मला हा वेळपावेतों अभिमान होता, पण आज तो फोल ठरला. खरोखर मला तुझा मत्सर वाटतो. तुला एवढ्याशा पोरीला ही गोष्ट सुचली आणि हा वेळपावेतों ती माझ्या ध्यानांत येऊं नये हें आश्चर्य होय! किती अगदीं साधी आणि सरळ गोष्ट! यांत वादविवाद करतांच येणार नाहीं!"

ताईकडे वळून ते पुढें म्हणाले, "ह्यांत कांहीं गैर आहे असं तुला वाटतं का? अगदीं सरळ सरळ सांग."

ताई कांहींच न बोलतां स्तब्ध राहिली.

"असं गप्प राहून चालणार नाहीं–उत्तर मिळालं पाहिजे."

क्षणभर थांबून ताई म्हणाली, "सारासार विचाराच्या दृष्टीनं पाहिलं तर मथूचं म्हणणं योग्य दिसतं; पण मनाला कससंच वाटतं. विधवेचं तोंडसुद्धां अपशकुनी असं आजवर आपण समजत आलों"—

"पण तें कुंकू नसल्यामुळं—" मी एकदम मध्येंच म्हणालें.

"हें तर खरंच, पण शिवाय—"

इतकं बोलून जीभ चावून ताई थांबली.

"तूं काय म्हणणार आहेस तें मी समजलों—केशवपनाची चाल ना?"

ताई मानेनेंच 'होय' म्हणून म्हणाली.

"त्याबद्दलही मथूचाच मुद्दा लागू पडतो. केशवपनाबद्दल श्रुतींत किंवा स्मृतींत आधार असल्याचं मला तरी माहीत नाहीं. बंगाल्यांत हा रिवाज नाहीं, उत्तर हिन्दुस्थानांत नाहीं, पंजाबांत नाहीं, नेपाळांत नाहीं, गुजरातेंतही बहुतेक नाहींच–आहे काय तो आमच्या महाराष्ट्रांत आणि मद्रासेंत! पुराणांत देखील केशवपनाला आधार नाहीं. गुरुचरित्रासारख्या खोट्या कर्मकांडाचं आणि गुरु-

परंपरेचं बंड माजवणाऱ्या एकाद्याच आधुनिक ग्रंथांत केशवपनाला आधार असेल, पण मला तो ग्राह्य वाटत नाहीं. मद्रासेंत काय, नुसतं विधवांचंच केशवपन करतात असं नाहीं, तर सवाष्ण बायकाही केस काढतात. व्यंकटगिरीला जाऊन आलेल्या यात्रेकरूंत केसांचं मुंडन करून कपाळीं भला भक्कम कुंकवाचा टिळा लावलेल्या मद्रासी बाया सर्वत्र दिसतात. हे मद्राशांचे द्राविडी आचार आम्हीं उचलले आहेत. हीं मद्रासी वेडं आम्हीं जितक्या लवकर टाकून देऊं तितकं लवकर आमचं कल्याण होईल. कुंकूं लावण्याच्या बाबतींत मात्र सर्व हिंदुस्थानांत एकच पद्धत आहे–पण केशवपन? ही राक्षसी रूढी प्रचारांत आणणाऱ्या मांगांना आणि ती प्रत्यक्ष अमलांत आणणाऱ्या मूर्खांना कायद्यांत जितकी जास्त शिक्षा देणं शक्य असेल तितकी देणं अवश्य आहे. सतीची चाल जशी कायद्यानं बंद पाडली तशीच केशवपनाची चाल कायद्यानं बंद पाडली पाहिजे. पण कायदे करणं आज आमच्या हातीं कुठं आहे? तें एक असो, पण कुंकवाच्या बाबतींत तुझं काय मत आहे तें सांग पाहूं."

"मी एकदां सांगितलं ना, कीं सारासार विचाराला हें पटतं, पण इतक्या दिवसाचे संस्कार मनांतून एकदम कसे जावे? विधवेनं कुंकूं लावणं ही नुसती कल्पना मनांत आली, कीं अंगावर कसे शहारे येतात."

"तुझ्या अंगावर शहारे येतात, पण माझ्या अंगावर आनंदाचे रोमांच येतात. तो आंतला करंडा घेऊन मथूला कुंकूं लाव पाहूं."

ताईचा चेहरा गंभीर झाला. ती दगडासारखी निश्चल झाली. तिच्या तोंडांतून एकही शब्द निघेना आणि राहिल्या जागेवरून पाऊलही हलेना.

मी काकांना म्हटलें, "तिला हें संकट घालूं नका. विधवा ह्या नात्यानं पुण्याच्या रस्त्यांतून जातांना माझी कशीकशी विटम्बना झाली आहे त्याची हकीकत आधीं ऐका.'

जुलमाच्या जाणिवेनें स्त्रीजातीची मर्यादा दूर सारून पुण्यांत झालेल्या हकीकती आणि भाषणें ह्यांचा त्या उभयतांसमोर मी यथातथ्य पाढा वाचला.

त्या हकीकती ऐकून ताईला भयंकर संताप आला. ती म्हणाली,

"माणसांत एवढा दुष्टपणा असतो ह्याची मला कल्पनाही नव्हती!"

"तुला कल्पना कशी होईल? ज्या वेळीं तूं पुण्यांत होतीस किंवा शाळेंत जात होतीस, त्या वेळीं रस्त्यांतून एकटं फिरण्याचे प्रसंग तुझ्यावर आले नव्हते.

देवाला जायचं तर तें चारचौघींबरोबर. हळदीकुंकवालाही तसंच. ह्याखेरीच किंवा लग्नकार्याखेरीज एकट्यानं बाहेर जाण्याची संधि तुला मुळीं मिळालीच नाहीं. मी हे अत्याचार पाहिले आहेत. माझ्या बरोबरच्या लोकांनीं अत्याचार केल्याचें पाहून वेळोवेळीं मी त्यांची कानउघडणीही केली आहे, त्यामुळं मथूच्या हकीकती ऐकून मला कांहींच आश्चर्य वाटत नाहीं. इथं तर काय, तूं खोतीणच आहेस. तुम्हीं बायका ह्यापेक्षां जास्त मोकळेपणानं ज्यावेळीं घराबाहेर हिंडूं फिरूं लागाल त्याच वेळीं आम्हां पुरुषांच्या स्वैरवर्तनाला कांहीं आळा बसेल." काका ताईला म्हणाले.

मी ताईकडे वळून म्हणालें, "ताई, माझ्या ह्या चर्चेबद्दल तूं माझ्यावर रागावली तर नाहींस ?"

"छी ! छी ! मुळींच नाहीं. तुझ्या भाषणांत अयोग्य असं कांहीं नव्हतंच."

"होय ना ? तर मग आतां तूंच सांग, मी कुंकूं कां लावूं नये ? मला शिकायचं आहे, त्यासाठीं शाळेंत जायचं आहे. ईश्वरानं संधि दिली तर मी कॉलेजांतही जाईन, पण शाळाकॉलेजांत जातांना निष्कारण मी माझ्या विधवापणाचं प्रदर्शन कशाला केलं पाहिजे ? मला शाळेंत घालतांना काकांनीं माझं माहेरचं नांव दिलं आहे. मी जरी विधवा झालें आहें, तरी आहें तशी कुमारीच आहें. तेंच माझं माहेरचं नांव मी ह्यापुढं चालवणार. माझ्या माहेरच्या नांवाबरोबरच मी माझं माहेरचं वैभव—माझं माहेरचं कुंकूं—कपाळभर कां मिरवूं नये ? दुष्ट जगांत वावरतांना स्वतःचा बचाव होण्यासाठीं कुंकूं लावावं असं जरी माझ्या मनाला वाटत असलं—तरी ताई, तुला जर त्यामुळं वाईट वाटत असेल तर मी कुंकूं लावणार नाहीं."

माझ्या तोंडचे हे शब्द ऐकतांच ताईच्या डोळ्यांतून घळघळ अश्रू वाहूं लागले.

ताई एकदम निघून आंत गेली, कुंकवाचा करंडा घेऊन बाहेर आली आणि तिनें तो माझ्या हातांत दिला.

मी करंडा उघडला—तो माझा जुना सोबती पाहतांच मला अत्यानंद झाला.

काका म्हणाले, "शाबास पोरी, जिंकलंस अखेर !"

## प्रकरण अकरावें — वैधव्याचें सार्थक

माझ्या ह्या रूपान्तरानें गांवांत बरीच खळबळ उडाली. निरनिराळे कुतर्क सुरू झाले. खोत ह्या नात्यानें काकांचें वजन फारच असल्यामुळें उघड बोलण्याची कुणाची छाती झाली नाहीं. काकांच्या सुधारकी मतांबद्दल गांवांत आधींपासूनच ओरड होती, पण व्रतेंवैकल्यें आणि दानधर्म ह्यांनीं ताई सर्व भिक्षुकांना संतुष्ट ठेवित असल्यामुळें काकांच्या मतांचा प्रतिकूल परिणाम असा कांहींच होत नसे.

खेडेगांवांत लहानशी गोष्ट किती मोठी होत असते याचा प्रत्यक्ष अनुभव ज्याला आहे, त्याला माझ्या ह्या रूपांतरानें तिथें केवढी खळबळ उडाली असेल ह्याची कल्पना करतां येईल.

काका आणि ताई ह्या उभयतांनीं कुणाच्याही टीकेला जुमानलें नाहीं. जुन्या मताची ताई देखील ह्या कृत्याला प्रतिकूल नाहीं असें पाहून सर्वत्रांना आश्चर्य वाटलें, पण तिच्याविरुद्ध जाण्याची कुणाची तयारी नव्हती. दानधर्माची चंदीवैरण जोंपर्यंत सुरू आहे तोंपर्यंत ताईचीं मतें कोणत्याही प्रकारचीं झालीं तरी त्याची भिक्षुकवर्गाला पर्वा नव्हती. ताईनें ह्यावेळीं देण्याघेण्याच्या बाबतींत हात जरा अधिकच सढळ ठेवला होता आणि त्यामुळें जो इष्ट परिणाम व्हायला पाहिजे होता तो झालाही.

हळूहळू माझ्या रूपांतराची गोष्ट सर्वांच्या अंगवळणीं पडली आणि चर्चा-कुचेष्टा आपोआप बंद झाल्या.

एके दिवशीं चन्दू आला. त्याच वर्षी तो बी. ए. च्या परीक्षेला बसला होता. इतक्यांतच त्याच्या परीक्षेचा रिझल्ट लागणार होता. तो पास होणार ह्यांत शंकाच नव्हती, पण त्याला आणखी काय काय बक्षिसें मिळतात ह्याकडे सर्वांची नजर लागली होती.

मला पाहतांच तो आश्चर्यानें दचकून उभा राहिला आणि म्हणाला,

" हें काय ? मला कसं हें कळलं नाहीं ? "

" तसं कांहीं नाहीं–जसं आहे तसंच आहे. " ताईनें त्याला सांगितलें.

" मग हें कसं ? " कपाळाला हात लावून तो म्हणाला.

ताईनें त्याला सर्व हकीकत सांगितली. ती ऐकतांच तो विचारांत पडल्यासारखा दिसला.

" कां ? विचारांतसा पडलास ? तुला आवडलं नाहीं वाटतं ? " मी चन्दूला विचारलें.

" तसं नाहीं कांहीं--पण जरा चमत्कारिक वाटलं खरं. पहिल्यानदां माझा अगदींच गैरसमज झाला—त्यामुळं कदाचित् मनाला थोडासा चटका बसल्या-सारखं वाटलं असेल ! इकडच्या लोकांना कसं काय हें खपलं ? "

" तें आतां प्रत्यक्षच पहा ! " ताई त्याला म्हणाली.

पुढें माझ्या अभ्यासाची गोष्ट निघाली. आणखी एक वर्षानें मला मॅट्रिकला बसतां येणार होतें, पण हें एक वर्ष कुठें काढावें ह्याचा मोठा प्रश्न पडला होता. ह्यापुढें पुण्याला जावें कीं नाहीं ह्याची सर्वांनाच काळजी पडली होती. बरें, न जावें तर अभ्यासाचें कसें होणार ? मी आल्यानंतर काकांचा आणि नानासाहेबांचा पत्रव्यहार सुरू होता. काकांच्या बोलण्यावरून त्या पत्रव्यवहारापासून पुण्याची परिस्थिति बरीच अडचणीची झाल्याचें आम्हांला कळून आलें होतें.

" मथूला मुंबईला ठेवलं तर नाहीं का चालायचं ? " चन्दूनें विचारलें.

ताई म्हणाली, " मुंबईला कुठं ठेवणार ? तूं बोर्डिंगांत रहातोस तिथं बायकांची सोय होणं शक्य नाहीं. दुसऱ्या कुणाच्या घरीं ठेवूं म्हटलं तर तसं कुणी आपलं कळकळीचं माणूस तिथं नाहीं. मग मुंबईला कुठं ठेवणार ? मुद्दाम बिऱ्हाड करावं असं म्हटलं, तर मला स्वतःलाच तिकडे यावं लागेल. हा प्रपंचाचा एवढा मोठा पसारा टाकून मुंबईला राहून बिऱ्हाड करणं जवळजवळ अशक्य आहे."

त्या भाषणांत शेवटीं निर्णय असा कांहींच लागला नाहीं. मी पुण्यासच जावें आणि पूर्वीप्रमाणेंच कार्यक्रम सुरू ठेवावा असें काकांचें म्हणणें पडलें.

" पुण्याला जायचं—तर पुन्हां हिला कपाळ फटफटित करून जावं लागेल ह्याची तुम्हांला आठवण आहे का ? " चन्दू म्हणाला.

चन्दूचे हे उद्गार ऐकून काकाही थोडे विचारांत पडले. कांहीं वेळानें ते म्हणाले, " हो—तोही एक प्रश्नच आहे. एकदां केल्या गोष्टींत आतां माघार घेणं बरं नाहीं. थोडे दिवस जाऊं द्या, नंतर काय तें निश्चित ठरवूं. "

त्यानंतर कांहीं दिवस तसेच गेले.

चंदूचा रिझल्ट लागला आणि तो पहिल्या क्लासांत पहिला आला. ताईनें मुठी भरभरून सर्वांना पेढे वांटले. आजच्यासारखा त्या वेळीं बी. ए. चा सुकाळ झाला नव्हता. त्यांतून एवढ्या अल्पवयांत बी. ए. झालेला विद्यार्थी त्यावेळीं क्वचितच पहाण्यांत येत असे, असें असल्यामुळें सर्वांनींच चंदूचें मोठें कौतुक केलें. गांवांतील देवळांत एक सार्वजनिक सभा होऊन तिथें चंदूचें अभिनंदन करण्यांत आलें आणि चंदूनेंही सौजन्याला शोभेल अशा प्रकारचें भाषण करून ग्रामस्थांना तृप्त केलें.

चंदूनें पुढें काय करायचें हा आतां प्रश्न होता. त्यानें अमूकच मार्ग स्वीकारावा असें सांगण्यास काका मुळींच तयार नव्हते. कायद्याच्या अभ्यासाकडे त्याचा स्वतःचा ओढा नव्हता.

काकांनीं चंदूला विचारलें, " भालू, तूं आतां पुढं काय करणार आहेस ? आजची लाट म्हणजे वकील होऊन स्वतंत्र धंदा करण्याची आहे. आज वकिलीची सनद म्हणजे सार्वजनिक चळवळींत पडण्याची सनद आहे असं म्हटलं तरी चालेल. तूं कोणता धंदा पत्करावा ह्याबद्दल जरी माझा आग्रह नसला तरी सार्वजनिक चळवळींत पडून तुझ्या हातून देशाची कांहीतरी सेवा घडावी अशी माझी इच्छा आहे. सरकारी नोकरी पत्करण्याची आज तुला कांहीं आवश्यकता नाहीं. कारण प्रपंचाचा भार आज तुझ्यावर बिलकुल नाहीं. तूं सरकारी नोकरींत पडूं नयेस असं माझं मत आहे. तुझं वय लहान आहे. अजून तुझ्या वयाचीं मुलं मॅट्रिकसुद्धां झालीं नाहींत. अजून दुसरा एखादा विषय घेऊन अभ्यास पुढं चालू ठेवणं तुझ्या मनांत असलं तर माझी त्यालाही पूर्ण सहानुभूति आहे."

" आतां बोलण्यास हरकत नाहीं. मी ह्याच शब्दाची वाट पहात होतों. ह्यापुढं मेडिकल कॉलेज जॉईन करावं असं माझ्या मनांत फार आहे आणि तो कोर्स घ्यायला तुमची संमत्ती असावी एवढंच माझं मागणं आहे." चन्दूनें उत्तर दिलें.

काकांनीं अर्थातच संमति दिली आणि चन्दूनें ग्रॅण्ट मेडिकल कॉलेजांत जावें असें ठरलें.

ह्या सर्व वाटाघाटीमुळें माझें स्वार्थी मन मात्र घोटाळ्यांत पडलें होतें. माझें पुढें काय होणार हा एकच प्रश्न माझ्यासमोर उभा राहिला होता. दुसऱ्याच्या

आधारावर राहिल्याखेरीज मला गत्यंतर नव्हतें पण तो आधार कसा मिळावा, कुठें मिळावा आणि कोणत्या प्रकारें मिळावा हाच काय तो प्रश्न होता.

मी माझ्या गोष्टीचा मनाशीं पुष्कळ विचार करूं लागलें. पुढें अभ्यास चालू ठेवायचा हा तर माझा निर्धार होता, पण जावें कुठें, हा प्रश्न तितकाच बिकट होता. चंदूच्या अभ्यासाचा पुढील कार्यक्रम ज्या दिवशीं ठरला त्या दिवशीं माझें मन अगदीं अस्वस्थ झालें होतें. त्या रात्रीं बिछान्यांत मी सारखी तळमळत पडलें होतें. माझ्या चरित्रांतील सारे प्रसंग माझ्या डोळ्यांपुढें एकामागून एक येऊन जात होते. पुढील आयुष्याची अंधुकशी कल्पना देखील मला करतां येईना. मी पुष्कळ विचार केला पण कुठेंच कांहीं मार्ग दिसेना.

माझें माहेर तर आतां नाहींसेंच झालें होतें. सासरचा मार्ग हळुहळू बंद होण्याच्या बेतांत आला होता. ताईच्या जिवावर मी किती दिवस काढायचे? तिच्यावर माझा काय अधिकार? माझ्यासाठीं तिनें कां झीज सोसावी? प्रत्यक्ष पाहूं गेलं तर अर्थाअर्थी तिचा माझा कांहींच लागाबांधा नव्हता. हें धर्माचें अन्न खाऊन मी रहावें काय? दुसऱ्याच्या दातृत्वावर मी पुढला अभ्यास करावा काय? —नाहींतर काय करावें?

कुठेंच कांहीं मार्ग दिसत नव्हता. ह्या अफाट जगांत मी एकटीच होतें. सत्तेनें माझें म्हणावें असें कुणीच नव्हतें. सत्तेनें माझी म्हणावी अशी संपत्तीही नव्हती. धर्माचे तुकडे खाऊन पोट भरण्याखेरीज मला गत्यंतर नव्हतें. अभिमानाला बळी पडून ताईची मदत नाकारली तर हात पसरण्यासाठीं दुसरी जागा तरी कोणती होती?

पुरुषाच्या जातीला पुष्कळ मार्ग मोकळे असतात. माधुकरी मागतां येते, वार लावतां येतात, दारोदार याचना करणेंही लाजिरवाणें नसतें. माझ्या दुर्दैवानें मी स्त्रीच्या जन्माला आलें खरी, पण पुरुषाची जबाबदारी माझ्यावर येऊन पडली होती.

विधवेचें जिणें किती चमत्कारिक! स्त्री असूनही स्त्रीपणाचा अधिकार नाहीं, कुठं कशावर सत्ता नाहीं, जबाबदारी पुरुषाची, पण जन्म मात्र नुसता स्त्रीचा! कुणाच्या आधाराशिवाय गत्यंतर नाहीं, पण आधार मात्र कुणाचाच नसतो! कुठें काडीची सत्ता नाहीं आणि गुलामगिरी मात्र सर्वांचीच! कुणी कसेंही वागवलें तरी तक्रार करायला जागा नाहीं. मन मोकळें करून कुणाशीं बोलेनं म्हटलें तर जिव्हाळ्याचें कुणीच नाहीं.

मॅट्रिक होऊन तरी मी पुढें काय करणार, हा प्रश्नही माझ्या मनांत आला. नोकरी करणार ? कुणाच्या जिवावर ? कुणाच्या आधारासाठीं ? नुसतें जगण्यासाठींच ना ? नुसती पोटाची खळगी भरण्यासाठींच ना ? प्रपंचाप्ती प्रपंच नाहीं आणि परमार्थाचें साधन नाहीं. काय हें जिणें ? ह्यापेक्षां मरण आलेलें देखील बरें !

अशा नाहीं नाहीं त्या विचारांनीं माझें मस्तक भणभणूं लागलें असतां एक विचार मनांत आला !

त्या विचाराचा मला उच्चार करवेना. अंतःकरणांतून त्या विचाराच्या स्फूर्तीचा उमाळा येत होता, पण त्याला वाव द्यावा असें वाटेना. मनावरचे संस्कार प्रबल होऊं लागले.

पुन्हां तोच शब्द !

माझ्या बरोबरीच्या मुलींचे संसार सुखासमाधानानें चालले होते, त्यांना मुलेंबाळें झालीं होतीं, संसारांत त्या अगदीं गढून गेल्या होत्या, मग मीच ह्या सुखाला कां मुकावें ?

मी परीक्षा पास झालें असतें, नोकरी केली असती, स्वतंत्रपणें चरितार्थ चालवला असता, पण मातृत्वाची उणीव कशी पुरी पडली असती ?

पुन्हां मनांत आलें. सर्व गोष्टी सुरळित असल्या तरीही हें भाग्य सर्वांनाच कुठें सारखें लाभतें ? ताईचा संसार सुखाचा आहे, पण ह्या भाग्याला तीही मुकली नाहीं का ?–मुलें झालीं पण जगलीं कुठें ? चन्दूला ती आपला मुलगाच समजून वागते ना ? मातृत्वाची आकांक्षा या लावून घेतलेल्या नात्यावरच ती तृप्त करून घेत आहे ना ? मला देखील ती मुलीच्या नात्यानेंच लेखते ना ? माझी आई मेली पण ताईच माझी आई असें मला देखील वाटतें ना ?

लावून घेतलेल्या नात्यांनीं जिवाची तहान भागते कीं नाहीं ? दुसऱ्याच्या मुलाला आपलें मूल म्हटल्यानें मुलाची उणीव भरून येते का ? जगांत कितीतरी अनाथ मुलें आहेत–मीही एक अनाथ मुलगी नव्हे का ? जगांतील अनाथ मुलांची अनाथ आई होणें मला संभवनीय आहे का ?

दोन प्रकारच्या दोन विचारांनीं माझें मन ओढ घेऊं लागलें–स्वतःच्या मुलांची आई व्हावें कीं परक्यांच्या मुलांना पाखर घालावी ?

दोनच मार्ग माझ्या समोर होते. ह्या दोन मार्गांतून कोणता तरी एक मार्ग पत्करणें मला भाग होतें. मग मी कोणता मार्ग पत्करूं ?

मन अगदीं कातावून गेलें, बुद्धी थकत चालली, अंतःकरणांत कालवाकालव सुरू झाली आणि त्या तशा स्थितींत मला झोंप लागली.

दुसऱ्या दिवशीं ताई, चन्दू व मी बसलों असतांना काका तिथें आले आणि म्हणाले, "चन्दूला बऱ्याच मुली सांगून आल्या आहेत. प्रत्येक जण अगदीं हातघाईवर आला आहे. एक गृहस्थ तर ह्या वेळीं बाहेरच येऊन बसले आहेत– कांहीं तरी उत्तर घेतल्याशिवाय जाणार नाहीं असं ते म्हणत आहेत. काय त्यांना उत्तर देऊं ?"

कुणीच कांहीं बोलेना. त्या वेळीं काका पुन्हां म्हणाले, "तुम्हीं सर्वांनीं तोंडं बंद केलीं, कीं माझी मुस्कुटदाबी होते हें तुमच्या लक्षांत येतं का ? मी आजपर्यंत तोंडानें जें बोलत आलों त्याचप्रमाणें वागण्याचा माझा निर्धार आहे. ह्या जन्माच्या गांठी आहेत. ह्या बाबतींत ज्याचं त्यानंच सावध राहिलं पाहिजे. मुलीची पसंती करण्याची जोखीम नवऱ्या मुलावर आहे, त्यांत वडील माणसांनीं हात घालूं नये असं माझं मत आहे. मग कसं काय भालू, मुलगी पहायला जातोस का ?"

चन्दू खालीं मान घालून स्वस्थ बसला. तें पाहून ताई म्हणाली, "आतां लाजायचे दिवस राहिले नाहींत. मी देखील दिवसेंदिवस थकत चाललें आहें. मलाही कुणीतरी हातकाठी पाहिजे आहे. चन्दूच्या डोक्यावर एकदां अक्षता पडलेल्या पाहिल्या म्हणजे माझ्या डोळयाचं सार्थक होईल. त्याचे एकदां दोहोंचे चार हात झाले म्हणजे मला मरायला मार्ग मोकळा होईल."

"मरणाच्या गोष्टी कशाला बोलतेस वहिनी ? अजून तुला कितीतरी सोहाळे पहायचे आहेत."

"ते सोहाळे पहायला आधीं तुझं लग्न झालं पाहिजे ना !" काका म्हणाले.

"मी आतांच लग्न केलं पाहिजे असा तुमचा आग्रह आहे का ?"

"तुला वीस वर्षं पुरीं झालीं आहेत. आणखी चार वर्षं थांबलास तरी माझी कांहीं हरकत नाहीं, पण परिस्थितीकडे लक्ष दिलं पाहिजे. नवराबायकोंत वयाचं फारसं अंतर असूं नये असं माझं मत आहे. दंपत्य समवयस्क असल्याशिवाय संसार सुखाचा होत नाहीं. आज तुझं लग्न झालं तर तें ज्या वयाच्या मुलींशीं होईल त्यापेक्षां चार वर्षं जास्त वयाची मुलगी तूं चार वर्षं थांबल्यानंतर तुला मिळेलच असं मला वाटत नाहीं. समज, आज तुझं लग्न झालं, तर जास्तींत जास्त तेरा वर्षांच्या मुलीशीं होईल. आपण असं समजूं, कीं फार तर चवदा

वर्षांची मुलगी मिळाली म्हणजे तिच्या आणि तुझ्या वयांत सहा ते सात वर्षांचं अंतर रहातं. आणखी चार वर्षांनीं लग्न केलंस तर हेंच अंतर दहा तें अकरा होईल. नवराबायकोच्या वयांत दहाअकरा वर्षांचं अंतर म्हणजे जमीन–अस्मानाच्या अंतराइतकंच होय. तुम्हीं मुलं पाश्चिमात्य संस्कृतीकडे पाहतां, प्रौढ मुलांचीं तिकडे लग्नं होतात म्हणून तुम्हींही मी अमुक वर्षांपर्यंत लग्न करणार नाहीं असं म्हणू लागतां, पण त्या देशांत तीस वर्षांच्या नवऱ्या मुलाला त्याच्याच वयाची नवरी मिळणं अशक्य नसतं. आपल्याकडे तो नियम लागू पडत नाहीं. आपल्याकडील मुलीच्या लग्नाची मर्यादा त्या देशाच्या तुलनेला यायला अजून शंभर वर्षांचा अवधि लागेल. ह्या सर्व गोष्टी ध्यानांत घे, ह्याच्यावर पूर्ण विचार कर आणि मग मला काय तें उत्तर दे." असें म्हणून काका निघून गेले.

"माझ्यासारख्या जुन्या मताच्या बायकोनं असं म्हटलं असतं तर तें तुला पटलं नसतं, पण आतां एका कट्टया सुधारकानं सांगितल्यावर तरी पटेल का?" ताईनें चंदूला विचारलें.

"हा वेळपावतों मी ह्या गोष्टीबद्दल विचारच केला नव्हता."

"जर मुळीं विचार केला नव्हता तर इतक्यांत लग्न करणार नाहीं असं परवां कां म्हणालास? केव्हां तरी लग्न करायचं आहे, पण तें इतक्यांत नव्हे, एवढा तरी विचार तूं केला आहेस ह्यांत शंका नाहीं. त्याचं उत्तर तुला आतां मिळालंच आहे. ह्या गोष्टीचा विचार करायचा असला तर हीच वेळ आहे." असें म्हणून ताईही निघून गेली.

मी आणि चन्दू दोघेंच तिथें राहिलों.

घटकाभर कुणीच कांहीं बोललें नाहीं. मला चमत्कारिक वाटून मी जाण्यासाठीं उठूं लागलें तेव्हां चन्दू म्हणाला,

"खालीं बैस, जाऊं नकोस–ह्या बाबतींत मला तुझा सल्ला घ्यायचा आहे."

चन्दूचें म्हणणें ऐकून मला हंसूं कोसळलें.

"असं हंसण्यावारी नेऊं नकोस! हा तसाच गंभीर विषय आहे. आतां सांग, मी आज लग्न करावं असं तुला वाटतं का?" चन्दूनें मला विचारलें.

"हा प्रश्न मला विचारणं म्हणजे भिंतीलाच विचारण्यासारखं आहे. माझं लग्न झालं होतं अशी मला अंधुकशी आठवण आहे एवढंच. माझं लग्न कां झालं तें

मला कळलं नाहीं. आतां मी विधवा झालें आहें असें म्हणतात, तेंही मला कळत नाहीं. मी मुलगी केव्हां होतें, पत्नी केव्हां झालें आणि विधवा कशी झालें ह्या तिन्हीही गोष्टींची मला जाणीव नाहीं. लग्न कां करतात तेंहि मला माहीत नाहीं. लग्न ह्या शब्दाबद्दल मला तिटकारा उत्पन्न झाला आहे. लग्न झाल्यामुळं मला दुसऱ्यांच्या घरीं जावं लागलं, लग्न झाल्यामुळंच कांहींच संबंध नाहीं अशा माणसांनीं माझ्या हालअपेष्टा केल्या आणि लग्न झाल्यामुळंच आज मी बिनवारशी होऊन बसलें आहें. माहेर नाहीं आणि सासर नाहीं अशी त्रिशंकूसारखी स्थिती लग्न झाल्यामुळंच मला प्राप्त झाली आहे आणि एवढं होऊनही असलं तें लग्न म्हणजे काय, हें ह्या वेळपावेतों मला मुळींच कळलं नाहीं—ह्यापुढं कळणारही नाहीं. मग त्याबद्दल मी तुला सल्ला काय देऊं? ज्यांनीं लग्नाचा अनुभव घेतला असेल, ज्यांनीं प्रपंच साधला असेल, ज्यांनीं लग्नाचीं सुखदुःखं भोगलीं असतील त्यांनाच हा प्रश्न विचार. असा भलताच प्रश्न मला बालविधवेला विचारून माझ्या दुःखावर डागण्या देऊं नकोस."

बोलतां बोलतां माझा स्वर कठोर होत चालला आहे हें माझ्या ध्यानांत येत होतें, पण तो कठोरपणा मला आवरतां येत नव्हता.

माझें भाषण ऐकून चंदू अगदीं ओशाळून गेला आणि म्हणाला,

"क्षमा कर, माझी चूक झाली. माझ्या सुखावरच मी नजर ठेवली. तुझ्या दुःखाचा विचार माझ्या ध्यानांत आला नाहीं—" एवढेंच बोलून तो उठून निघून गेला.

माझ्या भाषणानें चंदूच्या मनाला धक्का बसला असेल अशी माझी कल्पना होऊन माझें मलाच वाईट वाटलें. पण माझा तरी त्याला काय इलाज होता?

चन्दूनें आज लग्न करावें कीं करूं नये हें मी कसें सांगणार होतें? त्यानें मला विचारलें तें मनःपूर्वक विचारलें कीं मी नुसती तिथें होतें म्हणूनच विचारलें?

चन्दू समंजस होता. उगीच कांहींतरी तोंडाला येईल तें बोलणारा नव्हता.

काकांनीं सांगितलेले मुद्दे माझ्या पोरबुद्धीलाही अगदीं सयुक्तिक वाटले होते. सरळ उत्तर द्यायचें म्हणजे काकांचें म्हणणें योग्य आहे असेंच मी सांगायला पाहिजे होतें. मग मी तशी कां बडबडत सुटलें? निष्कारण अशी टाकून कां बोललें हें माझें मलाच कळेना.

चंदूच्या लग्नाची गोष्ट निघाल्यापासून मी अंतर्यामीं पाहूं लागलें तों माझें मलाच वाईट वाटूं लागलें. चन्दूचें आतां लग्न होणार, कुणीतरी अनोळखी मुलगी येऊन चंदूवर आपली सत्ता सांगू लागणार, ही कल्पना मला दुःसह वाटली—ती कां ?

जन्माच्या गांठी बांधायच्या त्या अशा अनोळखी माणसाशीं का बांधतात ?

ओळखीओळखींच्या माणसांत लग्नें जुळवतां यायचीं नाहींत का, असा एक विलक्षण प्रश्न माझ्या मनांत आला.

पुन्हां असें वाटलें, हा प्रश्न विलक्षण कां ? बनीचें गोविंदाशीं नाहीं का लग्न झालें ? चन्दूच्या ओळखीची किंवा बरोबरीची ह्या गांवांत कुणी मुलगी नाहीं का ? काकांना ह्या गोष्टीची माहिती असलीच पाहिजे, मग बाहेरगांवच्या मुलींशीं लग्न जुळवण्याचा हा खटाटोप कां ? गांवांतल्या मुली चन्दूला अनुरूप नाहींत असें तर ह्यांना वाटत नाहीं ?

मुलगी परगांवची असली म्हणजे अर्थातच तिच्याबद्दल कांहीं माहिती नसते. नुसती दिसायला कशी आहे एवढेंच काय तें पहायचें किंवा कुणी ओळखीचीं माणसें तिच्याबद्दल ज्या कांहीं खऱ्याखोट्या गोष्टी सांगतील त्यांच्यावर विश्वास ठेवायचा. शेजारच्या मुलींचे गुणावगुण आपणांस माहित असतात, पण तिला टाकून तितकीच गुणी किंवा अवगुणी मुलगी आपण परगांवांतून शोधून आणतों. दृष्टीआड सृष्टी असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं.

मी ताईला विचालें, " ह्याच गांवांत चंदूला योग्य अशी मुलगी तुमच्या पहाण्यांत नाहीं का ? "

" आहे—पण काय उपयोग ? त्यांनीं मागणी घातली पाहिजे ना ? तुमची मुलगी आम्हांला द्या, अशी आपण होऊन मागणी घालणं लाजिरवाणं आहे. "

" कां लाजिरवाणं आहे ? आपल्या माणसाचं सुख आपण नको का पहायला ? त्याच्या सुखासाठीं घटकाभर आपण कमीपणा पत्करला तर त्यांत काय बिघडतं ? "

" आजपर्यन्त जें कुणी केलं नाहीं तें करणं जिवावर येतं. आम्हीं ह्या गांवचे खोत आहोंत—एका परीनं आम्हीं ह्या गांवचे राजेच आहोंत म्हणेनास. आम्हीं होऊन आमच्या आश्रितांच्या मुलीला मागणी घातली तर त्यांना देखील तें चमत्कारिक वाटेल. जगाच्या दृष्टीनं तीं आमच्या तोलाचीं माणसं नाहींत. आम्हीं

आमची पायरी सोडून खालीं उतरूं लागलों तर गांवच्या लोकांवर आमचं वजन रहाणार नाहीं. "

ताईचें उत्तर मला पटलें नाहीं.

मी कांहींच न बोलतां स्तब्ध राहिलें—असें पाहून ताई म्हणाली,

" माझं बोलणं तुला पटलं नाहींसं दिसतं. "

" अगदीं मुळींच पटलं नाहीं. नुसत्या वरवर दिसणाऱ्या लहानमोठेपणाच्या वरिष्ठकनिष्ट अशा नात्याच्या लंगड्या सबबीवर एका जिवाच्या जन्माचं कायमचं मातेरं होऊं द्यावं, हा माणूसपणा झाला का ? "

मी स्पष्टच विचारलें. माझें हें उत्तर ऐकतांच ताई डोळे फाडून माझ्याकडे पहात राहिली. ह्यापूर्वीं मी कधींच तिला अशी टाकून बोललें नव्हतें. म्हणून मी म्हटलें, " कमीजास्त शब्द माझ्या तोंडून गेला असला तर त्याची मला क्षमा कर ताई. अविचारानं जुळवलेल्या लग्नाचं फळ मी भोगीत आहें. दुसऱ्या कुणावरही तसा प्रसंग येऊं नये असंच मला सदोदित वाटत असतं. "

ताई स्वस्थ बसली. तिनें मला कांहींच उत्तर दिलें नाहीं.

मी पुन्हां म्हटलें, " ताई, एकंदरींत तूं माझ्यावर बरीच रागावलेली दिसतेस. वास्तविक पाहिलं तर चंदूच्या कल्याणाची काळजी माझ्यापेक्षां तुम्हां उभयतांनाच जास्त असणार !—मी काय, आज आलें, उद्यां गेलें, बोललेलं तेवढं मागं राहून जाणार. मी कांहीं बोललें हेंच मुळीं विसरून जा म्हणजे झालं. "

ताई अगदीं शांतपणें म्हणाली, " तुझं बोलणं गैर होतं असं तुला आतां वाटतं का ? "

मी एकदम म्हणलें, " मुळींच नाहीं. जें मला वाटलं तें मी स्पष्टपणानं बोलून दाखवलं. माझ्या मताप्रमाणें त्यांत गैर कांहींच नाहीं. तुला गैर वाटत असेल तर त्याला माझा नाइलाज आहे. "

ताई हळुहळु हंसूं लागली. तिच्या हंसण्याचें मला आश्चर्य वाटलें. ती माझ्याकडे पहात नुसती हंसत होती आणि मी निर्विकार चेहऱ्यानें तिच्याकडे पहात होतें.

क्षणभरानें ती म्हणाली, " एवढे मोठे विचार तुझ्या ह्या लहानशा डोक्यांत येतात तरी कसे ह्याचं मला आश्चर्य वाटतं. मी एवढी विचारी आहें पण मला

देखील हें कधीं सुचलं नाहीं. विचार करून पाहिलं म्हणजे असं वाटतं, कीं तुझ्या म्हणण्यांत पुष्कळ तथ्य आहे. खोट्या मानासाठीं आपण मरतों आहोंत ह्यांत कांहीं शंका नाहीं. तुझ्या सूचनेचा मी कांहींतरी उपयोग केल्यावांचून रहाणार नाहीं."

आम्हीं अशीं बोलत असतां चन्दू तिथें आला. ताईनें माझें भाषण त्याला इत्थंभूत सांगितलें. तें ऐकतांच तो म्हणाला,

"हें आश्चर्यच म्हणायचं. मी हिला विचारलं त्या वेळीं तिनं अगदीं तोडून उत्तर दिलं मला आणि तुझ्याकडे मात्र माझी इतकी कळकळ धरून बोलते आहे ! ह्या दोहोंचा मेळ कसा घालायचा हेंच मला कळत नाहीं."

ताई नुसती हंसली आणि म्हणाली, "हीच तर मोठी गम्मत आहे ! ह्या गंमतीचा उलगडा करतां आला म्हणजे सारीं कोडीं आपोआप उलगडतील."

"तुझं हें बोलणं मला जास्तच घोटाळ्यांत पाडतं आहे. मला शोभण्याजोगी ह्या गांवांतली कोणती मुलगी तूं पाहून ठेवली आहेस ?"

"ह्या गांवांतल्या लग्नाच्या वयाच्या सर्व मुली तुला शोभण्याजोग्या आहेत. त्यांतली कोणती तुला पसंत पडते तेवढं आम्हांला सांग म्हणजे झालं."

चन्दू गंभीरपणाचा उसना आव आणून म्हणाला, "ठीक आहे. उद्यां प्रत्येक घरीं जाऊन प्रत्येकाच्या मुली पाहून येतों. पण कुणी दाखवायलाच तयार नसला तर ?"

"तर तुझं नशिब !"

"माझं नशिब काय आहे तें मला माहीत आहे. तूं ह्या गांवांतलीही मुलगी पाहूं नकोस आणि परगांवांतलीही पाहूं नकोस. इतक्यांतच लग्न करावं कीं नाहीं हें अजून मला निश्चित ठरवतां येत नाहीं." असें म्हणून चन्दू एकदम निघून गेला.

त्याच्या बोलण्याचें धोरण आम्हां दोघींनांही कळलें नाहीं. तो असें कां बोलला ह्याबद्दल आम्हीं पुष्कळ चर्चा केली, पण त्यांतून कांहींच निष्पन्न झालें नाहीं.

रात्रीं जेवणाच्या वेळीं काकांनीं चन्दूला पुन्हां विचारलें, "कायरे भाळू, काय ठरला तुझा निश्चय ? ते गृहस्थ आतांच इतक्यांत येणार आहेत. त्यांना कांहीं तरी उत्तर दिलं पाहिजे. मुलीला तेरा वर्षं पुरीं झालीं आहेत. एवढी वाढलेली मुलगी हल्लींच्या काळीं मिळणं कठीण. नाकाडोळ्यांनीं, रंगारूपानेंही चांगली आहे असं चौकशी अंतीं मला कळलं. थोडी शिकलेलीही आहे. एकदां जाऊन पाहून येईनास ?"

" मला सध्यां लग्न कर्तव्य नाहीं. " चंदू खालीं मान घालूनच बोलला.

" लग्नाची गोष्ट ठरवायला तुझा तूं मुखत्यार आहेस. त्या बाबतींत मी आग्रह करणार नाहीं किंवा सक्तीही करणार नाहीं, पण मला मन मोकळं करून सांग, मी अगदीं तुझ्या बरोबरीचा एक मित्र आहें असं समजून सांग, कीं सध्या लग्न करूं नये असं तुला कां वाटतं ? "

चन्दू कांपऱ्या स्वरानें म्हणाला, " मी माझं मन अजमावित आहें. अपरिचित मुलीशीं लग्न झाल्यानं मला सुखाबद्दल साशंक रहावं लागेल. त्या तसल्या जुगारांत पडणं मला योग्य वाटत नाहीं. परिचित मुलींतून मला निवड करायची आहे —त्यासाठीं मला थोडा अवधि द्या. "

" ठीक आहे. असं असेल तर माझी कांहींच हरकत नाहीं. "

एवढ्यावरच तो विषय संपला.

माझ्या अभ्यासाची आबाळ होऊं नये म्हणून काका खबरदारी घेत असत. चन्दू आल्यापासून त्यांनीं मला शिकवण्याचें काम त्याच्यावर सोंपवलें होतें, त्याप्रमाणेंच दररोज तो माझे धडे घेत असे. त्याची शिकवण्याची हातोटी फारच उत्तम होती. भूगोल हा विषय किती कंटाळवाणा, पण शिकवतांना तो देखील त्यानें मनोरंजक करावा. इतिहासाचे धडे घेतांना त्यानें मला कितीतरी नवीनवी माहिती सांगितली. गणित विषय तर त्याचा हातखंडाच होता. तोच विषय घेऊन तो बी. ए. झाला होता. संस्कृत शिकण्याची मला फारशी जरूरी नव्हती. उलट मीच त्याला संस्कृत शिकवलें असतें. म्हणजे त्याचें संस्कृत कच्चें होतें असें नव्हे, पण जुन्या आणि नव्या अशा दोन्ही पद्धतींनीं माझा संस्कृतचा अभ्यास झालेला असल्यामुळें संस्कृतांत मी चांगलीच निष्णात झालें होतें, आणि चंदूही वारंवार तसेंच म्हणे.

एके दिवशीं चन्दूनें एक क्लृप्ति काढली. रात्रीं जेवणखाण आटोपल्यावर तो काकांना म्हणाला, " मला एक प्रयोग करून पहायचा आहे. तुम्हांला तो रुचतो कीं काय पहा. मथूनं भागवताची पोथी घेऊन त्यावरून आज आपल्याला पुराण ऐकवावं. "

सर्वांनाच ही योजना पसंत पडली. काकांनीं स्वतः भागवताची पोथी आणली आणि त्यांतील एक अध्याय काढून माझ्यापुढें ठेवला. पुराणिकबुवांनाही आमंत्रण

देण्यांत आलें. घरची बहुतेक सर्व मंडळी आणि शेजारघरचीही कांहीं मंडळी मुद्दाम बोलावून आणली. पाट, चौरंग, समई ठेवून अगदीं थेट पुराणिकबुवाचाच थाट सजवला होता.

काका माझ्याकडे पाहून म्हणाले, "या मथूशास्त्री, आतां उशीर लावूं नका. मंडळी आपल्यासाठीं तिष्ठत बसली आहे."

माझ्या उरांत धडकी भरली. पाय लटलट कापूं लागले. कशीबशी जाऊन मी व्यासपीठावर बसलें आणि "स जयति सिन्दुरवदनः" म्हणून बाबांप्रमाणें पुराणाला सुरवात केली. बाबा संहिता वाचून नुसता श्लोकाचा अर्थ सांगत असत, पण मी अर्थ सांगूं लागलें असतां त्याचा विस्तार मला आपोआप सुचूं लागला. मी स्पष्टीकरण करूं लागलें आणि त्यामुळें पुराण अगदीं रंगांत आलें. सर्वांना तो प्रकार जसा अगदीं नवीन होता तसा मलाही नवीनच होता. मला तो कसा सुचला हें माझें मलाच कळलें नाहीं. ती पुरञ्जन राजाची कथा होती. सांगतां सांगतां मला नवीन नवीन व्याख्या आपोआप सुचूं लागल्या आणि मी स्फूर्तीच्या भरांत बेफामपणें बोलत सुटलें.

सुमारें तासभर पुराण झालें. काका म्हणाले,

"शास्त्रीबुवांनीं आज कमाल केली. पुराणाची अगदीं नवीन पद्धत शोधून काढली."

पुराणिकबुवा म्हणाले, "पुण्याचीं व्याख्यानं ऐकल्याचा हा परिणाम !"

मी म्हटलें, "पुण्याला मी कधीं कुठलंही व्याख्यान कीं पुराण ऐकलं नाहीं."

पुराणिकबुवा म्हणाले, "असेल, असेल, पण ही पुराणाची पद्धती नव्हे. असं पुराण सांगूं लागलं तर एकटं भागवत संपायला दहा वर्षं लागतील. एक तासभर पुराण झालं, पण दहासुद्धां श्लोक झाले नाहींत."

शेजारचे एक वृद्ध गृहस्थ म्हणाले, "कांहीं म्हणा पुराणिकबुवा, पण तुमच्या ठराविक सांच्याच्या पुराणापेक्षां आजचं पुराण कांहीं और झालं. भास्कररावजी, माझी एक सूचना आहे, उद्यां रामाच्या देवालयांत मथूताईचं पुराण करवूं या."

सर्वांनाच ही कल्पना रुचली आणि सर्वानुमतें दुसऱ्या दिवशीं देवालयांत माझें पुराण व्हायचें ठरलें.

सर्व मंडळी निघून गेल्यावर चन्दू ताईला म्हणाला,

"कसा लावला शोध ? मला वाटलंच होतं, कीं मथूशास्त्र्यांची विद्वत्ता अलौकिक आहे. आज खरोखरच सर्वांना तिनं थक्क करून सोडलं. मी एवढा एल्फिन्स्टन कॉलेजचा बी. ए., पण तोही अगदीं स्तम्भित झालों. आज मथूनं अगदीं नवा शोध लावला. पुराणाची नवीन पद्धत आपल्याला अनायासें कळली."

"मथू, ह्यापूर्वी तूं असं पुराण कधीं सांगितलं होतंस का ?" काकांनीं विचारलें.

मी लाजून मान खालीं घातली. चन्दू म्हणाला,

"एवढे मोठे शास्त्री, पण एका शब्दानं असं लाजतात हें पाहून आम्हांला मोठं आश्चर्य वाटतं."

ताई म्हणाली, "कशाला उगीच तिला लाजवतोस ? मी सांगतें, ह्यापूर्वी तिनं कधींच पुराण सांगितलं नव्हतं."

"तर मग माझी धन्य आहे म्हणायची. आज मी अजब शोध लावला. कोलंबसाहूनही आज मी मोठा झालों."

काका म्हणाले, "उद्यांचा प्रसंग कसा निभावतो तें पाह्यचं आहे आतां ! मथू, पोथी घेऊन उद्यां ती थोडी पाहून ठेव. सहज स्फूर्तिनं जर इतकं बोलतां आलं तर थोडा विचार करून ठेवल्यास ह्यापेक्षां व्याख्या विस्तृत करतां येईल."

त्या दिवशीं माझें मलाच आश्चर्य वाटलें. ही नवीन स्फूर्ति मला कुठून झाली ह्याचा मलाच उलगडा होईना. जरी त्या पुराणानें मला आत्मविश्वास उत्पन्न झाला होता, तरी उद्यांच्या सार्वजनिक पुराणाच्या वेळीं काय होईल त्याची मला भीति वाटत होतीच.

दुसऱ्या दिवशीं गांवच्या महाराला पाठवून पुराणाची वर्दी सगळीकडे देण्यांत आली.

बातमी आधींच जिकडे तिकडे पसरली होती. विधवा असून कुंकूं लावीत असल्याबद्दल आधींच सर्व ठिकाणीं माझ्या नांवाचा बभ्रा झाला होता, ती मीच आतां पुराण सांगणार हें ऐकून निरनिराळ्या प्रकारचे कुतर्क सुरू झाले. त्या दिवशीं देवालयाचा एवढा मोठा मंडप श्रोत्यांनीं चिकार भरून गेला होता. मंडपाच्या बाहेरही लोकांची बेसुमार गर्दी झाली होती. बायकांनीं देवळाचा गाभारा भरून टाकून सभामंडपांतील कांहीं भागाचा देखील ताबा घेतला होता. आम्हीं निघण्यापूर्वींच ही बातमी घरीं येऊन थडकली. आमच्या पुराणिकबुवांनीं

इतक्या दिवसांनीं तोंड उघडलें. ते म्हणाले, "विधवेनं कुंकूं लावून देवालयांत प्रवेश करणं शास्त्रसंमत नाहीं. हा देवाचा अपमान आहे."

ताई म्हणाली, "तें आतां देवच ठरवो. देवाला तें रुचत नसेल तर देव तिला शिक्षा करील. ही परीक्षेचीच वेळ आहे!"

देवळांत जाण्यापूर्वी ताईनें माझ्या कपाळाला तीट लावली.

मी देवळांत गेलें त्या वेळीं तो विलक्षण लोकसमुदाय पाहून माझी अगदीं घाबरगुंडी उडाली. माझ्या घशाला अगदीं कोरड पडली होती. मी देवाला नमस्कार केला आणि कशीबशी व्यासपीठावर जाऊन बसलें. बसल्यानंतर एक क्षणभर मी सगळीकडे नजर फिरवली. माझी कुचाळी करण्याकरतां बरीचशी मंडळी जमली असावी असें पुष्कळांच्या मुद्रेवरून मला वाटलें. मोठमोठी वयोवृद्ध मंडळी व्यासपीठाला घेरा देऊन जेठा मारून बसली होती. माझ्या सर्वांगाला दरदरून घाम सुटला.

मी मनांतल्या मनांत आई जगदंबेचें स्मरण केलें आणि पुराणाला सुरवात केली. इतक्यांत चन्दू घाईघाईनें माझ्या बाजूला आला आणि एक पुडी माझ्या शेजारी आणून ठेवून माझ्या कानाशीं हळूच म्हणाला, "खडीसाखर लवंगा."

त्या दिवशीं माझ्या जिव्हेवर सरस्वति नुसती नाचत होती. मला अद्वितीय स्फुरण चढलें होतें आणि मी निःशंकपणें घडाघड बोलूं लागलें होतें. पहिल्यानें श्रोतृवर्गांत थोडी कुचाळीची लाट उठल्यासारखी दिसत होती, पण थोड्याच वेळांत सर्वत्र शांतता पसरली. माझ्या भाषणाचा ओघ अप्रतिबंध चालू होता. लहानपणापासून बाबांच्या सहवासानें कानीं पडलेले ठिकठिकाणचे आधार निरूपणाच्या भरांत मी मधूनमधून देत होतें, त्या वेळीं वृद्ध मंडळीच्या तोंडून 'वाहवा वाहवा' असे उद्गार सारखे निघत होते. सर्व बायका चित्रासारख्या तटस्थ बसल्या होत्या.

सुमारें दीड तास पुराण झालें. पुराण संपतांच सर्वांनीं येऊन माझ्या पाया पडण्याची एकच गर्दी केली. मी पाय चुकवून दूर होऊं लागलें त्या वेळीं एक वृद्ध गृहस्थ म्हणाले, "बैस मुली, उठूं नकोस—हा गादीचा मान आहे." नारळ, तांदूळ, सुपाऱ्या आणि पैसे ह्यांची चौरंगासमोर एकच रास झाली. पुरुषमंडळी दूर झाल्यावर बायकामंडळी पुढें सरसावली. एक वृद्ध बाई मला नमस्कार करायला पुढें झाली असतां तिच्या शेजारची बाई म्हणाली, "सत्यंकाकू,

काय हें ? ती विधवा आहे आणि कुंकूं लावते आणि ह्या असल्या पोरीला तुम्हीं नमस्कार करणार ?" माझ्या पायावर अगदीं डोकें ठेवून नमस्कार करून ती बाई म्हणाली, "नुसतं कुंकूंच कां, कपाळभर मळवट भरला तिनं तरी शोभेल. अग मला तर ती प्रत्यक्ष देवीचा अवतार वाटते. साऱ्या जन्मांत कधीं असलं पुराण ऐकलं होतंस ? तिला नांवं ठेवशील तर तुझ्या तोंडाला किडे पडतील."

जवळच असलेल्या पुराणिकबोवांना काका म्हणाले, "पुराणिकबुवा, ऐका !"

सत्यभामाबाईच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच सर्व बायकांनीं माझ्या पाया पडण्याची एकच गर्दी केली. सत्यभामाबाई म्हणजे मुलखाची कजाग बायको, सज्जनांना देखील नांवें ठेवायची, तीच असें बोलूं लागल्यावर मग इतरांची काय कथा ? कित्येकींनीं तर मला कडकडून घट्ट आलिंगनें दिलीं.

माझ्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा वहात होत्या. मी व्यासपीठावरून खालीं उतरलें आणि सभामंडपांतून देवाच्या गाभाऱ्याकडे जायला निघालें. सभामंडपांत जमलेल्या लोकांनीं दोन्ही बाजूला मार्ग सरून मला रस्ता दिला. काका, ताई, पुराणिकबुवा आणि चंदू हे माझ्या मागोमाग येत होते. मला गाभाऱ्यांत जायला कदाचित अडथळा केला जाईल अशी त्यांना शंका आली होती असें नंतर त्यांनीं मला सांगितलें. मी तडक गाभाऱ्यांत गेलें आणि देवाच्या पायावर मस्तक ठेवलें.

देवाच्या मस्तकावरील एक फूल माझ्या मस्तकावर पडलें. मी तें उचलून पदरांत घेतलें. जवळच उभा असलेला वृद्ध पुजारी म्हणाला, "देवानंच कौल दिला ! मुली, आतां तूं खुशाल कुंकूं लाव."

मी देवळाच्या आवाराबाहेर पडलें त्यावेळीं शूद्र लोकांची ही गर्दी झाली होती. सर्वजण येऊन माझ्या पाया पडत होते. माझा जीव अगदीं शरमिंदा होऊन गेला. तशीच त्या गर्दीतून मी पुढें निघालें आणि मोठ्या कष्टानें येऊन घरीं पोंचलें. सर्व जातींचा जनसमुदाय माझ्या मागोमाग येत होता ह्या जाणिवेनें माझ्या हृदयांत एक विलक्षण भावनेची ज्योति प्रादुर्भूत झाली होती. मी घरीं येऊन पोहोंचतांच सर्व मंडळी निघून गेली.

मी घरांत आल्यावर ताईनें माझी दृष्ट काढली. तें पाहून चन्दू हंसूं लागला. चंदू ताईला म्हणाला, "अगदीं कुक्कुलं बाळच आहे कीं नाहीं दृष्ट काढते आहेस तिची ती !"

"तुला प्रसंगाचं महत्त्व कळत नाहीं." ताईनें उत्तर दिलें.

माझ्या समोर पडलेल्या तांदूळपैशांची रास गोळा करून पुराणिकबुवा घेऊन आले होते ते मला म्हणाले, " ह्याचं काय करायचं ? " मी ती पुरचुंडी हातीं घेतली आणि बाकीच्या मोटल्या घेऊन पुराणिकबुवांना बाहेर यायला सांगितलें आणि बाहेर गोळा झालेल्या शूद्रमंडळींत ते सर्व जिन्नस मी वांटून टाकले.

घरांत आल्यावर मला अगदीं चमत्कारिक वाटलें. काका माझ्याकडे सारखे पहात राहिले होते. मी त्यांच्या पायांवर मस्तक ठेवलें आणि नमस्कार केला. डोळ्यांतून सारख्या अश्रूधारा चालल्या होत्या. ते म्हणाले, " आज तुझ्या वैधव्याचं सार्थक झालं. बेचाळीस पूर्वजांचा आज उद्धार झाला. हेंच व्रत चालू ठेव म्हणजे ईश्वर तुझं कल्याण करील ! " मी तसाच ताईलाही नमस्कार केला. ताईनें माझ्या तोंडावरून हात फिरवून बोटें मोडलीं. गहिंवरामुळें तिच्या तोंडून एक शब्दही बाहेर निघेना. माझें हृदय देखील भरून आलें होतें.

चंदू जवळच उभा होता—त्याच्याकडे पाहून ताई म्हणाली,

" आजच्या आनंदाचं सर्व श्रेय चंदूला आहे. "

कर्णोपकर्णीं ही हकीकत बाबांच्या कानीं जाऊन पोंचली आणि एके दिवशीं सकाळीं ते आमच्या समोर दत्त म्हणून उभे राहिले.

बाबा आलेले पहातांच काकांना फार आश्चर्य वाटलें. कुणीच कुणाशीं कांहीं बोलेनात. शेवटीं बाबांनींच बोलायला सुरवात केली. बाबा म्हणाले, "माझ्या शिक्षणाचं सार्थक झालं. माझ्या मुलीनं माझं तोंड उजळ केलं. साऱ्या पंचक्रोशींत तिच्या पुराणाची वाहवा होते आहे! काय हो भास्करराव, तिनं असं पुराण तरी काय सांगितलं ?"

"तिचं पुराण खरोखर अपूर्व होतं. ती नुसती संहिता वाचून अर्थ सांगत नव्हती—तर ठिकठिकाणचे आधार देऊन मूळ विषयाचा व्याख्यानरूपानं विस्तार करीत होती. आजपर्यंत पुराणांची ही पद्धत कुणाच्या ऐकिवांतही नसेल! हें पुराण नव्हतं, प्रवचन होतं असं म्हटलं तरी चालेल."

"तर मग तिला गांवीं घेऊन गेलंच पाहिजे. एकदां आमच्या गांवांत तिचं पुराण झालंच पाहिजे."

"तिला तुम्ही पाहिलीत का ?"

बाबांनीं अर्थातच 'नाहीं' म्हटलें.

काकांनीं मला हांक मारली आणि मी बाहेर येऊन बाबांना नमस्कार केला. माझ्या पाठीवरून हात फिरवून त्यांनीं 'आयुष्मान् भव' असा मला आशीर्वाद दिला. मी उभी रहातांच त्यांची नजर माझ्या चेहऱ्याकडे गेली. तोंड वासून ते सारखे माझ्याकडे पहातच राहिले.

काका गालांतल्या गालांत हंसत होते. बाबा काकांकडे वळून म्हणाले,

"ह्याचा अर्थ काय ?"

"कशाचा ?"

"आणखी स्पष्टपणें काय बोलूं? अभद्र शब्द माझ्या तोंडानं उच्चारवत नाहींत."

मुद्दाम न समजल्यासारखें करून काका म्हणाले, "कोणते अभद्र शब्द ?"

बाबांनीं मान खालीं घातली. बाबा बोलत नाहींत असें पाहून काकांनीं पुन्हां विचारलें, "कोणते अभद्र शब्द ?"

बाबा एक दीर्घ निश्वास टाकून म्हणाले, " माझ्या हातानं मी हिला सुधारकाच्या घरीं पाठवून दिली त्याच वेळीं मला कळायला पाहिजे होतं. त्यावेळीं माझी बुद्धी भ्रष्ट झाली, आतां डोळे उघडून काय उपयोग? एवढी गुणी मुलगी, पण सुधारकांच्या संगतीनं फुकट गेली!"

" सुधारकांच्या संगतीनं काय झालं?"

बाबा रागानें दांतओंठ खाऊन म्हणाले, " काय झालं? काय झालं म्हणून आणखी तोंड वर करून विचारतां? माझं कूळ बुडवलंत, माझ्या तोंडाला काळोखी फांसलीत, नरकाचा मार्ग मला मोकळा करून ठेवलात आणि वर काय झालं म्हणून आणखी मला विचारतां?"

काका मोठमोठ्यानें हंसू लागले, तेव्हां बाबा अधिकच संतापून म्हणाले,

" माझ्या पोरीचा गळा कापलात आणि वर हंसायला लाज वाटत नाहीं!"

काकांनीं गंभीरपणानें उत्तर दिलें, " कुणी पोरीचा गळा कापला? म्हाताऱ्यांशीं लग्न लावल्यानं पोटच्या पोरीला वैधव्य आल्याचं दिसत असूनही दुसऱ्या एका पोरीशीं लग्न करणाऱ्या म्हाताऱ्यानं माझी लाज काढावी, असा कोणता गुन्हा मी केला आहे?"

" माझ्या पोरीचा पुनर्विवाह लावलात?"

बाबांचें वाक्य संपण्यापूर्वींच काका मोठमोठ्यानें हंसत सुटले.

काकांचें हंसणें पाहून बाबा अधिकच चवताळले आणि म्हणाले,

" पुनर्विवाह नाहीं झाला? मग हिच्या कपाळीं कुंकूं कां?"

काकांनीं पुराणिकबुवांना हांक मारली. पुराणिकबुवा येतांच काका त्यांना म्हणाले, " देवळांतली हकीकत शास्त्रीबुवांना सांगा."

हकीगत सांगण्यासाठीं पुराणिकबुवा पुढें सरसावतांच मी तिथून निघून घरांत आलें. माझ्या मनाची मोठी चमत्कारिक स्थिति झाली होती.

पुन्हां तोच शब्द!

आतां माझ्यानें रहावेना. मी ताईकडे गेलें आणि झालेली हकीकत तिला सांगितली. ती ऐकतांच ताईला पहिल्यानें हंसूं आलें, पण थोड्या वेळांत ती गंभीर झाली.

" त्या शब्दाचा अर्थ सांगण्याचा आतां तरी काल आला का ? " मी ताईला विचारलें.

ताई कांहींच बोलना. माझें मस्तक सारखें भणभणत होतें. बाबांचे शब्द आठवून मला मरणप्राय दुःख झालें होतें. कपाळीं कुंकूं लावण्याचा आणि पुनर्विवाहाचा कांहींतरी निकट संबंध आहे, हें मला कळून चुकलें. ' पुनर्विवाह ' ह्या शब्दांचा अर्थ मला कळणें अशक्य नव्हतें, पण त्या शब्दामागें असलेले लोकांचे समज, रूढाचार आणि सार्वजनिक भावना मला माहीत नव्हत्या, म्हणूनच त्या कळण्याची जिज्ञासा मला अनावर झाली होती.

ताई बोलत नाहीं असें पाहून मी तिला पुन्हां विचारलें,

" ह्या विषयावर बोलायचंच नाहीं असा तूं निश्चय तर केला नाहींस ना ? "

" तें त्यांनाच विचार. ह्या विषयावर बोलायचा अधिकार तिकडेसच आहे."

इतक्यांत चन्द्रू तिथें आला तेव्हां मी त्याला म्हटलें,

" बाबा काय म्हणाले ते एकलंस का ? "

चन्दू गंभीरपणें म्हणाला " होय ऐकलं."

" पूर्वीचं वचन तुला आठवतं का ? त्या शब्दाचा अर्थ मला केव्हां सांगणार आहेस तूं ? "

चन्दू हंसत म्हणाला, " एवढं अलौकिक पुराण सांगतां येतं आणि एवढ्याशा शब्दचा अर्थ कळत नाहीं ? मोठी आश्चर्याची गोष्ट आहे बुवा ! "

चन्दूच्या ह्या थट्टेचा मला राग आला. वेळप्रसंग समजूं नये म्हणजे काय ? मी रागानें म्हटलें, " थट्टेवारी नेण्याजोगा हा विषय नाहीं. सांगायचं असलं तर स्पष्टपणें सांग, नाहींतर ' नाहीं ' म्हणून म्हण."

चन्दू ताईकडे वळून म्हणाला, " त्या दिवशीं मी जेवतांना बोललों होतों तें आठवतं का ? माझी निवड ठरली. मी लग्नाला तयार आहें." इतकेंच बोलून चन्दू तेथून एकाएकीं निघून गेला.

चंदूचे ते शब्द ऐकून ताई दचकली. क्षणभर तिनें माझ्याकडे पाहिलें—आणि तीही दुसऱ्या दारानें तिथून निघून गेली. त्या दोघांच्या ह्या वर्तनाचा अर्थ मला कांहींच कळेना.

इतक्यांत काका आंत आले आणि मला म्हणाले, " शास्त्रीबुवा त्रागा करून निघून गेले. मी 'जेवून जा' म्हणून सांगत होतों पण तेंही त्यांनीं ऐकलं नाहीं."

" तुम्हांला कांहीं टाकून बोलले का ?"

" दुसराच एक विषय निघाला होता आणि त्यांत त्यांचा माझा मतभेद झाला. विषय तुझ्यासंबंधींच होता, पण तो पूर्वींचा नव्हे."

" नानासाहेबांच्या कागदावर सही करण्याबद्दल का ?"

" हो—तुला कळला आहे का तो व्यवहार ?"

" पुण्याला एकदां नानासाहेबांनीं एका कागदावर मला सही करायला सांगितलं होतं. त्यांनीं कागद मला दाखवला नाहीं त्यामुळं त्यांत काय मजकूर होता तो मला कळला नाहीं. मी त्या वेळीं तुमचा हवाला दिला होता."

" होय. त्यांनीं मला त्या बाबतींत लिहिलं होतं. त्याच विषयासंबंधीं आतां बोलणं निघालं होतं. अजून तो विषय तुला समजावून देण्याची वेळ आली नाहीं. ह्या वेळीं निष्कारण तुझ्या मनाला सन्ताप होईल म्हणून मी सांगतही नाहीं. त्याचा सोक्षमोक्ष होण्याची वेळ आतां जवळ आली आहे त्याच वेळीं कायतें बोलूं, पण एकंदरींत तुझ्या बाबाबद्दलचं माझं मत बदललं, एवढं मात्र खरं."

बाबांबद्दलचें माझेंही मत बदललेंच होतें, तेव्हां काकांच्या ह्या उद्गारांचें मला कांहींच वाटलें नाहीं. पण बाबा असे त्रागा करून गेले ह्याचें मात्र मला वाईट वाटलें. ह्यापेक्षां ते मुळीं आलेच नसते तर बरें झालें असतें.

ते चमत्कारांचे दिवस होते. एके दिवशीं बनीचे वडील गोपाळभटजी आमच्या घरीं आले. काका आमच्या गांवीं आल्यावेळीं काकांची आणि त्यांची तोंड-ओळख झाली होती. त्यावेळीं काका त्यांच्याच घरीं जेवायला जात असत. गोपाळभटजी आल्याचें पाहून माझ्याप्रमाणें काकांनाही आश्चर्य वाटलें.

गोपाळभटजी म्हणाले, " तो थेरडा अगदीं गाढव आहे. आम्हीं गांवच्या सर्व लोकांनीं मिळून मथूला आणण्यासाठीं त्याला इकडे पाठवलं होतं, पण डोक्यांत राख घालून कां गेला कुणाला ठाऊक ? कारण विचारलं—तर धड उत्तरही देईना. तेव्हां मी असा विचार केला, कीं आपण स्वतःच जावं. मथूची ख्याति सर्वत्र पसरली आहे. तिला पहायची आणि तिचं पुराण ऐकायची सर्वांना फार उत्कंठा लागली आहे. कुणी म्हणतात कीं तिच्या अंगांत देवीचा संचार झाला

आहे. कसंही करून तिला माझ्याबरोबर पाठवा किंवा तुम्हीं स्वतः तिला घेऊन माझ्याबरोबर या. आमच्याच घरीं राहूं म्हणजे झालं. एक दिवस पुराण होऊं दे आणि मग वाटलं तर दुसऱ्या दिवशीं परत घेऊन या तिला. ”

काका म्हणाले, “ हा पुराणाचा गवगवा फारच झालेला दिसतो. ”

गोपाळभटजी म्हणाले, “ तुम्हीं अजून काय ऐकलं आहे ? आमच्या गांवीं या आणि प्रत्यक्ष अनुभव घ्या ! ”

त्या रात्रीं गोपाळभटजींच्या आग्रहावरून काकांनीं मला पुराणाला बसवलं. ही बातमी गांवांत पसरतांच गांवांतील मंडळीच्या झुंडीच्या झुंडी काकांच्या घरीं जमा झाल्या. शेवटीं घराचे दरवाजे बन्द करावे लागले. त्यानन्तर माझें पुराण झालें. पुराण संपल्यानंतर सर्व मंडळी आपापल्या घरीं निघून गेली. गोपाळभटजी मंडळी जाण्याची वाट पहात होते. मंडळी जातांच ते काकांना म्हणाले, “ पोरीला देव उदंड आयुष्य देवो. असं अलौकिक पुराण आपल्या बापजन्मांत आपण ऐकलं नव्हतं. भास्कररावजी, कसंही करा, पण हिला घेऊन एकदां आमच्या गांवीं याच. एकदां तिच्या विद्वत्तेचं सार्थक होऊं द्या. कीर्ति बाहेर मिळवावी आणि ती आल्या गांवीं आणून पचवावी अशी म्हणच आहे मुळीं. ”

काकांनीं ताईकडे पाहिलें. ताई म्हणाली,

“ त्यांचा एवढा आग्रहच आहे तर न्या ना तिला. ”

दुसऱ्या दिवशीं आम्हीं तिघेंही निघालों आणि तिसऱ्या दिवशीं पहांटे गांवीं पोहोंचलों. आम्हीं गोपाळभटजींच्या घरींच उतरलों. माझ्या कपाळीं कुंकूं पाहून बनीची आई भटजींच्या कानाला लागून कुजबुजूं लागली. आम्हांला ऐकूं जाईल एवढ्या मोठ्या आवाजानें गोपाळभटजी आपल्या बायकोला म्हणाले,

“ त्या बाबतींत बोलायचं नाहीं. तो देवाचा साक्षात्कार आहे. बनीला देखील आधीं सांगून ठेव. ”

भलत्याच गोष्टीला काय भलतेंच स्वरूप दिलें गेलें पहा. मी कुंकूं लावलें तें बाहेरच्या देवाच्या साक्षात्कारानें नसून माझ्या मनोदेवतेच्या साक्षीनें होतें. पूर्वीची हकीकत न सांगतां काका इतरांना पुराणानन्तरची देवळांतली हकीकत सांगत असत त्याचाच हा परिणाम असावा असें मला वाटलें. खोटें बोलण्याचा मला तिटकारा होता, पण मला प्रत्यक्ष असें कुणीच विचारलें नव्हतें. तसें कुणी विचारलें तर खरी हकीकत सांगण्याचा मी मनाशीं निर्धार केला.

मी आंग धुवायला गेलें असतां बनी आपल्या दोन्ही मुलांना घेऊन माहेरीं आली. माझी भेट होण्यापूर्वीच तिच्या आईनें तिला समज दिली असावी असें वाटलें. माझ्या कुंकू लावण्याचा तिनें कांहींच उल्लेख केला नाहीं. माझें पुराण तिच्या खिसगणतींतही नव्हतें. ती जी भेटली ती आपल्या मुलांच्याच गोष्टी सांगूं लागली. त्या गोष्टीचें पहिल्यानें जरी मला कौतुक वाटलें तरी पुढें त्याच त्याच गोष्टीं पुन्हां पुन्हां ऐकण्याचा मला कंटाळा आला.

जेवणें उरकून आम्हीं माजघरांत बोलत बसलों होतों, इतक्यांत एक बारा तेरा वर्षांची मुलगी तिथें आली. माझ्याकडे पाहून ती कुत्र्यानें म्हणाली,

"हीच का आमची मथी?"

लगेच माझ्या ध्यानांत आलें कीं ही माझी सावत्र आई!

माझ्या सावत्र मुलीच्या पहिल्या भेटीची मला आठवण झाली. त्या आणि ह्या भेटींत केवढा फरक!

कुणीच कांहीं बोलत नाहींसें पाहून माझी सावत्र आई म्हणाली,

"सांगितलं तें खोटं नाहीं तर एकूण! एकदां मनाची खात्री करून घ्यावी म्हणून आलें होतें. पहातें तों हिच्या कपाळीं हा भला मोठा मळवट! धन्य आहे बाई ह्या अलीकडच्या पोरींची!"

एवढें बोलून ती जायला निघाली. ती जाते आहे असें पाहून बनीनें घरांत धांवत जावून कुंकवाचा करंडा आणला आणि तिच्या कपाळीं कुंकूं लावित असतांना माझी सावत्र आई बनीला म्हणाली, "आणि तिला पण चांगलं कपाळभर कुंकूं लावा माझ्यादेखत!" बनीनें आपल्या कपाळाला कुंकूं लावलें, आपल्या आईच्या लावलें आणि नन्तर माझ्याही कपाळीं लावलें—

तें पहातांच माझी सावत्र आई ओरडली, "बाई, बाई, बाई, धन्य आहे ह्या अलीकडच्या पोरींची!"

ती बाहेर निघून जातांच बनी आणि बनीची आई मोठमोठ्यानें हंसूं लागल्या. बनीची आई म्हणाली,

"काय मेलीनं एखाद्या मोठ्या आजीबाईचा आव आणला होता अगदीं!"

दोन प्रहरीं ग्रामदेवतेच्या देवळांत माझें पुराण झालें. पूर्वी झालेल्या सर्व गोष्टींची पुनरावृत्ति झाली.

जो तो जातांना तोंड फाटेपर्यन्त माझी स्तुति करीत होता. त्या स्तुतीची मजल इतकी दूर गेली होती, कीं ती ऐकण्याचा सुद्धां मला वीट आला. ज्यानें त्यानें म्हणावें, कीं ह्या मुलीनें आमच्या गांवचें नांव काढलें.

घरीं आल्यावर मला अगदीं ओशाळल्यासारखें झालें. ताईप्रमाणेंच बनीच्या आईनें घरीं येतांच माझी दृष्ट काढली. मला मनांतल्या मनांत हंसूं येऊं लागलें.

सर्वच बायकांचा स्वभाव असा सारखा कसा ?

गोपाळभटजींच्या बोलण्याला तर पारावारच नव्हता. पुष्कळशी स्तुति केल्यानंतर ते म्हणाले, "दुर्दैवी म्हातारा! मुलीचं कौतुक पहायला आला नाहीं. सारा गांव त्याची छीः थूः करीत होता. आतां ह्या स्वभावाला काय म्हणावं ? म्हाताऱ्याला मोठा अभिमान, कीं आपणच काय तो मोठा शास्त्रीबोवा, पण ह्या मिऱ्याएवढ्या पोरीनं त्याचं गर्वाचं घर खालीं आणलं. माझी मुलगी जर अशी विद्वान झाली असती तर तिच्यावरून मी आपला जीव ओवाळून टाकला असता." बनीकडे वळून ते म्हणाले, "पहा बने, पहा—आणि तिची थोडी अक्कल घे."

बनी हंसत हंसत म्हणाली, "मला शिकवलं असतं तर मी देखील पुराण सांगितलं असतं. मुळीं शिकवायचंच नाहीं आणि मग म्हणायचं अक्कल घे!"

गोपाळभटजी मोठमोठ्यानें हंसत म्हणाले, "आपलंच चुकलं हें बुवा आपण अगदीं प्रांजलपणें कबूल करतों. आतां पुढं तूं तरी आपल्या मुलीच्या वेळीं सावध रहा म्हणजे झालं."

बनीचें म्हणणें किती खरें होतें! पण तें खरें असून काय उपयोग ? वेळ निघून गेली होती. नुसती चूक कबूल केल्यानें केलेली चूक भरून येणें अशक्य होतें. शिवाय गोपाळभटजीचे हे उद्‌गार कितीसे कळकळीचे होते ह्याची मला शंकाच आली. नुसतें त्यावेळीं मनांत आलें तें बोलून गेले एवढेंच.

रात्रीं काकांनीं बाबांना बोलावणें धाडलें पण ते आले नाहींत. बाबांच्या ह्या वर्तनाचें सर्वांना फार वाईट वाटलें. मला किती वाईट वाटलें हें कुणालाच सांगतां आलें नसतें. आज मी पुराण सांगून जो लौकिक मिळवला त्याचें श्रेय बाबांनाच होतें. त्यांच्याच शिक्षणानें, सहवासानें आणि लहानपणापासून त्यांच्या तोंडून ऐकलेल्या पुराणानेंच आज मला व्यासपीठावर बसून पुराण सांगण्याची योग्यता आली होती. मला माझ्या आईची आठवण आली. परकी माणसेंसुद्धां

माझी दृष्ट काढतात मग माझी आई जर आज ह्यात असती तर तिनें माझें केवढें कोडकौतुक केलें असतें ! तिच्या जिवाला केवढा आनंद झाला असता !

ह्या विचारांनीं माझ्या हृदयांत कालवाकालव सुरू झाली. नकळत माझ्या डोळ्यांतून आसवें वाहूं लागलीं. माझी ती स्थिति पहातांच बनीची आई म्हणाली, " बिचारी गेली, तिचं सोनं झालं, पण आज ती ह्यात असती तर तिनं तुझ्या भोंवतीं जीव ओंवाळून टाकला असता. लाखांत एक माऊली होती. कधीं कुणाशीं भांडण नाहीं, तंटा नाहीं, सर्वांशीं आपली मिळूनमिसळून असायची. उणाअधिक शब्द सुद्धां कुणाला बोलली नाहीं. त्या सतीसाध्वीच्या जागीं ह्या म्हाताऱ्यानं ती किचकट पोर आणून बसवली आहे ! एवढी टीचभर पोर, पण एव्हांपासून साऱ्या गावांशीं कलागती लावल्या आहेत. बरं झालं तुला तिकडे जावं लागलं नाहीं तें. गेली असतीस तर तिनं तुला सुखाचा एक क्षणही लाभूं दिला नसता."

थोड्या वेळानें मी झोपीं गेलें. बिछान्यावर पडल्या वेळीं मला आईची आठवण येऊन सारखे हुंदक्यावर हुंदके येत होते. माझी आई येऊन अगदीं माझ्याजवळ बसली आहे आणि माझ्या मस्तकावरून हात फिरवीत आहे, असा क्षणभर मला भास झाला. नुसता भासच तो. आतां कुठली माझी आई ? बाप ह्यात असला तरी आई मेल्यावर मूल पोरकें झालें असें म्हणतात, त्याचा मला प्रत्यक्ष अनुभव आला. विचार करतां करतां माझा डोळा लागला.

दुसऱ्या दिवशीं काका मला घेऊन गांवीं आले. निघतांना गांवची शेंकडो मंडळी आम्हांला पोंचवायला वेशीपर्यंत आली होती. घरीं आल्यावर झालेली सर्व हकिकत काकांनीं ताईला सांगितली. बाबांच्या वर्तनाबद्दल ताईला फार दुःख झालें.

माझा अभ्यास पूर्ववत् चालला होता. चन्दूच्या शिकवणीनें मीं अभ्यासांत चांगलीच प्रगति करीत होतें त्यामुळें शाळेचे दिवस बुडाले असें मला वाटलें नाहीं. एके दिवशीं दुपारीं अभ्यास घेऊन झाल्यावर मी पुस्तकें गुंडाळून निघून जात होतें इतक्यांत चन्दू म्हणाला,

" थांब, मला तुझ्याशीं कांहीं बोलायचं आहे."

त्या वेळची त्याची मुद्रा पाहून माझ्या काळजांत चर्र झालें—मीं घाबरून त्याला विचारलें, " कांहीं वाईट बातमी नाहीं ना ?"

तो क्षणभर अगदीं स्वस्थ राहिला, त्यामुळें मला अधिकच भीति वाटूं लागली.

मीं पुन्हां विचारलें, "काय तें बोल ना! मला फार भीति वाटते."

"माझ्या मनांतले विचार कोणत्या भाषेनं तुझ्यासमोर बोलून दाखवूं ह्याचंच मला संकट पडलं आहे. तुझी बुद्धी पाहिली म्हणजे मला जितका अभिमान वाटतो, तितकंच तुझी स्थिति पाहिल्यानं दुःख होतं. नुकतं कुठं तुझं बालपण संपलं आहे. प्रौढपणाची जाणीव अजूनही तुला झाली नाहीं. तुझी तर ही स्थिति—आणि सासर माहेर सर्वस्वी नाहींसं झालेलं! ह्यापुढं सासरीं तुझा निभाव लागेल असं मला तरी वाटत नाहीं. तूं पुढं काय करणार ह्याचा कधीं विचार केला आहेस का?"

चन्दूच्या तोंडून एकेक शब्द अंतःकरण पिळवटून बाहेर पडत होता. त्याच्या चेहऱ्यावर कोणत्या प्रकारची छाया आली होती ह्याचें वर्णन करणें माझ्या शक्तीपलीकडचें आहे. एकेक शब्द तो कसा तोलून बोलत होता.

त्याचें भाषण संपतांच मी म्हणालें, "माझ्या स्थितीचा विचार करण्याखेरीज मला दुसरा काय व्यवसाय आहे? माझ्या स्थितीचा विचार करण्यांतच मी माझा रिकामा वेळ घालवीत असतें. विचार करकरून माझं मन आतां कसं निर्ढावून गेलं आहे. विचार करून तरी काय होणार? आमचं हें बायकांचं जिणं. पुरुषांसारख्या आम्हांला आकांक्षा आहेत कुठं? मी वकील होईन, डॉक्टर होईन, वर्तमानपत्रकार होईन, देशभक्त होईन अशी तुम्हां पुरुषांना कांहीं तरी बढाई मिरवतां येते. आम्हां बायकांची बढाई नुसती चुलीपुरती. फारतर संसाराच्या किंवा मुलाबाळांच्या गोष्टी, माझ्यासारखीला त्याही वर्ज्य. मग विचार तरी कसला करायचा? आला दिवस कसा जातो ह्या चिन्तेंत जीव चूर झालेला, तिथं कुठला संसार आणि कुठलं भवितव्य?"

डोळ्यांत पाणी आणून चन्दू म्हणाला,

"असं जर आहे—तर हा अभ्यास तरी कशाला?"

मी खिन्नपणानें हंसत उत्तर दिलें, "नुसता जिवाला विरंगुळा—रिकामपणीं मन खायला येतं म्हणून तें गुंतवून ठेवण्यासाठीं कांहीं तरी व्यवस्था. आतां ही एक नवी आशा निर्माण झाली आहे—पुराण सांगतां येईल."

"पुराण सांगून जन्मभर उदरनिर्वाह चालेल असं का तुला वाटतं?"

"कां चालणार नाहीं? पुरुषपुराणिकांचा प्रपंच पुराणावरच चालत असतो ना?"

"त्यांची गोष्ट निराळी आहे. पुराणिक ह्या नात्यानं गांवोगांव हिंडायला पुरुषांना कांहींच अडचण नाहीं, पण पुराणिकाचा पेशा पत्करून जर तूं हिंडायला निघालीस तर तुझ्यावर काय संकटें येतील ह्याची कांहीं कल्पना केली आहेस का?"

मी थोडा वेळ थांबून म्हटलें, "तो मार्ग भीतीचा आहे ह्याची मलाही जाणीव आहे. पण दुसरी एक आशा आहे. उद्यां मॅट्रिक झालें तर कुठंही शाळेंत मास्तरणीची नोकरी मिळेल."

चन्दू एक दीर्घ निश्वास सोडून म्हणाला, "अनाथ स्त्रीला ती नोकरीही तितकीच धोक्याची आहे. मास्तरणीची नोकरी मिळायची म्हणजे फक्त मुंबईत. पुण्यांत देखील अजून मास्तरणी नेमूं लागले नाहींत. आणि पुण्यांत असलं म्हणून काय झालं? तूं एकटी आयुष्य कसं कंठणार? कुणाच्या आधारावर? कुणाच्या सहवासांत? एकट्याचा संसार थाटणं फार कठीण असतं. पुरुषाला खाणावळींत जाऊन वेळ निभावतां येते, पण लवकरच त्या स्थितीला तोही कंटाळतो. तुला तर खाणावळींतही जातां येणार नाहीं. जेवण करून नोकरीची वेळ साधणं आणि नोकरीवरून परत आल्यावर एकाद्या भयाण खोलींत एकटंच रहाणं, हें किती कठीण जाईल ह्याचा तूंच विचार कर."

मी खिन्नपणानें हंसून म्हटलें, "पुढल्या आयुष्याचा मार्ग दाखवून देण्याऐवजीं पुढल्या आयुष्याची मला भीति दाखवण्यांत तुला गम्मत वाटते का?"

चंदू म्हणाला, "उगीच असं टोंचून का बोलतेस? तुझ्याबद्दल मला काय वाटतं तें सांगायला माझ्यापाशीं शब्द नाहींत. तुझ्याबद्दल मला काळजी वाटते म्हणूनच आज ह्या विषयाचा मी उपक्रम केला. तुझ्यासारखीच्या आयुष्यांत प्रसंग आणि अडचणी येणार आहेत ह्याची जाणीव करून देण्यासाठींच मी तसं बोललों. कोणत्याही गोष्टीचा विचार करतांना वाईटाची कल्पना आधीं करावी, म्हणजे ते टाळण्याचे उपाय आधीं योजतां येतात. मीही तुझ्यासारखाच अल्पवयी आहें. बी. ए. झालों म्हणजे कांहीं माझे हात आकाशाला पोंचले नाहींत. परीक्षेच्या कसरतींत मी सर्वांपुढें उडी टाकली आहे—एवढंच. पण मुंबईत राहिल्यामुळं तुझ्यासारख्या अनाथ स्त्रियांवर—अगदीं संकोच सोडून बोलायचं म्हणजे तुझ्यासारख्या विधवांवर—भयंकर प्रसंग आलेले मी माझ्या डोळ्यांनीं पाहिले आहेत. एवढ्यासाठींच मी तुला ही धोक्याची सूचना देत आहें."

" झालं ? संपली तुझी सूचना ? आतां माझं ऐक. देवानं मला जन्माला घातलं, देवानंच माझ्यावर आपत्ति आणल्या, तोच मला पुढला मार्ग दाखवील. माणसांनीं मला छळलं आहे तशी मदतही केली आहे, पण दिवसेंदिवस माणसांवरचा–विशेषतः पुरुषांवरचा–माझा विश्वास उडत चालला आहे. कुणावर विश्वास ठेवावा आणि कुणावर ठेवूं नये ह्याचा मला अंदाजच करतां येत नाहीं. माझा प्रत्यक्ष बाप, पण तोही वैऱ्याहून वैरी झाला. नात्यागोत्याचं कुणीच नव्हतं पण काका आणि ताई ह्यांनीं माझी आईबापांची उणीव भरून काढली. खरं पाहूं गेलं तर मी तिची आई, पण माझ्या संकटाच्या वेळीं तीच माझी आई झाली. त्या दोघांवर ईश्वराइतकाच मी विश्वास टाकला आहे आणि माझ्या पुढील आयुष्यांतील सूत्रं मी सर्वस्वीं त्यांच्या हातीं दिलीं आहेत. त्यांच्यामुळंच तुझा माझा परिचय. तूंही त्यांच्याइतकीच माझ्याबद्दल कळकळ बाळगतोस. हें ऋण मी जन्मभर विसरणार नाहीं." असें बोलून मी तिथून निघून गेलें.

चंदू वेड्यासारखा पहात तिथेंच बसून राहिला.

त्याच दिवशीं संध्याकाळीं चंदू आणि ताई कितीतरी वेळ बोलत बसलीं होतीं. त्यांचें बोलणें माझ्याविषयींच असावें असें मला उगीचच वाटलें. चंदू निघून गेल्यावर क्षणभरानें काका आले आणि तेही बराच वेळ पावेतों ताईशीं बोलत बसले. मी वाचीत बसलें होतें. ताईशीं होत असलेलें बोलणें संपवून काका अगदीं माझ्यासमोरून गेले, पण माझ्याशीं कांहीं बोलले नाहींत. ताईही दोनतीन वेळ माझ्यासमोरून गेली, पण तिनेंही कांहींच भाषण केलें नाहीं. सर्वांचे चेहरे अगदीं गंभीर झाले होते.

थोड्या वेळानें चंदू येऊन माझ्यासमोर उभा राहिला. मी मुद्दामच वर त्याच्याकडे पाहिलें नाहीं. मी सारखी पुस्तक वाचित बसलें होतें पण काय वाचीत होतें तें माझें मलाच कळत नव्हतें. मी कांहींच बोलत नाहीं असें पाहून चंदू जायला निघाला, चार पावलें जाऊन पुन्हां थबकला आणि पुन्हां येऊन माझ्यासमोर उभा राहिला. मी पुस्तकावरची नजर काढून त्याच्याकडे वळवली. त्याची नित्याची खोडकर मुद्रा ह्या वेळीं अगदीं गंभीर झाली होती. तो सारखा टक लावून माझ्याकडे पहात होता. माझ्या सर्वांगावर थरथरून कांटा उभा राहिला. त्याची ती विलक्षण मुद्रा पाहून मी अगदीं घाबरून गेलें. मला त्याच्या पहाण्याचें भय वाटूं लागलें. मी एकदम दचकून उठून उभी राहिलें आणि जाण्यासाठीं पुढें सरसावलें त्या वेळीं चंदू म्हणाला,

" थांब मथू , जाऊं नकोस. "

चंदूचा आवाज ह्या वेळीं अगदीं घोगरा झाला होता.

काय असेल तें असो, मला त्यावेळीं त्याचें अगदीं भय वाटूं लागलें. एक क्षणभरही न थांबता पळून जावें, असें मनांत येत असतांही पाय जाग्यावरून हालेनात. मी कांहीं बोलत नाहीं असें पाहून चंदू म्हणाला,

" पर्वांच तूं एका शब्दाचा अर्थ मला विचारीत होतीस ? "

" त्या शब्दाचा अर्थ आतां मला कळला आहे. मी माझ्या गांवीं गेलें होतें त्या वेळीं बनीच्या घरीं मी जी चर्चा ऐकली त्यावरून आतां माझी शंका राहिली नाहीं."

माझ्या तोंडचें हें उत्तर ऐकून चन्दूचा चेहरा अगदीं खिन्न झाला. मी अगदीं तिरसटपणानें बोललें होतें ह्याची मला जाणीव झाली, पण मी असा तिरसटपणा कां केला ह्याचें कारण माझें मलाच समजेना.

चंदू पुन्हां म्हणाला, " त्या शब्दाचा अर्थ तुला कळला ना ? मग त्याबद्दल तूं कधीं विचार केला आहेस का ? "

" काय जरूर ? " मी पुन्हां तशाच तिरसटपणानें उत्तर दिलें.

चन्दूचा चेहरा अधिकच काळवंडला. थोडा वेळ घुटमळून मोठ्या कष्टानें बोलण्याचा प्रयत्न करीत तो म्हणाला,

" मथू , मी उद्यां मुंबईला जाणार आहें. " एवढेंच बोलून तो एकदम थांबला.

" मलाही लवकरच पुण्याला जावं लागेल असं वाटतं आहे. " मी म्हटलें.

चन्दू बोलण्याचा प्रयत्न करीत होता, पण त्याच्या तोंडून शब्द बाहेर फुटेना. त्याचे ओंठ सारखे थरथरत होते, मस्तकावरील शिरा ताठ उभ्या राहिल्या होत्या, आणि त्याचा चेहरा अगदीं गोरामोरा झाला होता. त्याची ती स्थिति पाहून मी अगदीं घाबरून गेलें आणि त्याला विचारलें,

" चन्दू, काय झालं ? असा घाबरलास कां ? "

चन्दू मोठ्या कष्टानें बोलण्याचा प्रयत्न करीत म्हणाला, " घाबरलों ? मी घाबरल्यासारखा का दिसतों आहें ? मथू , मी खरोखरच घाबरलों आहें, पण मी घाबरलों आहें असं तुला दिसूं नये ह्याचा मी प्रयत्न करीत आहें. "

" कां ? " मी संथपणानें विचारलें.

" कां तें माझं मलाच कळत नाहीं. मी भित्रा नाहीं, घाबरट नाहीं, कोणत्याही प्रसंगाला मी केव्हांही डगमगलों नाहीं, पण आज मात्र माझा धीर सुटला आहे. वहिनीला सांगितलं, तिच्या करवीं काकांनाही सांगून पाहिलं, पण त्यांनीं माझ्यावर लोटलं. काय करूं ? कसं बोलूं ? मथू, मी कांहीं बोललों आणि तुला तें रुचलं नाहीं तर त्याबद्दल माझ्यावर तूं कायमची रागावणार नाहींस ना ? "

चन्दूच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच माझ्या सर्वांगाला थरकांप सुटला. माझ्या मनाची विलक्षण कालवाकालव झाली. मस्तकांत कसा सणसण आवाज होऊं लागला. मनाचा हिय्या करून मी उत्तर दिलें,

" नाहीं. कांहीं झालं तरी मी तुझ्यावर रागावणार नाहीं. "

चंदूच्या चेहऱ्यावर हास्याची एक बारिकशी लकेर येऊन गेल्यासारखी दिसली.

चंदू मला म्हणाला, " मथू, खालीं बैस. "

मी खालीं बसलें आणि तोही माझ्यापासून थोड्या अन्तरावर बसून राहिला. कांहीं वेळपर्यंत त्याच्या तोंडून कांहींच शब्द निघेना. माझें मन कसें अधुरें झालें होतें. त्यानें बोलावें असें जरी मला वाटे, तरी न बोलतांच तो जाईल तर फार बरें होईल असेंही माझ्या मनांत येऊं लागलें. माझी नजर त्याच्या नजरेकडे गेली त्या सरशीं तो एकदम दचकला आणि म्हणाला,

" मथू, त्या दिवशीं मी काकांना सांगितलेलं तुला आठवतं का ? माझी निवड झाली आहे. "

हे त्याचे शब्द अगदीं भुयारांतून बोलल्याप्रमाणें मला ऐकूं आले. माझ्या हृदयांतील धडकी कानांत ऐकूं येऊं लागली. सर्वांगांत शिरशिरी भरून पायाचें रक्त मस्तकाला जात आहे असें वाटूं लागलें.

चन्दूचें भाषण पुढें सुरू झालें—

" —माझी निवड झाली आहे आणि तिला काका आणि वहिनी ह्यांचाही विरोध नाहीं. माझी निवड तुला कळली का मथू ? "

माझ्या डोळ्यांपुढें चक्क प्रकाश पडला !—त्याच्या घाबरण्याचें कारण आतां माझ्या ध्यानांत आलें.

पुन्हां तोच शब्द ! चोहींकडून तो एकच शब्द मला पुन्हां पुन्हां ऐकूं येऊं लागला !—इतक्यांत कुठूनतरी दूर अंतरावरून माझ्या कानीं शब्द आलेः—

" मथू, तूं माझी होशील का ? "

माझ्या डोळ्यांपुढें चक्कर आली आणि मी एकदम मूर्च्छित पडलें. मूर्च्छित पडतां पडतां " वहिनी " म्हणून कोणीतरी मोठ्यानें ओरडल्याचें मला ऐकूं आलें आणि त्यानन्तर अंधार झाला.

मी त्या वेळीं माझ्या बिछान्यावर पडलें होतें. समोर दिवा तेवत होता. मान वळवून पहातें तों काका आणि ताई माझ्या शेजारीं बसलीं होतीं. मी ताईच्या हातांत हात घालून म्हटलें, " ताई, मला काय झालं होतं ? "

डोळ्यांतील आंसवें पुशीत ताई म्हणाली, " उगी बाळ, उगी. आतां कांहीं बोलूं नकोस. पित्तानं तुला चक्कर आली होती. मात्रा देऊन वैद्यबुवा आतांच निघून गेले. डोळे मिटून अशीच स्वस्थ पडून रहा म्हणजे सकाळीं अगदीं बरं वाटेल. "

मी म्हटलें, " ताई, तूं इथनं जाऊं नकोस. मला भीति वाटते. मला ह्या खोलींत एकटं राहवणार नाहीं. "

माझे हे शब्द ऐकतांच काका उठून खोलीबाहेर गेले. ते गेल्यावर मी ताईला म्हटलें, " ताई, मला अगदीं घट्ट जवळ घे. आज मी अगदीं घाबरून गेलें आहें. माझं मलाच भय वाटतं आहे. "

ताई माझ्या शेजारीं आडवी झाली आणि मी तिला कडकडून मिठी मारली. ती हळूहळू माझ्या पाठीवरून हात फिरवीत होती. मी डोळे मिटले असें पाहून ताईनें कांहीं वेळानें दिवा शान्त केला. मी डोळे मिटले होते तरी मला झोंप लागली नव्हती. चन्दूचा तो केविलवाणा चेहरा त्या काळोखांत स्पष्टपणें माझ्या नजरेसमोर दिसत होता !

पुन्हां तेच शब्द ऐकूं आलेः—

" मथू, तूं माझी होशील का ? "

माझ्या सर्वांगावर थरारून कांटा उभा राहिला.

हें स्वप्न तर नव्हे ?

मी काय उत्तर देऊं ? मन म्हणत होतें, ' होय म्हण '—पण जीभ जड पडली होती. मी ' होय ' कां म्हणूं नये ? मी पुन्हां विचार करूं लागलें. जसजसा विचार

करूं लागलें तसतशी मला अधिकाधिक भीति वाटूं लागली. मी कसला विचार करीत होतें हें माझें मलाच कळेना. पुन्हां तेच शब्द ऐकूं आले :—

" मथू, तूं माझी होशील का ?"

असें वाटलें कीं धांवत जाऊन त्याच्या गळ्याला मिठी मारावी आणि मानेवर मान टाकून मुक्तकंठानें रडूं लागावें ! मला खरोखरच हुंदक्यावर हुंदके येऊं लागले.

ताई जागी होऊन माझें मस्तक थोपटीत म्हणाली, " झोपेंत का रडते आहेस मथू ? भीति वाटत असेल तर कुलस्वामिनीचं स्मरण कर."

कुठली कुलस्वामिनी ? माहेरची कीं सासरची ? कुठलें माझें कुळ ?

भलभलते प्रश्न माझ्या मनांत येऊं लागले. त्या तशाच विचाराच्या काहुरांत मला झोंप लागली.

सकाळीं जागी होऊन पहातें तो चन्दू मुंबईला निघून गेला होता.

## प्रकरण तेरावें — परकीयांच्या गोटांत

दुसऱ्या दिवशीं मी साफ बरी झालें. आधल्या दिवसाचा कोणताही परिणाम माझ्या प्रकृतीवर राहिला नव्हता. ती हकीकत झाल्या न झाल्यासारखीच झाली होती. तो दिवस आला होता तसाच निघून गेला–साफ धुऊन गेला–कुणीही त्या दिवसाचा मग उल्लेख केला नाहीं. काका आणि ताई ह्यांनीं मला कांहीं विचारलेंही नाहीं.

तो दिवस म्हणजे एक स्वप्न झालें. त्या गोष्टी जितक्या चमत्कारिक रीतीनें घडून आल्या तितक्याच विलक्षण रीतीनें नाहींशा झाल्या. आम्हां दोघांमधील तो संवाद आम्हां दोघांपलीकडे कुणालाही कळला नाही आणि तो कळून घेण्याचा कुणी प्रयत्नही केला नाहीं.

सुमारें एक आठवड्यानें नानासाहेबांचें पत्र आलें. त्यांनीं मला पुण्याला घेऊन येण्याबद्दल काकांना विनंति केली होती. काकांचीं कांहीं जरूरीचीं कामें होतीं त्यामुळें आणखी आठदहा दिवस आम्हांला निघतां आलें नाहीं. आम्हीं ज्यावेळीं निघालों त्यावेळीं वादळी हवा होती. बोटींत फारच त्रास झाला. मुंबईच्या धक्कयावर आम्हीं उतरलों त्या वेळीं मी अगदीं अर्धमेली झालें होतें. तशा स्थितींत सरळ बोरीबंदर गांठणें काकांना प्रशस्त वाटेना, म्हणून मला हुषारी येईपर्यंत मुंबईला काकांच्या एका मित्राच्या घरीं चारदोन दिवस रहाण्याचा त्यांनीं संकल्प केला. इतका वेळ मुंबईच्या मार्गांतून मी पुण्याला गेलें होतें, पण प्रत्यक्ष मुंबई पहाण्याचा योग मला कधींच आला नव्हता. काकांनीं मला मुंबई दाखवण्याचें कबूल केलें.

त्या मुदतींत सकाळपासून संध्याकाळपर्यंत व्हिक्टोरिआ करून आम्हीं मुंबईभर हिंडत होतों. पहाण्याजोगीं सर्व स्थळें काकांनीं मला नेऊन दाखवलीं, त्यामुळें मुंबईच्या रस्त्यांची मला बरीचशी कल्पना आली. माझ्या पुराणाची हकीकत काकांच्या मित्रांच्या कानीं आली होती त्यामुळें त्यांनीं जाण्यापूर्वीं ठाकुरद्वारीं माझें एक पुराण करवण्याचा घाट घातला.

खेड्यांतील खुळ्या भोळ्या लोकांसमोर पुराण सांगायला बसतांना मला भीति वाटत होतीच, पण आतां मुंबईच्या सुशिक्षित आणि सुसंस्कृत जनसमाजापुढें

व्याख्यान देण्याची कल्पना मला अतिशय भीतिप्रद वाटली. काकांच्या मित्रांनीं आधींच सर्व व्यवस्था करून सर्वत्र जाहिराती वाटल्यामुळें आतां माघार घेणें शक्य नव्हतें.

मुंबईचे लोक मोठे भावनाप्रधान असतात. काकदृष्टीनें कुणाचेही दोष काढीत न बसतां चांगलें तेवढें घेऊन मनाचें समाधान करून घेण्याकडे त्यांची प्रवृत्ति असते असें मला दिसून आलें. कोंकणच्या खेडवळांपेक्षांही ही सुशिक्षित मंडळी मला जास्त श्रद्धाळू वाटली. माझ्या पुराणाला हजारों माणसांची गर्दी झाली होती.

त्या दिवशीं मी स्वच्छ पांढरें पातळ नेसलें होतें. मी व्यासपीठावर बसलें त्या वेळीं माझा मलाच मोठा आनन्द झाला. मुंबईच्या युनिव्हर्सिटीच्या मंडपांत जाऊन परीक्षा देण्यासारखाच तो प्रसंग वाटला. त्या दिवशीं मला एक विशेष प्रकारचें स्फुरण आलें होतें. पुराण एक तास झालें. पुराणाला भागवतांतील अकराव्या स्कंधांतील कांहीं श्लोक घेतले होते. त्या दिवशीं मी काय बोलत होतें ह्याचें माझें मलाच भान नव्हतें. माझ्या अंतःकरणांत खरोखरच कुणाचा तरी संचार झाला आहे असें मला त्या वेळीं वाटलें. अस्खलित वाणीनें माझ्या तोंडून निरूपण होत होतें, पण मी तें बुद्धिपुरस्सर करीत आहें असें मला त्यावेळीं वाटलें नाहीं. सर्व सभा कशी चित्रासारखी तटस्थ बसली होती. पुराण संपतांच सर्वांनीं टाळ्यांचा प्रचंड कडकडाट केला. हा प्रकार मला अपूर्व होता. त्या कडकडाटानें निरूपणाची तन्द्री उतरून मी भानावर आलें. पुन्हां तेच तेच सर्व प्रकार झाले. मी विधवा असून कुंकूं लावतें याचा गवगवा येथेंही कसा झाला नाहीं ह्याचें मला आश्चर्य वाटलें.

त्या दिवशीं अतिशय गर्दी झाल्यामुळें माझें पुराण ऐकण्याची पुष्कळांची निराशा झाली. कित्येकांनीं दुसऱ्या एखाद्या प्रशस्त जागीं माझें पुराण करविण्याची सूचना आणली पण काकांना ती पसंत पडली नाहीं. काकांच्या मित्रांच्या घरीं मला पहाण्यासाठीं कितीतरी स्त्रीपुरुषांची रहदारी सुरू झाली. वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेली माझ्या पुराणाची हकीकत मी ज्यावेळीं वाचली त्यावेळीं माझें मलाच आश्चर्य वाटलें. मला माहीत नसलेल्या कितीतरी गोष्टी त्या वर्णनांत आल्या होत्या. अतिशयोक्तीची अगदीं कमाल झाली होती. ती हकीकत वाचतांच माझ्या तोंडचें पाणी पळालें. कोंकणची गोष्ट निराळी होती. कोंकणच्या हकीकती कदाचित् पुण्याला कळल्याही नसत्या, पण आतां मुंबईच्या वर्तमानपत्रांनीं माझ्या

पुराणासंबंधीं पिटलेला हा डांगोरा नानासाहेबांच्या कानीं गेल्यावांचून राहणार नाहीं असें वाटून माझा जीव अगदीं शरमिंदा झाला.

आम्हीं पुण्याला जाऊन पोंहोचलों. पुराणाच्या बातमीबरोबरच मी कुंकूं लावीत असल्याची बातमी आमच्यापूर्वीच पुण्यांत येऊन थडकली होती.

आम्ही पुण्यांत घरीं येतांच काकांनीं नानासाहेबांना बाजूला घेऊन काय कान फुंकले कोण जाणे, —नानासाहेबांनीं माझ्या कुंकूं लावण्याबद्दल कांहींच उल्लेख केला नाहीं. अंग धुतल्यानन्तर स्वयंपाकघरांतील कोनाड्यांत कुंकवाच्या करंड्याला मी हात घालतांच जाऊबाई म्हणाल्या, "त्याला हात लावूं नका. तुमचा करंडा तुमच्याजवळ नाहीं का ?"

मी तशीच जाऊन माझी ट्रंक उघडली आणि करंडा काढून कुंकूं लावलें.

जाऊबाईच्या अंगाचा नुसता जळफळाट झाला होता. माझा राग त्या भांड्याकुंड्यावर काढीत होत्या. मुलांना देखील उगीच एकदोन रपाटे देण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं.

मी कुंकूं लावून बाहेर येतांच लीला म्हणाली, "काकू, कुंकूं लावल्यावर तूं किती सुरेख दिसतेस म्हणून सांगूं ? पूर्वी तुझं तोंड कसं, उदासवाणं दिसत असे, आतां तुला पाहिलं कीं महालक्ष्मीच्या मुखवट्याची आठवण होते."

लीलेचे हे उद्गार जाऊबाईच्या कानीं पडले आणि त्यासरशीं त्यांनीं येऊन लीलेच्या पाठींत एक धपाटा दिला. रडायच्या ऐवजीं लीला आपल्या आईकडे पाहून हंसून वाकोल्या दाखवूं लागली. ती मला म्हणाली, "मी तुला सुंदर म्हटलं किनई, त्याचा आईला राग आला. तुला केव्हांही बरं म्हटलं तर अशीच रागावून ती मला बडवते."

मी स्वयंपाकघरांत जाऊं लागलें त्या वेळीं जाऊबाई म्हणाल्या,

"कांहीं कारण नाहीं इकडे यायचं. तुमच्यामुळं इथं कांहीं खोळंबून राहिलं नाहीं. इतके महिने इथं नव्हतां त्या वेळीं मीच चुलीजवळ मरत होतें ना ? आतां तुम्हीं येऊन कांहीं मला गाद्यागिरद्यांवर बसवणार आहांत थोड्याच !"

जाऊबाईचें हें भाषण ऐकून लीला मोठमोठ्यानें हंसूं लागली.

जाऊबाईचें चऱ्हाट सुरूच होतें "—शिवाय तुम्हांला म्हणे आतां साक्षात्कार झाला आहे ! देवीला जसं कांहीं विधवेखेरीज दुसरं झाडच सांपडत नाहीं ! बरीं

एकेक बंड माजवलीं आहेत. असली सवाष्ण विधवा नको माझ्या स्वयंपाकघरांत यायला."

लीला टाळ्या पिटित म्हणाली, "आतां बरं झालं तुझं काकू, अभ्यास करायला तुला आतां चांगली सवड मिळेल."

जाऊबाई खेंकसून म्हणाल्या, "हो, खरंच तें! आहे घरीं एक सैंपाकीण काम करायला–आतां ह्यांनीं पाटावरून ताटावर आणि ताटावरून पाटावर बसायचं आणि नुसतं गिळून शाळेंत जाऊन परीक्षा द्यायच्या! ऐकलंत? तुमचे जोडे काढून ठेवा बाहेर. शाळेंत जायच्या पूर्वी मला ते पुसून ठेवले पाहिजेत." क्षणभर थांबून एक सुस्कारा सोडून त्या म्हणाल्या, "–आतां एकच व्हायचं काय तें राहिलं आहे!" एवढेंच बोलून जाऊबाई उगीच राहिल्या.

"काय राहिलं आहे?" लीलेनें विचारलें.

"तुझं डोम्बल! जा, पाटपाणी कर जा." जाऊबाई वस्सकन् म्हणाल्या.

वन्सं हयात असतांना तोंडांतून एक शब्द न काढणाऱ्या माझ्या जाऊबाई इतक्यांतच इतक्या बोलक्या कशा झाल्या? त्यांचें बोलणें म्हणजे वन्संची सहीसही नक्कल होती. त्यांच्या बोलण्याचें लीलेला कांहींच वाटत नव्हतें. त्यांनीं वाटेल तितकें बोलावें आणि लीलेनें त्याला न जुमानतां वाटेल तसें वागावें, असें चाललें होतें.

मी पुन्हां शाळेंत जाऊं लागलें आणि माझा अभ्यास सुरळित रीतीनें सुरू झाला. घरच्या कामाची बंदी झाल्यामुळें अभ्यासाची आयतीच सोय झाली होती. वाईटांतून बरें निघतें तें हें असें.

काकांनीं मागल्याप्रमाणेंच कांहीं दिवस पुण्याला मुक्काम दिला होता. ते मधूनमधून हिंगणें नांवाच्या एका खेड्यांत जात असत. प्रो. कर्वे नांवाच्या कुणा एका गृहस्थानें अनाथ विधवांसाठीं तिथें एक आश्रम स्थापला होता. त्या आश्रमाबद्दल पुण्यांत त्यावेळीं फार अमंगल कंड्या पिकल्या होत्या. प्रो. कर्व्यांबद्दल काकांना फार आदर होता आणि कर्व्यांना कुणी नांवें ठेवलीं तर सडकून कोंकणी शिव्या द्यायलाही ते मागेंपुढें पहात नसत. त्या आश्रमांत इंग्रजी सातव्या यत्तेपर्यन्त शिकवण्याची जर सोय असती तर मला त्यांनीं तिथेंच नेऊन ठेवलें असतें. काकांनीं त्या आश्रमाला बरीचशी मोठी रक्कम विननांवानें दिल्याचें मला ताईकडून कळलें होतें.

शवटीं एकादा भ्रमाचा भोपळा फुटला. तो सहीचा वाद कसला होता ह्याची उघड भाषा आतां सुरू झाली. बँकेंत सुमारें बाराशें रुपयांची रक्कम होती आणि दोन हजार रुपयांची विम्याची पॉलिसी होती. माझा पालक कोण ह्याबद्दल तो वाद माजला होता. बाबा म्हणत होते मी पालक आणि नानासाहेब म्हणत होते मी पालक. पॉलिसी असाइन् केलेली नसल्यामुळें ती रक्कम मला मिळणें शक्यच नव्हतें. बँकेंतील पैशाचीही तीच गत होती. माझ्यासमोर काकांनीं नानासाहेबांकडे हा विषय काढला आणि वादविवादाला सुरवात झाली.

नानासाहेब म्हणाले, " हिच्याशीं लग्न होण्यापूर्वीची ही पॉलिसी आहे. बँकेंतील रक्कमही त्या पूर्वीची आहे. त्यामुळं हिच्या बापाचा त्यावर अधिकार पोंचत नाहीं. "

काका म्हणाले, " पॉलिसी केव्हांही घेतलेली असली तरी ती आपल्या मागें आपल्या पत्नीला मिळावी असा विमा उतरणाऱ्याचा उद्देश असतो. बँकेंतील रकमेबद्दल माझा वाद नाहीं. तुम्हीं दोघेही भाऊ जरी दोन निरनिराळ्या ठिकाणीं रहात असलां–वास्तविक रीतीनें जरी तुम्हीं विभक्त असलां–तरीही कायद्याच्या दृष्टीनं अविभक्त असल्याचं तुम्हांला ठरवतां येईल हें मी जाणतों. तिच्या अंगावरचे दागिने हें तिचं स्त्रीधन आहे. कायद्याच्या दृष्टीनें देखील तुम्हांला तें काढून घेतां येणार नाहींत. पोस्टल बँकेंतील बाराशेंची रक्कम तुम्हीं घ्यावी आणि पॉलिसीची रक्कम मथूच्या नांवें बँकेंत ठेवावी, असा लेखी करार तुम्हीं करून देत असाल तर बाकीची व्यवस्था करण्याची हमी मी घेतों. "

" मी एक तनसडीसुद्धां देणार नाहीं. कायद्याच्या गमजा मला सांगूं नका. मी असे पंचवीस वकील खेळवले आहेत. दागिने कसे मिळत नाहींत तें मी पहातोंच ! चोरीची फिर्याद करीन तुमच्यावर. दारांत पोलीस उभे करून तुमच्या घराचा झाडा घ्यायला लावीन. ती विधवा आहे, नुसती अन्नावस्त्राची मालकीण आहे, कोर्ट ठरवील ती पोटगी मी आनंदानं देईन. माझ्या डोळ्यांत धूळ फेंकण्याचा प्रयत्न करूं नका ! विम्याच्या आणि पोस्टांतील रकमेच्या वरती तिचा काडीचाही हक्क–संबंध पोंचत नाहीं हें मला पक्कं माहीत आहे. बाराशें रुपयांचं आमिष दाखवून तुम्हीं माझ्या तोंडाला पानं पुसूं पहात आहांत, हें न समजण्याइतका कांहीं मी कच्च्या गुरूचा चेला नाहीं ! "

एवढ्यावरच तो वादविवाद संपला. नानासाहेब कांहीं केल्या माघार घेईनात आणि काकाही आपला हट्ट सोडीनात.

नानासाहेब निघून गेल्यावर मी काकांना म्हटलें, " उगीच वादविवाद कशाला हा ? मला त्यांची एक फुटकी कवडीसुद्धां नको. ईश्वरानं मला जन्म दिला आहे तोच माझी काळजी घेईल. "

" हें वैराग्य तुला आज बरं वाटतं आहे, पण प्रसंग पडल्यावर तुझं मत खास बदलेल—ह्या वैराग्याचाही पश्चात्ताप होईल. व्यवहाराच्या दृष्टीनं कायद्याच्या पकडींत धरून विम्याची रक्कम कदाचित् त्याला गिळंकृत करतां येईल, पण दागिने हिसकावून घेणं त्याच्या बापालाही साध्य नाहीं. स्वतःची अशी कांहींतरी रक्कम तुझ्याजवळ असली पाहिजे. पोटगीचा दावा आणला तर मिळून मिळून काय मिळेल ? फार तर पांचसात रुपये. तेवढ्यानं तुझा चरितार्थ कसा चालेल ? शिवाय दावा आणणं तुला रुचेल कीं नाहीं हा एक प्रश्नच—आहे आणि दावा आणल्याशिवाय तो पोटगी देणार नाहीं हेंही ब्रह्मवाक्यच आहे. अशा वेळीं सामदामानं किंवा धाकदपटशानं विम्याची निम्मीशिम्मी रक्कम तरी त्याच्याकडून वसूल केली पाहिजेच. एवढ्या रकमेंत तुझी जन्माची ददात दूर होईल असं नाहीं, पण हातपाय थकले तर तेवढाच तुला आधार होईल. "

त्या रात्रीं काकांनीं पुन्हां कांहींतरी तोड काढण्याचा प्रयत्न केला, पण नानासाहेब कांहीं बधेनात. दुसऱ्या दिवशीं काकांना जायचें होतें त्यामुळें त्या विषयाचा कांहींतरी शेवटचा निकाल लागण्याचें अखेरीस तसेंच राहून गेलें.

लीलेच्या लग्नाची गडबड सुरू होती. शेजारपाजारच्या बायका येऊन लग्नाच्या-साठीं जिनसापानसांची तयारी करूं लागल्या, तेव्हां कुठें मला लीलेचें लग्न ठरल्याचें कळलें. मुलगा पुण्यांतलाच होता, हायस्कुलांत शिकत होता आणि त्याच्या बापाला कुठल्याशा पुस्तकांच्या दुकानांत नोकरी होती. लग्नाची तयारी करण्यांत मला कोणताही भाग घेतां आला नाहीं.

लग्नाला तीन दिवस राहिले तेव्हां रात्रींच्या वेळीं नानासाहेब मला म्हणाले, " वहिनी, मी सांगितलं पाहिजे असं नाहीं, पण ही लग्नाची बाब मोठी बिकट आहे. बाहेरच्या चार लोकांशीं आमचा संबंध येणार. विशेषतः वरपक्षाकडील मंडळी जें जें कांहीं म्हणतील तें तें आम्हां वधूपक्षीयांना कबूल करावं लागणार. तुमच्या हट्टामुळं हातातोंडाशीं आलेलं लग्न मोडण्याच्या बेतांत आहे. " असें बोलून एक दीर्घ निश्वास टाकून नानासाहेब स्वस्थ बसले.

मी कसला हट्ट केला, केव्हां केला याची मला कांहींच जाणीव नव्हती. मी पुष्कळ विचार करून पाहिलें, पण लग्न मोडण्याच्या बेतांत येण्याजोगा कोणताही हट्ट केल्याचें मला आठवेना, म्हणून मी मर्यादापूर्वक विचारलें, "माझ्या कोणत्या हट्टामुळं लीलेचं लग्न मोडतं आहे ?"

नानासाहेब डोळे फाडफाडून माझ्याकडे पहात राहिले आणि म्हणाले, "कोणत्या हट्टामुळं ? आतां अगदीं शर्थ झाली. साऱ्या पुण्यांत बोंबाबोंब माजून राहिली आहे आणि तुम्ही विचारतां 'कोणत्या हट्टामुळं ?–' हीं कुठलीं धर्मशास्त्रं ? म्हणे शास्त्रीबुवाची मुलगी ! आणि पुराण सांगते ! 'इन्दुप्रकाश' चे रकाने भरून आले म्हणजे कांहीं स्वर्गाला हात पोंचत नाहींत ! 'इंदुप्रकाश'चं काय—वाटेल त्यानं जावं, यन्द्यांच्या कानाला लागावं, कीं वाटेल ती बातमी वाटेल तशी छापण्यांत येते ! वर्णन 'केसरी' मध्यें आलं पाहिजे—तरच त्याला जगांत मान. 'इन्दुप्रकाश'नं केवढं लिहिलं, पण तुमच्या पुराणाबद्दल 'केसरी' मध्यें एक ओळ तरी आली आहे का ? 'अनंता'नं आपल्या बातमीपत्रांत सुद्धां कांहीं लिहिलं नाहीं. आणि लिहिलंच असतं तर मी कम्पोज उडवून दिला असता. माहेरच्या नांवानं मिरवायला लाज नाहीं वाटत ? नवरा मेलेला—ह्या ह्या हातानं मी त्याचा मुडदा सोनापुरांत नेऊन भाजला–तरी कपाळीं ढळढळीत कुंकू लावायला हात तरी कसे वहातात ? कलियुग बरं हें कलियुग ! सत्ययुग असतं तर हाताचे जळून कोळसे झाले असते ! पेशवाई असती तर भर चव्हाट्यावर तुला जिवंत जाळलं असतं. आतां काय तुझा आमचा सम्बध ? माहेरचं नांव लावतेस, कपाळीं हा मळवट भरतेस—काय तुझा आमचा संबंध ? आणि विम्याचे पैसे हवेत ! आधीं तें कुंकूं पुसून टाक तेव्हांच आमच्या घरांत अन्न मिळेल, नाहींतर दाही दिशा तुला मोकळ्या आहेत.—"

नानासाहेबांच्या तोंडाचा पट्टा सारखा सुरू होता. ते जें जें कांहीं बोलले तें तें लिहिण्यास माझे हात वहात नाहींत इतकी ती भाषा ओंगळवाणी होती.

बोलतां बोलतां प्रकरण शेवटीं हातघाईवर आलें. त्यांनीं माझे दोन्ही हात घट्ट दाबून धरून माझें कुंकू पुसण्यास प्रारंभ केला. मी अंगीं असेलनसेल तेवढें बळ खर्चून दोन्ही हात सोडवून घेतांच त्या धक्काबुक्कींत नानासाहेब खालीं पडले–आणि "पहा हो, हिनं मला मारलं !" असें मोठमोठ्यानें ओरडूं लागले. जाऊबाई आंतून धांवत आल्या आणि त्यांनींही शिव्यांचा सपाटा सुरू केला. लीला आणि

माली नुसत्या टकमक पहातच राहिल्या. नानासाहेब पडल्या जागेवरून उठेनात. शेजारचे कुणी लोक येतील म्हणून ते वाट पहात होते, पण कुणीच आलें नाहीं. नानासाहेब म्हणाले, " अरे–हे शेजारीपाजारी सारे मेले कीं काय ? कुणीतरी मला हात द्या. " जाऊबाईंनीं त्यांना हात धरून उठवलें. उभे रहातांच त्यांना आवेश चढला आणि अद्वातद्वा बोलण्याची त्यांनीं पराकष्ठा केली.

मी त्यांना म्हटलें, " माझ्या आईबापांचं नांव घेण्याचं कांहीं कारण नाहीं. ताईंना जर एक वांकडा शब्द बोलाल तर ती गोष्ट माझ्या कामीं येणार नाहीं. "

माझ्या तोंडचे हे शब्द ऐकतांच नानासाहेबांचा नुसता भडका उडाला.

" काय करशील ग—काय करशील ? माझा जीव घेशील ? माझा खून करशील ? "

बोलण्याच्या तिरमिरींत त्यांनीं माझ्या कंबरेंत एक लाथ मारली. मी दाराबाहेर रस्त्यावर पडलें.

मग नानासाहेब मला म्हणाले, " खबरदार घरांत पाऊल टाकशील तर ! "

माझी ट्रंक आणून त्यांनीं दाराबाहेर टाकली. ते दार बंद करीत होते इतक्यांत लीलेनें येऊन माझीं अभ्यासाचीं पुस्तकें माझ्या हातीं दिलीं. नानासाहेबांनीं लीलेला बखोटीला धरून घरांत घेतली आणि मग दाराला आंतून कडी घातली.

बाहेर काळोख पडला होता, सुमारें दहा वाजून गेले होते, रस्त्यावर कुणाची रहदारी नव्हती, त्यामुळें माझी ही विटंबना कुणाच्या नजरेस पडली नाहीं.

घराचें दार एकदां उघडलें गेलें आणि जाऊबाईंनीं माझा कुंकवाचा करंडाही बाहेर भिरकावून देऊन दार पुन्हां बंद केलें.

मी रस्त्यांतच ट्रंक उघडली, पुस्तकें आंत व्यवस्थित ठेवून दिलीं, कुंकवाचा करंडाही ठेवला आणि ट्रंकेला कुलूप लावलें. एवढी विटंबना झाली तरी मला रडूं आलें नाहीं.

मी विचार करीत तशीच ट्रंकेवर बसून राहिलें होतें. रस्त्यानें एक रिकामा टांगा जात होता त्याला हांक मारली आणि टांग्यांत बसून मी स्टेशनची वाट धरली.

ताईनें दिलेले दहा रुपये माझ्याजवळ होते. मी टिकीट काढलें आणि प्लॅटफॉर्मवर आलें. गाडी प्लॅटफॉर्मवर आली नव्हती त्यामुळें उतारूंची फार गर्दी झाली होती. गर्दी टाळून मी एका बाजूला एकटीच उभी राहिलें होतें. मी जरी

मुंबईचें टिकीट काढलें होतें तरी कुठें जावें ह्याचा कांहींच विचार केला नव्हता. मी तशीच उभी राहिलें असतां साहेबी थाटाचा पोषाख केलेला एक तरुण गृहस्थ माझ्या समोरून गेला. माझें त्याच्याकडे लक्ष नव्हतें, पण तो मला पाहून थांबला असावा असें मला वाटलें. मी उभी होतें त्या जागीं फारसा प्रकाश नव्हता त्यामुळें त्या गृहस्थाचा चेहरा मला नीटसा दिसला नाहीं. तो गृहस्थ मागें वळून माझ्या समोर आला आणि म्हणाला, " मथू ! "

माझ्या सर्वांगावर कांटा उभा राहिला, अंगाला थरकांप सुटला आणि जीभ अगदीं लुली पडली.

मला हांक मारणारा गृहस्थ चन्दू होता. माझ्या नांवानें हांक मारून तो माझ्यासमोर थांबला आणि मी कांहींच बोलत नाहीं असें पाहून म्हणाला,

" हें काय ? तूं एकटीच कुठं चाललीस ? बरोबर कुणी नाहीं का ? "

मी खुणेनें नुसतं ' नाहीं ' म्हटलें.

" मग एकटीच कुठं चाललीस ? " त्यानें पुन्हां विचारलें.

" जिकडे वाट फुटेल तिकडे. " मी खालीं मान घालून उत्तर दिलें.

कांहींतरी विलक्षण प्रकार झाला असावा असें माझ्या उत्तरावरून त्यानें ताडलें आणि मला पुढें कांहींच प्रश्न केला नाहीं. फक्त एवढेंच विचारलें,

" एकटीच कुठं बसशील ? "

" बायकांच्या डब्यांत. "

क्षणभर विचार करून तो म्हणाला,

" अनोळखी माणसांत एकटं बसणं मला धोक्याचं वाटतं. मी सेकंडक्लासांत आहें, तुझं टिकीट बदलून आणूं का ? "

मी कांहींच बोलत नाहीं असें पाहून तो म्हणाला,

" डब्यांत आणखीं माणसं आहेत. तूं बोलल्याशिवाय मी एक शब्दही तुझ्याशीं बोलणार नाहीं असं वचन देतों, पण तूं एकट्यानं प्रवास करणं मला धोक्याचं वाटतं. "

कांहीं न बोलतां मी माझें टिकीट खिशांतून काढून त्याच्याजवळ दिलें. त्यानें मला नेऊन सेकंडक्लासच्या डब्यांत बसवलें. तो डबा सहा माणसांचा होता आणि

सहाही जागा रिझर्व्ह केलेल्या होत्या. एका खालच्या बर्थवरून आपला उघडलेला बिछाना काढून त्यानें तो रस्त्याच्या दाराशीं टाकला आणि त्यांतील कांहीं पांघरुणें त्या रिकाम्या केलेल्या जागीं घालून मला त्यानें त्या बर्थवर बसावयास सांगितलें. डब्यांत असलेले बाकीचे उतारू चंदूचे सहाध्यायी होते. मी येण्यापूर्वी त्यांचा सारखा दंगा चालला होता, पण मी येतांच मन्त्र टाकल्याप्रमाणें सर्व गप्प राहिले. चंदूनें त्यांना बाजूला नेऊन कांहीं सांगितलें आणि त्यासरशीं कुणी आपली उशी कुणी रग वगैरे वस्तू आणून माझ्या बर्थवर ठेवून देऊं लागला.

गाडी सुरू होतांच चन्दूनें मला विचारलें,

" मुंबईला कुठं उतरणार कीं परभारें धक्क्यावर जाणार ?"

आमच्या बोलण्याकडे चंदूच्या सोबत्यांचें मुळींच लक्ष नाहीं असें पाहून मी हळूच म्हटलें, " गांवीं जावसं वाटत नाहीं. मुंबईत कुठं बोर्डिंगांत रहाण्याची सोय होणार नाहीं का ? माझं शेवटचं वर्ष आहे. शाळा चुकवून चालायचं नाहीं."

" मिशनरींचं बोर्डिंग चालेल का ?" कांहीं वेळ विचार करून चंदू म्हणाला.

" कुठंही डोकं टेकायला आधार मिळाला म्हणजे झालं, पण परक्याचे उपकार नकोत. कुणाच्या दारीं रहायचँ नाहीं. बोर्डिंग असावं, मग तें कुणाचंही असलं तरी चालेल !" मी खालीं मान घालून सांगितलें.

" ठीक आहे. उद्यांचा दिवस आमच्या डायमण्ड लॉजमध्यें उतरा. तिथें एक विद्यार्थिनी आहे, तिच्या खोलींत उद्यांचा दिवस रहातां येईल. ती खिश्चन आहे, पण कांहीं संकोच धरायला नको. परवांपासून बोर्डिंगांत जातां येईल अशी व्यवस्था करतों."

" घरीं पत्र लिहूं नये. सर्व हकीकतीचें पत्र मीच उद्यां ताईंना लिहीन."

इतकें बोलून आम्हीं सर्व झोंपीं गेलों.

सकाळीं स्टेशनवर उतरल्यावर मी सर्वांबरोबर डायमण्ड लॉजमध्यें गेलें. चंदूनें माझी मिस् डिक्रूझशीं ओळख करून दिली. स्वतंत्रपणें कुणाशींही इंग्रजींत बोलण्याचा माझा हा पहिलाच प्रसंग, कारण तिला मराठी येत नव्हतें. तिनें मला बरीच माहिती विचारली आणि मी इंग्रजींत व्यवस्थित रीतीनें उत्तरें दिलीं. मला इंग्रजी इतकें चांगलें बोलतां येतें असें पाहून माझें मलाच कौतुक वाटलें.

त्या दिवशीं संध्याकाळीं चंदू आमच्या खोलींत आला. त्याच्याबरोबर एक युरोपियन बाई आली होती. गिरगांवांत असलेल्या एका मिशनरी बोर्डिंगची ती सुपरिंटेंडंट होती. चंदूनें एक महिन्याच्या बिलाची रक्कम त्या बाईच्या स्वाधीन केली आणि एक दहा रुपयांची नोट माझ्यापुढें करून तो मला म्हणाला,

" ही राहूं दे. केव्हांतरी जरूर लागेल. मी मधूनमधून बोर्डिंगांत येऊन चौकशी करून जाईन. बिछान्याची नवीन वळकटी घेऊन बोर्डिंगांत नेऊन ठेवली आहे. वहिनींना पत्र लिहिलं का ? "

मी ' होय ' म्हणून उत्तर दिलें. नोट घ्यावी कीं न घ्यावी ह्या विचारांत मी होतें, पण तो ती माझ्या मांडीवर टाकून निघून गेला सुद्धां.

सुपरिंटेंडंटबाईचें नांव मिस् स्मिथ असें होतें. त्यांच्याबरोबर जायला निघण्यापूर्वी मी मिस् डिक्रूझचे आभार मानले आणि जिना उतरून खालीं आलें. दारांत व्हिक्टोरिया उभी होती आणि चंदूही तिथेंच आमची वाट पहात होता. आम्हीं गाडींत बसतांच गाडीवाल्याला चंदूनें भाडें दिलें आणि तसें केल्याचें आम्हांला सांगितलें.

अशा रीतीनें मी बोर्डिंगांत येऊन अधिष्ठित झालें.

बोर्डिंगांतील जेवणाची व्यवस्था दोन प्रकारची होती, एक शाकाहारी आणि एक मांसाहारी. शाकाहारी लोकांची जेवणाची व्यवस्था कशीबशी होती असें म्हटलं तरी चालेल. त्या तसल्या प्रसंगांत मला कुठेंतरी अन्नाचा आधार पाहिजे होता. पंचपक्वान्नें नको होतीं. मी त्याच मिशनच्या मुलींच्या शाळेंत जाऊं लागलें. तेथें सर्व शिक्षण इंग्रजींतून चालत असे. शिक्षकिणी बहुतेक युरोपियन असल्यामुळें पहिल्या पहिल्यानें मला थोडें जड गेलें. पुण्याच्या शाळेंत—मिशन स्कूल असलें तरी—सारा मराठींत व्यवहार असल्यामुळें पहिल्यानें ह्या शाळेंत मला चुकल्या-चुकल्यासारखें वाटूं लागलें. अनाथ खिस्ती मुलींखेरीज ह्या शाळेंतील बाकीच्या सर्व विद्यार्थिनी मुंबईतील श्रीमंत घराण्यांतील होत्या. त्यांत पारशी मुलींची संख्या जास्त होती. त्यामुळें परस्परांत बोलण्याचे व्यवहार इंग्रजींत चालत असत. ज्या कांहीं महाराष्ट्रीय मुली होत्या त्याही आपसांत बोलतांना इंग्रजींतच बोलत असत.

मी अगदीं नव्या जगांत आल्यासारखें मला वाटलें. एका मुलीनें मला ओळखलें. त्या मुलीचें नांव माणक. तिचें घर ठाकुरद्वारशेजारीं नवीवाडी आहे तिथें होतें. ती माझ्या पुराणाला आली होती. तिनें एके दिवशीं मला उघड उघड विचारलें.

एक क्षणभरच मनांत आलें, कीं कबूल करूं नये, पण वेळींच सावध होऊन मी खरें तेंच तिला सांगितलें.

हां हां म्हणतां ती बातमी सर्व शाळाभर झाली आणि शेवटीं स्मिथ्बाईंच्या कानापर्यंत गेली. स्मिथ्बाईंनीं त्या शनिवारीं संध्याकाळीं शाळेच्या हॉलमध्यें माझें पुराण करण्याचें ठरवलें. मिशनरींच्या आणि इतर मराठी आणि गुजराती शाळेंतील मुलींना आमंत्रण देण्यांत आलें होतें. संस्कृत जाणणारे कांहीं युरोपियन मिशनरीही हजर होते. दक्षिणी खिस्त्यांची तर बरीच गर्दी झाली होती. विल्सन कॉलेजचे प्रिन्सिपाल डॉ. मॅकिकन् आणि झेविअर कॉलेजमधले एक संस्कृतचे जर्मन प्रोफेसर फादर हेग्लिन हेही आले होते. ही बडी बडी मंडळी पाहून मी घाबरून गेलें. वयोवृद्ध आणि विद्वान् व्यक्तींसमोर यापूर्वी जरी माझें पुराण झालें होतें तरी हे साहेब लोक गोळा झालेले पाहून माझी घाबरगुंडी उडाली. देवाचें नांव घेऊन मी पुराणाला सुरवात केली. पुराणाच्या वेळीं मधूनमधून टाळ्यांचा कडकडाट करून लोकांनीं सारा हॉल दणाणून सोडला. व्यासपीठावरून मी खालीं उतरतांच मॅकिकन् साहेबांनीं माझ्याशीं हस्तांदोलन केलें. ते म्हणाले,

“ मी अतिशय आनन्दित आहें. ईश्वर तुम्हांला तारणाचा मार्ग दाखवो ! ”

“ जमलेल्या सर्व मोठ्या मंडळींनीं माझी तारीफ करण्याची शिकस्त केली. जातांना मॅकिकन् साहेबांनीं आपल्या गाडींत बसवून मला बोर्डिंगांत पोंचतें केलें.

मी बोर्डिंगांत परत येतांच स्मिथ्बाईंनीं माझ्याशीं हस्तांदोलन केलें आणि प्रसंशापर उद्गार काढले. त्या दिवसापासून बायूबलचा क्लास चुकवण्याची संधि मला मिळेनाशी झाली. उपदेशकानें मी आल्याशिवाय क्लास सुरू करूं नये, असें हरहमेश होत होतें.

एके दिवशीं स्मिथ्बाईंनीं रविवारीं चर्चमध्यें प्रार्थनेसाठीं मला आपल्याबरोबर नेलें. प्रार्थनेच्या वेळची टापटीप आणि व्यवस्थितपणा पाहून माझ्या मनावर फार परिणाम झाला. प्रार्थना मराठींतूनच झाली. सर्मन्हि एका मराठी खिस्त्यानें मराठींतूनच दिलें. बोलण्याची सरणी अगदीं बेडौल होती. त्या भाषेला मराठी भाषा कां म्हणावें हेंच मला कळेना.

चर्चमधून निघून बोर्डिंगांत आल्यावर बाईंनीं मला विचारलें,

“ आजचं सर्मन् कसं काय झालं ? ”

मी स्पष्टपणें सांगितलें, “ सर्मन मला मुळींच आवडलं नाहीं. ”

“ कां आवडलं नाहीं ? त्यांतील तत्त्वं तुला पटलीं नाहींत काय ? ”

“ तत्त्वाचा प्रश्न बाजूलाच राहो—पण मराठी भाषेची ही विटंबना माझ्यासारख्या ब्राह्मणाच्या मुलीला मुळींच सहन होत नाहीं. मूळ बायबलांतील वाक्य अगदीं सुबोध होतं, पण त्याच्यावर उपदेशकानं केलेली टीका अगदीं विपरीत होती. कांहींच न कळतां एकाद्या वेड्यासारखं तो कांहींतरी बहकत सुटला होता. ”

माझें भाषण ऐकून बाई हंसूं लागल्या आणि म्हणाल्या,

“ पुढल्या रविवारीं युरोपियन् उपदेशकाचं सर्मन् ऐकायला तुला घेऊन जाईन —तुझी येण्याला हरकत नाहीं ना ? ”

मी अर्थात्‌च ‘ नाहीं ’ म्हणून सांगितलें.

मधूनमधून चारदोन दिवसांनीं चन्दू माझ्या भेटीला येत असे. नुसती माझ्या प्रकृतीची चौकशी करायची, कांहीं जरूर आहे कीं काय तें विचारायचें आणि निघून जायचें, असा त्याचा क्रम होता. बोलतांना कधींही त्यानें माझ्या डोळ्याला डोळा दिला नाहीं. तो माझी जरूरी काय आहे हें मी न सांगतां ओळखून निरनिराळे जिन्नस आणून माझ्या खोलींत टाकीत असे. केव्हां केव्हां वाचनीय अशीं कांहीं इंग्रजी पुस्तकेंही मी न मागतां त्यानें मला आणून द्यावीं. अगदीं माझ्या मनांतलें ओळखून—मला न विचारतां—माझ्या गरजा भागवण्याची त्याची ही प्रवृत्ति पाहून मला कौतुक वाटलें. पूर्वीची हकीकत विसरून, संकोच सोडून मोकळेपणानें त्याच्याशीं बोलावें असेंही मनांत येऊं लागलें, पण ती आठवण कांहीं केल्या नाहींशी होईना. आज तो आल्यावर हा आपला बेत त्याला सांगायचा असा निश्चय करावा आणि तो येतांच आपोआप माझ्या तोंडाला खिळ पडावी, असें चाललें होतें.

ह्या मुदतींत ताईचीं दोनतीन पत्रें आलीं. त्यांत मिशनरी लोकांपासून सावध रहाण्याचा तिनें मला पुन्हां पुन्हां इशारा दिलेला होता.

त्या रविवारीं स्मिथ्‌बाई मला मोठ्या चर्चमध्यें घेऊन गेली. तिथें युरोपिअनांचा जमाव बराच होता आणि जे कांहीं हिंदी ख्रिस्ती होते, ते चांगल्या सुशिक्षित वर्गाचे असावेत असें मला त्यांच्या चर्येवरून वाटलें. सर्व व्यवहार इंग्रजींत चालला होता. उपदेशकाचा वर्णोच्चार स्पष्ट असल्यामुळें मला भाषा समजण्यास कठिण गेलें नाहीं. प्रार्थनादि सर्व विधी उरकल्यानंतर बाईनीं तेथील मुख्य मुख्य उपदेशकांशीं माझा परिचय करून दिला.

बोर्डिंगांत परत आल्यावर बाईनीं मला पूर्वीचाच प्रश्न विचारला. मी पूर्वींचेंच उत्तर दिलें. माझें उत्तर ऐकून बाई म्हणाल्या, "ह्या उपदेशकांची विचारसरणी तुला पटली नाहीं का ?"

"नाहीं म्हणायला मला कांहींच संकोच वाटत नाहीं. मूळ बायबलांतील वाक्य मला कोणत्याही रीतीनें अप्रयोजक वाटलं नाहीं, पण त्यावरचं व्याख्यान जरी विद्वत्ताप्रचुर होतं तरी बुद्धीला पटण्याजोगं नव्हतं. कदाचित् तुमच्या माझ्या विचारसरणींत फरक असेल––"

"तसंच असण्याचा जास्त संभव आहे. पण बायबलांतील मूळ वाक्य तरी तुला पटतं ना ?"

"न पटण्याजोगं असं त्यांत कांहींच नव्हतं."

मग थोडा वेळ थांबून बाईनीं विचारलें, "तूं बायबलचा अभ्यास केला आहेस का ?"

"फुरसतीच्या वेळीं मी बायबल वाचित असतें. मला तो ग्रंथ आमच्या धर्मांतील इतर कोणत्याही ग्रंथाइतकाच आवडतो."

माझें हें उत्तर ऐकून स्मिथ्‌बाईच्या मुद्रेवर आनंदाची छटा पसरली. त्या उत्सुकतेनें म्हणाल्या, "बायबल तुला आवडतं तर ? तुमच्या धर्मग्रन्थांशीं तुलना केली असतां बायबलचा दर्जा तूं कोणता लावशील ?"

"आमच्या धर्मग्रंथांच्या बरोबरीचा– मात्र त्यांतील वारंवार केलेला पापाचा उल्लेख मला कसाचाच वाटतो."

"पुन्हां लक्षपूर्वक बायबलचा अभ्यास कर आणि तुझं मत काय होतं तें मला सांग." इतकें बोलून बाई निघून गेल्या.

माझे परीक्षेचे दिवस जवळ येत चालले होते त्यामुळें मला अभ्यास फार जोरानें करावा लागत होता. बाईच्या सांगण्यामुळें नव्हे, पण माझ्या स्वतःच्या समाधानासाठीं मी त्यांतल्या त्यांत वेळ काढून बायबलचा लक्षपूर्वक अभ्यास करूं लागलें. माझ्या हातांत वारंवार बायबल दिसत असलेलें पाहून बाईनांही फार समाधान वाटत असे. एके दिवशीं त्यांनीं मला विचारलें, "कुठपर्यंत आला आहे तुझा बायबलचा अभ्यास ?"

"बायबलवर पुराण सांगण्याइतका."

माझें उत्तर ऐकून बाई आश्चर्यचकित झाल्या. त्या म्हणाल्या,

"काय ? तूं बायबलावर पुराण सांगशील ?"

मी आत्मविश्वासानें सांगितलें, "हो, सांगेन. नुसतं पुराण सांगेन एवढंच नव्हे, तर तुम्हां सर्वांना चार नव्या गोष्टीही ऐकवीन."

माझें हें उत्तर ऐकून बाई अगदींच थक्क झाल्या. माझ्या तोंडाकडे मिनिटभर पहात त्या म्हणाल्या, "तुझ्या धीटपणाचं मला कौतुक वाटतं. समज, मी बायबलवरचं तुझं पुराण होण्याची योजना केली तर तूं त्या पवित्र पुस्तकाची थट्टा तर करणार नाहींस ना ?"

मी हंसत म्हटलें, "कुणाच्याही धर्मग्रन्थाबद्दल मला माझ्या धर्मग्रंथाइतकाच आदर आहे."

माझें उत्तर ऐकून स्मिथ्‌बाई क्षणभर स्वस्थ राहिल्या आणि कांहींच न बोलतां मुकाट्यानें उठून निघून गेल्या.

# प्रकरण चौदावें     शेवटचा दुवा

माझी प्रिलिमिनरी परीक्षा झाली. रिझल्ट् लागण्यास अवकाश होता, तितक्यांत माझें बायबलवर पुराण होण्याचें ठरलें. पुराण शाळेच्या हॉलमध्येंच होणार होतें. अनधिकारी उपदेशकाला चर्चमध्यें सर्मन् देण्याची मोकळीक नव्हती. पूर्वीच्या प्रमाणेंच हॉलमध्यें गर्दी होती, पण ह्या वेळीं युरोपिअनांची संख्या मात्र जास्त होती. वर्तमानपत्रांच्या रिपोर्टरांनीं हजर रहाण्याचा प्रयत्न केला, पण त्यांना मज्जाव करण्यांत आला. सभा खाजगी स्वरूपाची होती आणि कुणालाही बंदी करण्याचा चालकांना अधिकार होता. कांहीं ठराविक मास्तरलोकांखेरीज हिंदूंना येऊं दिलें नव्हतें.

पुराण सुरू होण्यापूर्वी बाईंनीं मला एका बाजूला नेऊन सांगितलें, "आजचे श्रोते सर्व ख्रिस्ती आहेत हें ध्यानांत ठेव. बायबलविषयीं त्यांना अतिशय आदर आहे आणि त्याविरुद्ध तूं कांहीं बोललीस तर त्यांचीं मनं दुखावल्याचं पाप तुझ्या माथीं येईल. पुराण बायबलला धरून झालं तर त्यांत तुझं कल्याण होईल, पण त्याविरुद्ध गेलीस तर तुझ्यावर कोणता प्रसंग येईल हें मला सांगतां येणार नाहीं."

"ईश्वर मला जशी बुद्धि देईल तसंच मी बोलणार आहें. परिणाम कोणत्याही प्रकारचा झाला तरी मला त्याचं सुख नाहीं किंवा दुःखही नाहीं."

त्याच वेळीं आणखी एक मिशनरी गृहस्थांनीं येऊन मला बाईंच्यापेक्षांही अधिक कडक शब्दांत समज दिली आणि मीही त्यांना तेंच उत्तर दिलें.

पुराणासाठीं मी बायबलमधील खालील वाक्य घेतलें होतें:—

"And he that loveth father or mother more than me is not worthy of me; and he that loveth son or daughter more than me is not worthy of me."

"And he that taketh not his cross, and followeth after me, is not worthy of me."

"He that findeth his life shall lose it: and he that loseth his life for my sake shall find it."

मी पहिल्यानें ह्या मुळाचा शुद्ध मराठींत तर्जुमा करून सांगितला. तो बायबलच्या प्रचलित मराठी भाषान्तराहून बराच भिन्न होता. माझा तर्जुमा खालील-प्रमाणें होता:—

" जो कोणी माझ्यापेक्षां आईबापांची भक्ति अधिक मानतो तो माझा भक्त होण्यास अपात्र होय; जो कोणी माझ्यापेक्षां पुत्रकन्यादिकांवर अधिक भक्ति करतो तो माझा भक्त होण्यास अपात्र होय."

" आणि जो कोणी प्रारब्धाचा बोजा स्कन्धीं घेऊन मला अनुसरत नाहीं तो माझा भक्त होण्यास अपात्र होय."

" जो जीवनाच्या ठायीं लम्पट होतो तो जीवन हारवून बसतो, पण माझ्यासाठीं जो जीवनाचा त्याग करतो तो जीवन्मुक्त होतो."

तर्जुमा सांगतांच श्रोत्यांत थोडीशी खळबळ सुरू झाली. मी माझ्या निरूपणाला प्रारंभ केला. हिन्दूंच्या दृष्टीनें ह्या वाक्यावर माझें प्रवचन सुरू होतें. मधूनमधून गीतेंतील, भागवतांतील, क्वचित् उपनिषदांतीलही आधार मी देत असें, त्यावेळीं संस्कृत जाणणारे युरोपियन् मिशनरी एकमेकांकडे पाहूं लागत. त्या आधारांचें आणि बायबलांतील वाक्याचें साम्य दाखवण्यासाठीं मूळ वाक्याचा मी संस्कृतांत तर्जुमा केला, तो ऐकून झेविअर कॉलेजचे प्रोफेसर 'शाबास' म्हणून अगदीं मोठ्यानें ओरडले.

पुराण सुमारें पन्नास मिनिटें झालें.

पुराण संपल्यावर सर्व युरोपिअन् मिशनरींनीं येऊन माझ्याशीं हस्तांदोलन करून माझी फार तारीफ केली आणि माझें पुराण चर्चमध्यें होण्याच्या लायकीचें झालें असे उद्गार काढले. मॅकिकन्साहेबांचा आनन्द तर गगनांत मावेना. त्यांनीं माझ्या गळ्यांत एक भला मोठा हार घातला आणि पूर्वीप्रमाणेंच आपल्या गाडींतून मला बोर्डिंगांत नेऊन पोंचवलें.

खोलींत गेल्यावर मी बाईंना विचारलं, " ख्रिस्ती लोकांचीं मनं दुखावण्याजोगं कांहीं झालं नाहीं ना ? "

बाई हंसत म्हणाल्या, " मुळींच नाहीं. तुझं म्हणणंच शेवटीं खरं ठरलं ! 'ह्या मुलीनं आज आम्हांला चार नव्या गोष्टी ऐकवल्या'—असं अधिकारी व्यक्तींनीं सुद्धां म्हटलं. एका वृद्ध मिशनरींनीं 'हीच खरी ख्रिस्ती' आहे, असे अगदीं सार्वजनिकरीत्या उद्गार काढले. एवढ्या धर्मग्रंथांचा अभ्यास इतक्या अल्पवयांत तूं केलास तरी केव्हां ? "

"माझे वडील एक विद्वान् शास्त्री आहेत. त्यांच्याच शिक्षणानं मला हें ज्ञान प्राप्त झालं. लहानपणापासून त्यांनीं मला संस्कृतचं शिक्षण दिलं त्याचाच हा परिणाम."

"तुझ्या वयाच्या मानानं तुझी तयारी फार उत्तम आहे. परदेशांत जाऊन जर तूं व्याख्यानं देशील तर कीर्ति आणि पैसा ह्या दोहोंचाही तुला चांगला लाभ होईल."

मी नुसती हंसलें.—त्या वेळीं ती म्हणाली, "हंसूं नकोस, मी अगदीं मनःपूर्वक बोलतें आहें."

"तुम्ही म्हणतां तें सर्व खरं, पण परदेशीं जाणं माझ्यासारख्या एका अनाथ हिन्दु मुलीला किती अशक्य आहे ह्याची तुम्हांला कल्पना आहे का? नकाशापलीकडे परदेशाची मला माहिती नाहीं. अजूनपर्यंत मी मुंबईसुद्धां नीटशी पाहिली नव्हती. सासरच्या माणसांनीं मला टाकलं आहे. बापाचं घरही मला पारखं झालं आहे. एका दूरच्या नातलगानं माझा इथला खर्च चालवला आहे. अशा स्थितींत मी एक अनाथ विधवा परदेशांत कशी जाणार?"

बाई आश्चर्यचकित होऊन म्हणाल्या, "तूं विधवा? मग तुझ्या कपाळीं हें कुंकूं कसं?"

"स्त्रियांच्या कपाळींचं कुंकूं हें हिन्दुत्वाचें लक्षण आहे. वैधव्याचा त्याच्याशीं कांहीं संबंध नाहीं, असा माझा प्रामाणिक समज झाल्यामुळं रूढाचाराची पर्वा न करतां किंवा लोकांच्या टीकेलाही न जुमानतां मी कुंकूं लावित असतें."

"खरोखरच तुझ्या धैर्याचं मला फार कौतुक वाटतं."

"सत्यासाठीं जगाची भीति मी कां बाळगूं? ह्या एका कुंकवाच्या पायीं माझा किती छळ झाला आहे ह्याची तुम्हांला कल्पना करतां येणार नाहीं."

बाई ह्यापुढें जें कांहीं बोलल्या त्याचा उल्लेख न करणेंच बरें. ती माझी केवळ अवास्तव स्तुति होती.

माझा प्रिलिमिनरीचा रिझल्ट् लागला आणि त्यांत मी पास होऊन माझा दुसरा नंबर आला.

ही हकीकत कळतांच चन्दूला फार आनन्द झाला. नित्याप्रमाणें उभ्याउभ्यानें बोलून न जातां त्या दिवशीं तो कांहीं वेळ बसून राहिला. ही अप्रयोजक अढी

काढून टाकण्याचें माझ्या मनांत होतेंच—त्याच्याही मनांत तोच विचार आल्याचें दिसल्यावरून मी म्हटलें, "मला वाटतं, झाला एवढा हा लुटुपुटीचा खेळ पुरे झाला. जसा मला संकोच वाटत होता, तसाच तुलाही वाटत होता. पुण्याच्या स्टेशनवर भेट झाल्यापासून मी पूर्वीचं नातं विसरून तुला 'अहो जाहो' म्हणत होतें, पण तसं म्हणतांना मला किती कष्ट होत होते! खोटेपणाची मला मनापासून चीड आहे, पण आजपर्यन्तचं माझं तुझ्याशीं वागणं खोटं होतं. अंतःकरण एक सांगत होतं आणि वर्तन भलतंच होत होतं. उघड उघड बोलण्याची संधिच मुळीं येत नव्हती—नव्हे, अशी संधि मिळण्याचं आपण मुद्दामच टाळीत होतों नव्हे का?"

चन्दू नजर वर न करतां म्हणाला, "असं तर खरंच!—पण मीच सर्वस्वी अपराधी होतों. तो अनपेक्षित योग आला नसता तर तुझी माझी भेटही झाली नसती. तुझ्या भेटीची कल्पना येतांच मला भीति वाटत असे. माझ्या अविचाराबद्दल मला पूर्ण पश्चात्ताप झाला होता, पण तो तुला कळूं नये असंच मला सदोदित वाटत असे. ईश्वरी योगायोग निराळा होता म्हणूनच आपली ही पुन्हां गांठ पडली आणि आज मन उघडं करून बोलण्याची संधि मिळाली."

क्षणभर आम्हीं दोघेंही स्वस्थ राहिलों. पुन्हां बोलण्यास सुरवात कशी करावी हें कांहीं मला सुचेना. मी म्हटलें, "परीक्षा संपल्यावर मी गांवीं जायचा विचार केला आहे."

चन्दू नुसतें म्हणाला "असं का?"

पुन्हां कांहीं वेळ आम्हीं गप्प राहिलों. आतां चन्दूनें बोलायला सुरवात केली. "तुझ्या पुराणाची मुंबईत जिकडे तिकडे ख्याति झाली आहे. विशेषतः तुझ्या बायबलवरच्या पुराणानं ख्रिस्ती समाजांत फार खळबळ उडाली आहे. आमच्या कॉलेजांतला एक ख्रिस्ती विद्यार्थी त्या दिवशीं त्या पुराणाला हजर होता, त्यानं मला सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून मला फारच अभिमान वाटला अन् तुझ्या अंगीं असे किती झांकले गुण आहेत ह्याचा मी विचार करूं लागलों." असें म्हणून खालीं जमिनीकडे पहात तो स्वस्थ राहिला.

"स्मिथ्‌बाई म्हणत होत्या, कीं मी परदेशीं जाऊन व्याख्यानं द्यावीं."

चन्दूनें चट्कन् वर पाहिलें. माझ्या नजरेला नजर भिडतांच तो दचकला—आणि म्हणाला, "अगदीं हीच कल्पना—त्या दिवशीं ह्याच कल्पनेबद्दल आम्हीं

बोलत होतों—पण तें व्हावं कसं ? हीं मुबलक पैशाचीं कामं आहेत. अशा कामीं राजाश्रयाची जरूर आहे. जर तसं कांहीं जुळून येईल तर केवढी बहार होईल ? ”

त्याच विषयावर आम्हीं आणखी किती तरी वेळ बोलत होतों. बोलण्यांतून अर्थात् काहींच निष्पन्न झालें नाहीं. परस्परांशीं बोलावें असें आम्हांला वाटत होतें म्हणून विषय मिळतांच त्यावर बोलत राहिलों एवढेंच.

कांहीं वेळानें माझा निरोप घेऊन चन्दू निघून गेला. त्याच्या चेहऱ्यावर आज पुन्हां तो त्याचा स्वाभाविक हंसरेपणा आला होता. संकोचाचें पटल दूर झालें आणि पुन्हां 'नवा डाव नवा पाव'ला सुरवात झाली. मलाही मनावरचा भार हलका झाल्यासारखें वाटत होतें.

पण लगेच भार हलका झाला कीं भार वाढला हें मला समजेनासें झालें.

संकोचामुळें मी त्याची इतके दिवस आठवण सुद्धां काढीत नसें, पण आतां क्षणोक्षणीं त्याचीच आठवण होऊं लागली. लहानपणच्या गोष्टी आठवूं लागल्या. पुराणांचे प्रसंग पुन्हां नजरेसमोर उभे राहिले. पुराणाला कारण सर्वस्वी तोच, हीही आठवण झाली आणि त्यानन्तरच्या आठवणीनें पुन्हां हृदयाला कंप सुटला.

पुन्हां तेच शब्द ऐकूं येऊं लागले.

मी बळेंच एक पुस्तक घेऊन वाचायला आरंभ केला पण वाचण्याकडे लक्ष लागेना. मी पुस्तक फेंकून दिलें आणि ईझिचेअरवर पडलें.

पुन्हां पुन्हां तेच शब्द ऐकूं येत होते. समोरच्या खुर्चीवर बसून चंदू तेच शब्द पुन्हां पुन्हां विचारीत आहे असा भास होऊं लागला.

मी घाबरीघुबरी झालें आणि उठून खोलींत शतपावली घालूं लागलें.

इतक्यांत जेवणाची घंटा झाली. त्या विक्षेपामुळें माझें मन पुन्हां ताळ्यावर आलें.

* * * *

आज माझी परीक्षा संपली. मंडपांतून बाहेर पडतांच चंदू मला भेटला. मधल्या काळांत त्याची माझी भेट झाली नव्हती. त्यानें मला विचारलें, “ पेपर्स कसे काय गेले आहेत ? ”

“ सर्व पेपर्स चांगले गेले आहेत, पण संस्कृतच्या पेपरची थोडी भीति वाटते—म्हणजे त्यांत मी नापास होईन असं नव्हे—पण जितके मार्क मिळवीन अशी मला खात्री होती तितके मार्क मला बहुतेक मिळणार नाहींत. संस्कृतचा पेपर लिहितांना पुराणांची आठवण होऊन माझें चित्त व्यग्र झालं आणि त्यामुळं हें असं झालं. ”

" कांहीं हरकत नाहीं, नुसतं पास होण्यापुरते मार्क मिळाले तरी पुरे आहे."

मी जरा टोंचून म्हटलें, " खरंच तें–तूं जगन्नाथशंकरशेट स्कॉलर झाला होतास, दुसऱ्यानं तसं व्हावं असं तुला कसं वाटेल ? "

चंदू रागावून म्हणाला, " हें बोलणं मात्र तुला शोभत नाहीं मथू ! माझ्या म्हणण्याचा उद्देश तसा नव्हता. तुझ्या पहिल्या सांगण्यावरून संस्कृतांत तूं अगदींच घसरणार असा माझा समज करून दिलास–तेव्हां अर्थातच मी तसं म्हटलं."

मी हंसून म्हणालें, " थट्टा सुद्धां समजत नाहीं ना चन्दू तुला ? मेडिकल कॉलेजांत गेल्यापासून तूं बराच रुक्ष होऊं लागला आहेस ! "

चंदू बावरल्या मुद्रेनें म्हणाला, " असं झालं आहे खरं. मी आतां पूर्वीचा राहिलों नाहीं. मेडिकल कॉलेजांत आल्यापासून माझ्या स्वभावांत एकदम फरक पडल्याचं माझं मलाच दिसून येतं आहे. "

आम्हीं ट्रॅममध्यें बसलों आणि गिरगांवच्या नाक्यावर आलों. तिथून बोलत बोलत आम्हीं माझ्या बोर्डिंगांत गेलों. खोलींत आल्यावर चंदूनें मला विचारलें,

" आतां गांवीं केव्हां जाणार आहेस ? "

" रिझल्ट लागेपर्यंत उगीच इथं कशाला दिवस काढूं ? एक दोन दिवसांत जाईन असं म्हणतें आहें. "

" गांवीं न जाशील तर बरं होईल. "

त्याच्या ह्या सूचनेचें मला फार आश्चर्य वाटलें. तो पुढें म्हणाला,

" काकांचीं कांहीं पत्रं आलीं आहेत, त्यावरून तुझ्यासंबंधीं गांवांत खळबळ उडाली आहे असं वाटतं. मी तीं पत्रं तुला दाखवलीं असतीं, पण त्यांत माझा कांहीं खासगी मजकूर आहे. " असें म्हणून जीभ चावून तो स्वस्थ बसला.

" नशिबीं काय असेल तें होईल, पण एकदां ताईची तरी भेट होईल. परीक्षा पास झालेंच तर पुढं काय करायचं ह्याबद्दल काकांचा आणि ताईचा विचार घेतां येईल–आणि सर्वांत विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे इथल्या ह्या जेवणाला मी अगदीं कंटाळलें आहें तो एकदां रुचिपालट होईल. "

चन्दू हंसत हंसत म्हणाला,

" मग रुचिपालट करण्यासाठीं उद्यां आमच्या क्लबांत जेवायला येतेस का ? "

मी चटकन् ' होय ' म्हणून गेलें आणि मग मला कसेंसेंच वाटलें.

चन्दू एकदम उठला आणि म्हणाला, " तर मग आतां उद्यां सकाळींच तुला न्यायला येईन. " असें म्हणून तो तडक निघून गेलासुद्धां.

चंदू निघून गेल्यावर मी कांहीं वेळ स्वस्थ बसून राहिलें होतें. डायमण्ड लॉजमध्यें जेवायला जाण्याचें कबूल केल्याबद्दल मला पश्चात्ताप होत होता असेंच जरी नव्हे, तरीही त्या विचारानें माझें मन क्षुब्ध झालें होतें खास ! तिथें सर्व पुरुष मंडळी होती. त्यांत मी एकटीच बायकोमाणूस जाणार होतें. पुराणांनीं मला एकप्रकारची प्रख्याती आली होती. त्या प्रख्यातीमुळें त्या पुरुषमंडळींत वागतांना माझी फजिती होईल कीं काय अशी मला शंका वाटूं लागली. रस्त्यांतून जातांना मुंबईत मला पुण्याप्रमाणें केव्हांही त्रास झाला नाहीं. कपाळींच्या कुंकवानें माझा बचाव केला अशी माझी ठाम समजूत होती. पुण्याला असतांना पुरुष म्हटला, कीं मला त्याची भीति वाटत असे, पण इथें ती भीति मावळत चालली होती. ख्रिस्ती पुरुषांनीं तर मला फारच आदरानें वागवलें होतें. आतां हिंदु पुरुषांत जाण्याचा प्रसंग होता. ही कसोटी कशी काय उतरते ह्याकडे माझें लक्ष लागून राहिलें. उद्यां क्लबांत गेल्यावर आपण स्त्री आहोंत हें विसरूनच वागण्याचा मी निश्चय केला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं चन्दू येऊन मला डायमण्ड लॉजमध्यें घेऊन गेला. तेथें एका खोलींत कमीजास्त वयाचे सातआठ विद्यार्थी बसले होते. मी येतांच त्या सर्वांनीं उठून मला उत्थापन दिलें, तें पाहून मी मनांतल्या मनांत जरी थोडी शरमल्यासारखी झालें तरी बाहेर कांहींच दिसूं न देतां ऐका खुर्चीवर जाऊन बसलें. मग त्यांच्यामधला एक बराच पोक्त वयाचा विद्यार्थी मला म्हणाला,

" तुम्हीं आलांत हें पाहून मला फार आनन्द झाला. तुम्हांला एकवार तरी इकडे घेऊन यावं म्हणून भालचन्द्राला आम्हीं किती दिवस सांगत होतों, पण तो मनावरच घेत नव्हता. शेवटीं आज तो योग जमून आला. "

चन्दू म्हणाला, " तो त्यांचा अपराध नव्हे. मीच त्यांच्याकडे गोष्ट काढली नाहीं. ह्यापूर्वीच मी बोलावलं असतं तर त्या आल्या असत्या अशी माझी खात्री आहे."

दुसरा एक विद्यार्थी म्हणाला, " आमच्या इकडे एकवार यांचं पुराण व्हावं अशी पुष्कळांची इच्छा होती. "

मी म्हटलें, " माझा बहुतेक काळ खेड्यांत गेला आहे. त्यानन्तर पुण्यांत तुमच्यासारख्या सुसंस्कृत मंडळींत मिसळण्याचा ह्यापूर्वी मला कधींच प्रसंग आलेला नाहीं. पुण्यांत पुरुषांचा मला जो अनुभव आला होता त्यामुळं

पुरुषांविषयीं माझ्या मनांत अनादर उत्पन्न झाला होता. इथं आल्यावर सारीच पुरुषजात तशी नाहीं असं वाटूं लागलं. आम्हां स्त्रियांविषयीं खिस्ती लोकांप्रमाणें तुम्हीं फाजील आदर दाखवावा असं माझं म्हणणं नाहीं—आम्हांला पुरुषांनीं नुसतं सभ्यपणानं वागवलं तरी पुरे."

तिसरा एक विद्यार्थी म्हणाला, "तुमचं म्हणणं अगदीं बरोबर आहे. पुण्यांत माझे कांहीं दिवस गेले आहेत. तिथल्या बहुतेक लोकांचा शिक्षित स्त्रियांविषयींचा अनादर पाहून मलाही चमत्कारिक वाटत असे.—पण पुण्याचे सर्वच लोक तसे नाहींत. तिथंही अशी कांहीं मंडळी आहे, कीं त्यांनीं तुम्हांला उत्तेजनच दिलं असतं. पण त्या मंडळीशीं तुमचा संबंध आला नाहीं असं दिसतं."

मी म्हटलें, "तसंही असेल कदाचित्—कारण मी अगदीं बाजूला पडलेली होतें. तुम्हीं म्हणतां तशा प्रकारची मंडळी माझ्या पाहण्यांत आली नाहीं. तिथंही मी मिशनरी लोकांच्या शाळेंत जात असें."

दुसरा एक विद्यार्थी म्हणाला, "तुम्हीं बायबलवर पुराण सांगितलंत असं मी ऐकलं. हिंदुधर्माच्या दृष्टीनं हा गुन्हा झाला असं तुम्हांला नाहीं का वाटत ?"

मी हंसून म्हटलें, "असं कां वाटावं ? कोणत्याही धर्माचा द्वेष आपण कां करावा ? निरनिराळ्या धर्मांचे ईश्वर निराळे आहेत का ? ईश्वराच्या विभूति तेवढ्या सर्वत्र सारख्याच. गीतेंत आपल्याला असंच सांगितलेलं नाहीं का दिसून येत ? 'यद्यद्विभूतिमत्सत्वं श्रीमदूर्जितमेववा । तत्तदेवावगच्छत्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥' गीतेवर माझा विश्वास आहे आणि गीतेच्या न्यायानं पाहिलं तर बायबलवर पुराण सांगण्यांत मी अधर्म केला असं मला मुळींच वाटत नाहीं. जास्त व्यापक दृष्टी करून पहाल तर आपल्यालाही तसं वाटणार नाहीं."

मी बोलून गेलें खरी, पण माझें मलाच ओशाळल्यासारखें वाटलें. माझ्यापेक्षां जास्त वयाच्या आणि जास्त विद्वान व्यक्तींसमोर मी माझ्या विद्वत्तेचें प्रदर्शन करायला गेलें, असें तर त्यांना नाहीं ना वाटणार ?

तो विद्यार्थी पुन्हां म्हणाला, "पण समजा, पुराण सांगण्यासाठीं बायबल वाचतां वाचतां त्या ग्रंथाबद्दलचं प्रेम वाढत जाऊन खिस्तीधर्माकडे तुमचं मन झुकेल असं माझ्यासारख्याला वाटलं, तर तें गैर होईल का ? बायबलबद्दलच्या तुमच्या आदराचा फायदा घेऊन खिस्ती मिशनरी तुमच्यावर झडप घालतील अशी आम्हांला तरी भीति वाटते."

मी निश्चयपूर्वक म्हटलें, "तसं झालं तर माझ्या धर्माचीं तत्त्वं मला कळलींच नव्हतीं असं म्हणावं लागेल."

तो पुन्हां म्हणाला, "एकूण ख्रिस्तीधर्मापेक्षां आमचा धर्म जास्त श्रेष्ठ आहे असं तुमचं ठाम मत झालं आहे का ?"

मी म्हटलें, "मी ज्या धर्मांत जन्म घेतला तो धर्म माझा आहे. सुदैवानें त्या धर्माचीं तत्त्वं मानवाला पूर्णावस्थेला पोंचवणारीं आहेत. त्या धर्माचा अभ्यास अजून सांगोपांग रीतीनं करण्याची संधि मला मिळाली नाहीं. माझ्या धर्माचा अभ्यास पूर्ण झाल्याशिवाय इतरांच्या धर्माचे परिणाम मनावर घडूं न देण्याइतकं माझं मन खंबीर आहे."

इतक्यांत दुसराच एक विद्यार्थी म्हणाला, "मी प्रश्न विचारतों त्याचा राग मानूं नका, पण तुम्ही विधवा असून कुंकू लावतां हा अधर्म नाहीं का होत ?"

मी उत्तर दिलें, "धर्म विचारांत आहे, आचारांत नाहीं. आचार मनुष्यप्रणित आहेत. तुम्हीं माझ्यासारखे विधवा असतां, कपाळीं कुंकू नसल्यानं विधवापणाचा शिक्का मिरवित फिरण्याचा प्रसंग तुमच्यावर आला असता आणि पुण्याच्या निष्ठुर आणि निर्लज्ज लोकांकडून माझ्यासारखाच तुम्हांला त्रास झाला असता म्हणजे तुम्हीं असा प्रश्न केला नसता."

माझ्या उत्तरानें तो ओशाळला, पण आपण हटलों नाहीं असें दाखवण्यासाठीं तो पुढें म्हणाला, "धर्माच्या आज्ञा पाळण्यासाठीं छळ झाला तरी तो सहन केला पाहिजे, असं नाहीं का तुम्हाला वाटत ?"

मी उत्तर दिलें, "कुठली धर्माची आज्ञा? सनातन आर्यधर्म नुसता विधवेच्या फटफटीत कपाळावर का सांठवला आहे ? विधवांनीं कुंकू लावूं नये म्हणून उपनिषदानीं सांगितलं आहे का ? वेदांनीं सांगितलं आहे का ? कुंकू लावण्याची पद्धत केव्हांपासून प्रचारांत आली ह्याची तरी तुम्ही चौकशी केली आहे का ? हें कपाळींचं कुंकू म्हणजे आम्हां स्त्रियांची ढाल आहे. तुम्हां पुरुषांचे पापमय वार चुकवण्याचं हें आमचं रक्षणाचं साधन आहे. आपण विधवा आहों अशी क्षणभर कल्पना करा, विधवेची असहाय स्थिति लक्षांत घ्या, समाजाची पूर्वीची स्थिति आणि आजची स्थिति ह्यांत किती फरक पडला आहे त्याचा नीट विचार करा आणि नंतर मी अधर्म केला असं म्हणा."

पहिल्यानें बोलणारे पोक्त विद्यार्थी म्हणाले, “तुमचं म्हणणं अगदीं सयुक्तिक आहे. मनावरील संस्कारामुळं रूढी मोडली म्हणजे तो अधर्म वाटतो, पण धर्म म्हणजे काय हेंच आम्हांला कुठं कळलं आहे आधीं? आम्ही नुसते पोटाच्या मागं लागलों आहोंत. धर्माबद्दल आम्हीं विचार सुद्धां केला नाहीं. आमचा धर्माभिमान म्हणजे नुसत्या शिळोप्याच्या गप्पा आहेत.”

थोडा आत्मविश्वास येऊन मी पुढें बोलूं लागलें, “कांहीं तरी कारणं सांगून किंवा आडवं तिडवं बोलून मला वादविवाद बंद करायचा नाहीं. कुंकूं लावण्याचं माझं खरं कारण मी आतांपर्यंत सांगितलेल्या कारणाहूनही निराळं आहे. मुलीला कळूं लागायच्या पूर्वीपासून आम्ही कुंकूं लावतों—लग्नाच्या वेळीं लावित नाहीं. लग्न झालं असं दाखवण्याचं साधन म्हणजे मंगळसूत्र आहे. कुंकूं, बांगड्या किंवा नाका-कानांतील इतर भूषणं हीं मुलींची जन्मादारभ्य स्वतःचीं लेणीं आहेत. पतीनं गळ्यांत बांधलेलं मंगळसूत्र विधवा होतांच काढून ठेवलं तर तें अर्थातच योग्य होतं, पण जन्मापासून लावित असलेलं कुंकूं पतिवियोगाचं निदर्शक म्हणून पुसण्याचा कुणाला काय अधिकार? कुंकवावर पतीची सत्ता आहे असं मला वाटत नाहीं आणि तुम्हींही थोडा सारासार विचार करून पहाल तर तुम्हांलाही तसं वाटणार नाहीं. नुसता रूढाचार म्हणून कुणाच्या तरी कपाळींचं कुंकूं पुसून ही विधवा आहे असं जगाला डांगोरा पिटून दाखवण्याची ही रूढी निर्दयपणाची आहे. निर्बल स्त्रियांच्या रक्षणाच्या दृष्टीनं धोक्याची आहे. आतां मी कुंकूं लावून फिरूं लागलें तेव्हांपासून चटोर लोकांकरवीं मला होणारा त्रास नाहींसा झाला हा माझा प्रत्यक्ष अनुभव आहे.”

तो विद्यार्थी म्हणाला, “माझ्या शंकेचं समाधान झालं. आतां माझं कांहीं म्हणणं नाहीं.”

मग जेवणाची वेळ झाल्यामुळें आम्हीं सर्व मंडळी जेवायला बसलों.

त्यानन्तर ह्या विषयासंबंधीं चर्चा निघाली नाहीं.

त्या सर्व विद्यार्थ्यांनीं मला फार लोभानें वागविलें. मी जाईपर्यंत कोणत्याही प्रकारचा परकेपणा मला भासूं दिला नाहीं. बोर्डिंगांत आल्यावर त्या दिवशीं घडलेल्या गोष्टींचा मी विचार करूं लागलें. सार्वजनिक पुरुषमंडळींत बसून गंभीर विषयांची चर्चा करण्याचा तो माझा पहिला प्रसंग होता. त्या विद्यार्थ्यांनीं मला ज्या रीतीनें वागवलें त्यामुळें स्त्रीपुरुषभेदाची कल्पना माझ्या मनांत आली नाहीं. जगांत ह्यापुढें असेच अनुभव मला येतील का?

जगाचा अनुभव असाच असेल तर पुढील आयुष्य सुखासमाधानानें घालवण्
आशा वाढविण्यास मला आधार मिळाल्यासारखें वाटलें. सर्वच माणसें अशीं नस
ह्याची मला जाणीव होती, पण कांहींतरी आणि कुठें ना कुठेंतरी सारासार वि
आणि चांगुलपणा अस्तित्वांत आहे हें कळलें आणि तेवढेंच मनाला धीर येण्
साधन झालें. ह्यापूर्वी जग मला भयाण वाटत होतें, पण आतां ती भीति कमी
लागली. माझें आयुष्य सुखाचें होणार नाहीं हें पदोपदीं मला जाणवत होतें,
दुःखाच्या प्रसंगीं समाधानाला जागा मिळेल कीं न मिळेल अशी जी मला
वाटत होती ती आतां दूर झाली.

दुसऱ्या दिवशीं मी कोंकणांत जायला निघालें. ताईच्या घरीं येऊन पोंच
मला अतिशय आनन्द झाला. नानासाहेबांनीं लाथ मारून मला घराबाहेर का
त्यावेळीं पुढें माझी काय स्थिति होणार ह्याचा अंदाज मला राहिला नव्ह
मी त्या वेळीं स्टेशनवर आलें, पण पुढें कुठें जाणार ह्याची योजना केली नव्ह
मला जिवाचा कंटाळा आला होता. ताईच्याही घरीं जाऊं नये असें त्या
वाटलें होतें. योगायोगानें चंदूची भेट झाली नसती तर कदाचित् मी जि
बरेंवाईटही करून घेतलें असतें.

पुण्याची हकीकत ताईला सांगतांना ही माझी मनःस्थिति मी त्या
तिच्यापासून लपवून ठेवली नाहीं. माझी हकीकत ऐकतांच तिला रडें कोसळ
तिला नानासाहेबांचा भयंकर तिटकारा आला. काकांनीं तर त्यांना नाहीं न
तें बोलण्यास सुरवात केली. त्यावेळीं ताई म्हणाली, " जो तो माणूस आपाप
समजाप्रमाणं वागत असतो. मलाही नानासाहेबांचा राग आला आहे,
उगीच त्यांना दोष देण्यांत तरी काय अर्थ ? जगांत वागतांना वारंवार असे प्र
यायचेच. हजार मतांच्या हजार माणसांशीं संबंध येतांना असं कांहींतरी
अगदीं साहजिक आहे. वरपक्षाच्या माणसांनीं खरोखरच अडवलं असेल त्यांना

काका मध्येंच म्हणाले, " मी कबूल करतों त्यांनीं अडवलं असेल म्हणून—
त्यालाही उपाय होता. सामोपचारानं गोष्टी करतां येणं शक्य नव्हतं का ? म
इकडेच पाठवून दिली असती तर साराच वाद मिटला असता, पण खरं का
तें नव्हे. ह्या सर्व अत्याचाराच्या मुळाशीं पैसा आहे. विम्याची रक्कम त्यां
डोळ्यावर आली होती. हिला घरांतून घालवून दिली आणि त्या संतापांत
आपलं कांहीं जिवाचं बरंवाईट करून घेतलं तर त्यांचा मार्ग आयताच मोक

होणार होता. अशा गोष्टी झाल्याही आहेत. सासरच्या जाचाला त्रासून कित्येक बालविधवांनीं आत्महत्त्या केल्या आहेत तें त्याला माहीत होतं. वरपक्षाच्या जाचणुकीमुळं नव्हे, तर मथूचा खून पाडण्यासाठीं त्या राक्षसानं असं वर्तन केलं."

काकांचें हें भाषण ऐकून ताई गप्प बसल्या. काकांची विचारसरणी मला पटली आणि त्यामुळें नानासाहेबांबद्दलचा माझा तिटकारा कडोविकडीला पोंचला.

कांहीं दिवस सुखासमाधानांत गेले पण माझ्या दैवाला तें पहावलें नाहीं. गांवांत एक नवीनच लाट उसळली होती. आमच्या विरुद्ध एक मोठा कट चालला होता. त्याच्या मुळाशीं नानासाहेबच आहेत असें आम्हांला लगेच कळून आलें.

एके दिवशीं ग्रामपंचायतीची सभा भरून काकांना बोलावणें करण्यांत आलें. गांवगंगेनें मला बहिष्कार घालण्याची योजना काकांसमोर मांडली. खेड्यापाड्यांत हा गांवगाडा केवढा अजस्र असतो आणि त्याखालीं मी मी म्हणणाऱ्या मोठमोठ्या लोकांना सुद्धां कसें चिरडून जावें लागतें, हें ज्यांना माहीत आहे त्यांना त्या प्रसंगाची खरी कल्पना येईल. मी बाटग्या लोकांच्या गोटांत होतें, माझा तिथें अन्नव्यवहार झाला आहे आणि अतएव मी बाटलें असून पतित झालें आहें, असा तो आक्षेप होता. काकांनीं खरी परिस्थिति समजावून देण्याचा आपल्या परीनें पुष्कळ प्रयत्न केला, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. एक दिवसाचा निर्वाणीचा अवधि देण्यांत आला. तितक्या वेळांत जर मला काकांनीं घरांतून घालवून दिलें नाहीं, तर काकांचें घर वाळींत टाकावें असें सर्वांनुमतें ठरलें. काकांवर हा अनपेक्षित वज्राघात झाला. घरीं आल्यावर ते ताईला म्हणाले,

"बहिष्काराची मला पर्वा नाहीं, पण घराण्याची अब्रू डोळ्यांसमोर उभी रहाते. मी मथूला अपंक्त ठेवतों असं सांगितलं तरी तें त्या लोकांना पटत नाहीं. तिला घरांतून बाहेर घालवून दिली पाहिजे, घरच्या कोणत्याही आवारांत तिनं रहातां कामा नये, असा त्यांचा हेका आहे. ती कोणत्या रीतीनं बोर्डिंगमध्यें रहात होती हें मी त्यांना समजावून सांगितलं. मुलगे अशाच रीतीनं रहातात पण ते बाटले असं आपण समजत नाहीं, हेंही सांगितलं. कोणताच युक्तिवाद त्यांना पटला नाहीं. हिनं बायबलवर पुराण सांगितलं त्याअर्थी ही बाटली असलीच पाहिजे असं सर्वांनुमतें ठरलं. वादविवाद करतां करतां शेवटीं एक तोड निघाली! बोर्डिंगांत राहिल्याचं पाप प्रायश्चित्तानं शुद्ध होईल—पण मथूनं देवाच्या घाटेखालीं उभे राहून बायबलवर पुराण सांगितलं नाहीं अशी शपथ घ्यावी, म्हणजे प्रायश्चित्त देऊन तिला पंक्तिपावन करून घेण्यांत येईल."

काकांचें हें भाषण ऐकतांच मी एकदम उत्तर दिलें, "मी खोटं बोलणार नाहीं–मग देवळांत शपथ घेणं तर दूरच राहिलं."

काका आश्चर्यचकित होऊन म्हणाले,

"म्हणजे ? तूं बायबलवर पुराण सांगितलंस हें खरं का ?"

"होय. मी बायबलवर पुराण सांगितलं आणि त्याचा मोठमोठ्या अधिकारी व्यक्तींवर सुद्धां चांगला परिणाम झाला."

काका दोन्ही हात कपाळावर घेऊन म्हणाले, "हें मला आधीं कळलं पाहिजे होतं. बायबलच्या पुराणाचा आरोप खोटा आहे अशी कल्पना करून मी तोडीला तयार झालों होतों, पण आतां माझं तोंडच बन्द झालं."

"बायबलवर पुराण सांगितलं हा माझा गुन्हा झाला का ?"

"नाहीं, माझ्या दृष्टीनं नाहीं. पण गांवगंगेला तें पटणार नाहीं." एवढेंच उत्तर देऊन काका एकाएकीं निघून गेले.

ताई मला म्हणाली, "परवां आपण नानासाहेबांना दोष देत होतों आणि आज आमच्यावर तोच प्रसंग आला आहे."

मी एक क्षणाचा सुद्धां विचार न करतां ताईला सांगितलें,

"ताई, अशी कष्टी होऊं नकोस. मी पाप केलं नाहीं. माझ्या हातून अधर्म घडला नाहीं. देवाच्या घरीं मी कोणत्याही रीतीनें अपराधी नाहीं. ईश्वर माझी कसोटी पहातो आहे. आधींच मी बालविधवा, त्यांतून माहेर पारखं झालेली, सासरच्या मंडळींनीं लाथा मारून बाहेर घालवलेली–एक तुझा काय तो आधार–पण तोही आज सुटूं पहातो आहे. ह्यापुढं मी जगावर उघडी पडणार आहें. अनाथ, अबला, निःसहाय, निराधार अशी मी, आतां माझ्या दैवाशीं झगडणार आहें. ताई, माझी निघण्याची तयारी कर. यापुढं इथं राहून माझ्या उपकारकर्त्यांना संकटांत घालण्याचं पाप मी करणार नाहीं."

मी माझें सामनसुमान बांधूं लागलें. ताई धांवतच काकांकडे गेली. काका आले आणि त्यांनीं परोपरीनें माझी समजूत घालायचा प्रयत्न केला. माझ्यासाठीं बहिष्कृत होऊन रहायलाही ते तयार झाले पण माझा निश्चय ढळला नाहीं.

मी काकांना सांगितलें. "माझ्यावर जर तुमची माया अंतःकरणपूर्वक असेल, तर आत्तांच्या आत्तां गाडी आणा–मला ग्रामत्यागाघांचून गत्यंतर नाहीं."

काकांचा नाईलाज झाला आणि त्यांनीं गाडी आणण्यास सांगितलें.

माझ्या निघण्याची बातमी हां हां म्हणतां गांवभर पसरली आणि गांवांतील सर्व प्रकारची मंडळी आमच्या दारीं गोळा होऊं लागली. माझें सामान नेऊन गाडींत ठेवण्यांत आलें. निघण्यापूर्वी काका आणि ताई ह्यांना मी नमस्कार केला तेव्हां ताई म्हणाली, " घर सोडून जात आहेस खरी, पण माया तोडून जाऊं नकोस. ज्या ज्या वेळीं कांहीं जरूर लागेल त्या त्या वेळीं मला लिहीत जा. जिवाची आबाळ करूं नकोस. संधि साधून मीही तुला भेटायला येत जाईन. "

मला रडें कोसळत होतें पण मन घट्ट करून पाठ फिरवून मी दाराकडे वळलें तेव्हां ताई म्हणाली, " जरा थांब. "

तिनें आंतून थोडें दहीं आणून माझ्या हातावर घातलें. मी दाराबाहेर पडतांच काका पुढें आले, त्यांना मी पुन्हां नमस्कार केला. एवढा मोठा धीराचा पुरुष पण मी निघून जात असेलली पाहातांच एकाद्या लहान मुलाप्रमाणें ते रडूं लागले.

त्या गांवांत दादा या नांवाचे एक वृद्ध गृहस्थ होते. ते मोठे तपस्वी होते. साधुसंतांत त्यांची गणना होत असे. ते त्यावेळीं तिथें आले होते. मी गाडींत बसण्यास पुढें होत आहें असें पाहून त्यांनीं मला विचारलें, " मुली, थांब–मला एकच प्रश्नाचं उत्तर दे–शपथ कां घेत नाहींस ? "

" दादा, मी बायबलवर पुराण सांगितलं आहे. गीता, भागवत आणि उपनिषदें ह्यांचे आधार देऊन बायबलवर पुराण सांगितलं आहे. मग मी खोटी शपथ कशी घेऊं ? "

" मुली, ईश्वर तुझं कल्याण करो. हा दादा तुला सांगतो आहे, तूं निर्दोष आहेस, निष्पाप आहेस. तुला बहिष्कृत घालायला उठणारे मूर्ख आहेत. असा एक काळ येईल, कीं त्यावेळीं त्यांना ह्या त्यांच्या वर्तनाचा पश्चात्ताप होईल. जा, ईश्वर तुझा पाठीराखा आहे. तो तुला केव्हांही कांहीं कमी पडूं देणार नाहीं हें ह्या दादाच्या मुखानं ईश्वरच तुला सांगतो आहे, असं समज. "

दादांचें हें भाषण चाललें असतांना जमलेली सर्व मंडळी चित्रासारखी तटस्थ राहिली होती.

गाडी चालू झाली. ताई आणि काका गाडीमागून बराच वेळपर्यंत येत होते. काळोख पडत चालला असें पाहून मी गाडीवाल्याला गाडी थांबवण्यास सांगितलें. गाडीखालीं उतरलें आणि त्या उभयतांना पुन्हां नमस्कार करून म्हटलें,

" माझ्यासाठीं आतां कष्ट घेऊं नका. काळोख पडूं लागला. आतां घरीं परत जा. मुंबईला पोंचतांच मी पत्र पाठवीन. "

गाडी चालू होतांच मी पुन्हां मागें वळून पाहिलें नाहीं.

लोभाचा शेवटचा दुवा तुटला !— मी अनाथ झालें !

घर म्हणायला मला ह्या जगांत कांहीं राहिलें नाहीं. पुन्हां ह्या घरांत रहाण्याचा योग मला येणार का ? मला रडण्याचे हुंदक्यावर हुंदके येऊं लागले. गाडीवाला म्हणाला, " हे बामण मोठे निर्दय आहेत–त्यांना माणुसकी नाहीं. देवाचा कौल देखील विसरतात. दादांनीं एवढं सांगितलं तरी त्याचं कुणी ऐकलं नाहीं. तुझ्यासारख्या मावलीवर आग पाखडली. देव त्यांना बघून घेईल ! "

गाडीवाल्याला सुद्धां माझी दया यावी आणि ह्या सुबुद्ध माणसांनीं मला घराबाहेर हांकून काढावें हा काय दैवाचा खेळ ?

गाडीवाला सारखा बोलत होता–पंचायतीला जमलेल्या माणसांतील प्रत्येकाच्या घरच्या नाहीं नाहीं त्या उखाळ्यापाखाळ्या काढीत होता. प्रत्येक माणसाला आपल्या कुणबी भाषेंतील अस्सल अस्सल शिव्या देत होता.

त्याचा तो उद्वेग पाहून मला आश्चर्य वाटलें. ह्या कुणब्याला हृदय आहे, तसें त्या वेदशास्त्रसंपन्नांना नाहीं का ?

आपल्या बुद्धीप्रमाणें हा कुणबी माझ्यावरील आरोपांचें आपणच निरसन करून टाकीत आहे, तसें त्यांना नसतें का करतां आलें ?

ह्या कुणब्याचा युक्तिवाद ऐकून मला आश्चर्य वाटलें. त्याची भाषा गांवढळ होती पण विचार सोज्वळ होते.

मला तेवढेंच समाधान वाटलें. जाण्यापूर्वी दोन माणसांनीं मला निर्दोष ठरवलें. एक साधूच्या पदवीला पोंचलेले ते दादा–आणि दुसरा, सर्वांच्या पायतळीं राहाणारा हा कुणबी. नखशिखान्त परमेश्वरानें मला निर्दोष ठरवलें असें वाटून मला अत्यानंद झाला.

मी माझें दुःख विसरलें आणि हंसतमुखानें गाडीवाल्याशीं बोलूं लागलें.

दुसऱ्या दिवशीं मी मुंबईला येऊन पोंचलें.

आज मुंबई मला अगदीं भयाण वाटत होती. ह्यापूर्वी मी येत होतें त्या वेळीं पुन्हां कुठल्या तरी घरीं जाण्याची मला आशा असे, पण आज माझें मुंबईत येणें म्हणजे अफाट जगाच्या प्रवासाची पहिली तयारी होती.

मी बोर्डिंगांत आलें. इतक्या लवकर मी आल्याचें पाहून स्मिथ्बाईंना आश्चर्य वाटलें. गांवीं घडलेली सर्व हकीकत मी त्यांना जशीच्या तशी सांगितली. ती ऐकून वाईट वाटण्याऐवजीं त्यांना आनंद झाल्यासारखा दिसला.

त्या म्हणाल्या, " तुझीं पापं धुऊन जात आहेत. प्रभु तुला तारणाच्या मार्गाकडे खेंचीत आहे. "

त्यांचें हें भाषण ऐकून मला हंसूंच आलें.

संध्याकाळीं मी गाडी करून डायमण्ड लॉजमध्यें गेलें, पण सुट्टी मिळाल्यामुळें चंदू दुसऱ्या कोणत्या तरी गांवीं निघून गेला होता असें मला कळलें.

मी त्याच गाडीनें बोर्डिंगांत परत आलें.

परीक्षेच्या रिझल्टला बराच अवकाश होता. दुसरा कांहींच व्यवसाय नाहीं म्हणून मी बायबल वाचण्यास आरंभ केला. स्मिथ्बाईंनीं टॉमस्-ए केंपिस्चें 'इमिटेशन् ऑफ् ख्राइस्ट ' हें पुस्तक आणून मला वाचावयास दिलें. माझ्या खोलीं-तील दुसऱ्या एका मुलीनें आणलेलें 'लाईट ऑफ् एशिआ ' हें पुस्तकही त्याच वेळीं माझ्या हातीं आलें. मी ह्या दोन्ही पुस्तकांच्या परिशीलनांत तो कंटाळवाणा काळ घालवीत होतें. ह्या पुस्तकांनीं मला नवी स्फूर्ति दिली.

शेवटीं एकदां परीक्षेचा रिझल्ट लागला—मी पास झालें.

मी नुसती पासच झालें नव्हतें—तर मला जगन्नाथ शंकरशेटची संस्कृतची स्कॉलरशिप्ही मिळाली होती.

ह्या आनन्द मी कुणाला सांगूं ? ह्या आनंदाची भागी मिळवायला माझ्या मायेचें कुणीही माणूस त्या वेळीं जवळ नव्हतें.

तो आनन्द मला दुःखाहूनही दुःखदायक झाला.

# प्रकरण पन्धरावें स्वदेशाला रामराम !

ज्या वेळीं मी हें चरित्र लिहिण्यास घेतलें त्या वेळीं तें इथवर देखील पूर्ण होईल कीं काय याची मला शंकाच होती. माझी प्रकृति दिवसेंदिवस क्षीण होत चालली आहे. लिहिण्याची ताकद पुरेशी नसल्यानें मनांतली इच्छा अपुरी रहाणार कीं काय अशी मला भीति वाटूं लागली आहे. देहाच्या शक्तीविरुद्ध अंतरींच्या इच्छेचा पाठिंबा घेऊन आतां एकाच प्रकरणांत माझें हें आत्मचरित्र आटोपतें घेण्याचा मी विचार केला आहे.

मी मॅट्रिकची परीक्षा पास झालें आणि मला जगन्नाथ शंकरशेटची संस्कृतची स्कॉलर्शिप् मिळाली, याबद्दल स्मिथ्बाईनीं माझें अंतःकरणपूर्वक अभिनन्दन केलें. पण त्या अभिनंदनाचा माझ्या मनाला उल्हास येण्याइतका परिणाम माझ्यावर मुळींच झाला नाहीं.

"तूं आतां पुढं कोणत्या कॉलेजांत जाणार आहेस ?" स्मिथ्बाईनीं मला विचारलें.

"पुढल्या शिक्षणाची मला मुळींच हौस राहिलेली नाहीं. धर्माच्या पैशावर मी आजपर्यंत अभ्यास केला, पण आतां कॉलेजच्या खर्चासाठीं दुसऱ्यावर भार घालावा ही कल्पना मला मरणप्राय दुःख देते."

"संस्कृतची स्कॉलर्शिप् मिळाली असतांही तूं पुढचा अभ्यास सोडून द्यावास असं मला वाटत नाहीं. कॉलेजांत जाण्याची तुला उत्कंठा असेल तर मिशनच्या अधिकाऱ्यांचं मन वळवून मी तुझ्या पुढील अभ्यासाची तजवीज करीन."

"माफ करा. तुमची योजना मला स्वीकारतां येत नाहीं. उपकारच घ्यायचे तर ते मिशनचे घेण्यापेक्षां माझ्या नातेवाईकांचेच घेणं मला जास्त बरं वाटेल." मी दृढनिश्चयाच्या स्वरानें सांगितलें.

"जशी तुझी मर्जी. खरं बोलायचं म्हणजे तुझ्यासारख्या मुलीला पुढल्या शिक्षणासाठीं विलायतेंतच पाठवलं पाहिजे."

स्मिथबाईंच्या ह्या शब्दांनीं माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले.

मी विलायतेंत जावें—असें पूर्वी आणखी कुणी म्हटलें होतें का ?

मी अडखळत अडखळत विचारलें, "विलायतेंत जायला बराच खर्च लागतो का?"

गालांतल्या गालांत हंसून स्मिथबाई म्हणाल्या, "बराच तर खराच, पण बराच म्हणजे किती ह्याची तुला कल्पनाही होणार नाहीं. शिवाय परकी लोकांत, परकी रीतरिवाजांत, अगदीं भिन्न पद्धतीच्या खाण्यापिण्यांत तुला कसे दिवस काढतां येतील हा मोठाच प्रश्न आहे. विलायतेस जायचं म्हणजे हिंदूंचे सर्व आचारविचार तुला सोडावे लागतील. खाण्यापिण्याचा विधिनिषेध बाळगतां यायचा नाहीं. पोषाखांतहि फरक करावा लागेल. पण ह्या विषयाची चर्चा कशाला? आहे त्या स्थितींत तुला विलायतेंत जाणं अशक्य आहे."

अगदीं नकळत मी एक दीर्घ निश्वास सोडला. तो पाहून स्मिथबाई पुन्हां म्हणाल्या, "तुला वाईट वाटलं का? विलायतेला जावं असं तुझ्या मनानं घेतलं आहे का?"

"आहे, फार आहे–विलायतेला जावं असं मला अगदीं अंतःकरणापासून वाटतं. कुठं तरी जगांतून–म्हणजे ह्या हिंदुस्थानांतून नाहींसं व्हावं असं वाटतं. मागं जीव तळमळायला इथं कुणीच नाहीं. माझ्या सुखदुःखाची वांटेकरीण एकटी मीच. मी दुर्दैवी आहें. अनाथपणांत देखील कुणाचा आसरा घ्यावा असं मला वाटत नाहींसं झालं आहे. माझ्या संपर्कानं मला आसरा देणाऱ्या जिवाभावाच्या माणसांवरही संकटं येतात. हिंदुस्थानांत राहून माझ्या इष्टमित्रांना संकटांत टाकण्यापेक्षां विलायतेंत जाऊन कां नाहींसं होऊन जाऊं नये? आत्महत्त्या करण्याइतका अविचार माझ्या ठायीं असता तर मी तीही केली असती, इतका मला माझ्या जिवाचा वीट आला आहे—"

गंभीरपणानें स्मिथबाई म्हणाल्या,

"असे भलते विचार मनांत आणूं नकोस. ह्या अफाट जगतांत आपलं जीवन कामीं लावायला तुला पुष्कळ जागा आहे–पण नाहींसं होणं मात्र तुला शक्य नाहीं. एकदम गडप होऊन जाण्यासाठीं विलायतेंत जावं असं तुला वाटत असेल तर तो तुझा गैरसमज आहे. विलायतेंत गेल्यानें गडप होण्याऐवजीं तुझी कीर्ति उलट चोंहींकडे फांकेल मात्र. तूं महत्त्वाकांक्षी आहेस हें तुला कळत नसलं तरी मला दिसतं आहे. अल्पशा यशांत तुला तृप्ति वाटत नाहीं. विलायतेला जावं अशी तितकीच तुला उत्कंठा असेल तर मी त्याला एकादा उपाय शोधून काढण्याचा प्रयत्न करीन."

दोन्हीं हातांनीं स्मिथबाईचा हात घट्ट धरून मी एकदम म्हणालें,

" काय ?–तुम्हीं मला विलायतेला पाठवाल ? तुम्हीं मला विलायतेला पाठवाल तर आमरण मी तुमचे उपकार विसरणार नाहीं."

" पण त्याच्यासाठीं एक मोठं धाडस करावं लागेल."

मी उत्कंठेनें म्हटलें, " विलायतेला जाण्यासाठीं मी वाटेल तें धाडस करायला तयार आहें !"

माझ्या पाठीवरून हळू हळू हात फिरवून स्मिथबाई म्हणाली,

" हें म्हणणं जितकं सोपं आहे असं तुला वाटतं तितकाच प्रत्यक्ष अनुभव फार बिकट जाईल ! पहिल्यानं, तुला पोषाख बदलावा लागेल–नंतर आहार बदलावा लागेल. विलायतेच्या हवेंत शाकाहारी राहून तुला जगतां येणार नाहीं. तुला विधर्मीयांच्या हातचं अन्न खावं लागेल. प्रसंगीं मद्यही घ्यावं लागेल. मग तुझ्या धर्माचं कसं होईल ?"

" धर्माचा आणि आहाराचा कांहीं संबंध नाहीं. शक्य तेवढा वेळ मी शाकाहारीच रहाण्याचा प्रयत्न करीन. नच निभावलं तर मांसाहार पत्करायलाही मला कांहीं वाटणार नाहीं. मांसाहारांत माझा धर्म नष्ट कसा होईल ? एक मूठभर ब्राम्हणखेरीज करून सारेच हिंदु मांसाहारी आहेत. शिवाय, पंजाब आणि बंगाल्यांतील ब्राम्हणही मांसाहारी आहेत असं म्हणतात."

माझें हें उत्तर ऐकून स्मिथबाई कौतुकानें हंसल्या आणि क्षणभर माझ्या तोंडाकडे टक लावून मला म्हणाल्या,

" हें बोलतांना तुला जितकं सोपं वाटतं आहे तितकं प्रत्यक्ष अनुभवाअंतीं वाटणार नाहीं. तूं मांसाहारालाही तयार झालीस, असं आपण घटकाभर गृहीत धरूं—तरीही तुझा कार्यभाग होणार नाहीं. तूं परक्यांच्या मुलखांत जाणार आहेस. त्यांतही तुम्हीं काळ्या वर्णाचे लोक. तिकडील लोकांना तुझ्याबद्दल आपलेपणा वाटायला त्या लोकांशीं तुझं कोणत्याही प्रकारचं साम्य नाहीं. वर्णानं परकी, पोषाखानें परकी, आचारानं परकी, रहाणींत परकी आणि विशेषतः धर्मानं परकी अशी तूं, त्या सुसंस्कृत लोकांत कशी मिसळूं शकशील ? मी तुला पूर्वीच सांगितलं, कीं विलायतला जायचं म्हणजे तुला एक धाडस करावं लागेल. वर्णाचा परकीपणा बदलणं तुझ्या हातचं नाहीं, पण परकीपणाचे इतर अडथळे दूर करणं अगदीं सोपं आहे. आम्हां मिशनरी लोकांच्या सहवासानं आम्हां

युरोपिअन् लोकांचे आचारविचार तुझ्या चांगल्याच परिचयाचे झाले आहेत, त्यामुळं ते आचारांत आणणं तुझ्यासारख्या बुद्धिमान् मुलीला कठीण जाणार नाहीं. आचारविचाराची बाब फारशी महत्त्वाची नाहीं. पोषाख बदलणं मात्र अवश्य आहे. पण कोणत्याही परदेशांत जातांना त्या परकी लोकांत आपलेपणाची भावना उत्पन्न करण्याचं खरं नि एकच साधन म्हणजे धर्म आहे. विलायतेंतील सर्व लोक ख्रिस्ती आहेत. तूं ख्रिस्ती असतीस तर विलायतेला जाणं तुला मुळींच कठिण गेलं नसतं, ”

इतकं बोलून स्मिथबाई थांबल्या आणि उत्कंठेनें माझ्या तोंडाकडे पहात राहिल्या.

मी कांहींच बोलत नाहीं असें पाहून त्या पुढें म्हणाल्या,

“ नुसतं विलायतेला जाण्यासाठीं तूं धर्मांतर करावंस असं मी केव्हांही म्हणणार नाहीं. श्रद्धेशिवाय केलेलं धर्मान्तर खोटं आहे. ती लबाडी होईल. प्रभु येशू ख्रिस्तावर तुझा विश्वास बसत चालला असेल तरच तूं धर्मांतर करणं इष्ट होईल. आमच्या पवित्र शास्त्राचा तूं चांगला अभ्यास केला आहेस. अजूनही पुष्कळ ग्रंथ आहेत. इच्छा असल्यास तूं त्यांचं अध्यायन कर. प्रभु येशू ख्रिस्तावर दृढ निष्ठा उत्पन्न होऊन तारणाच्या मार्गाचं तूं अवलंबन करावं अशी प्रभूनं तुला बुद्धि दिली, तूं ख्रिस्ती झालीस, तर धर्माच्या अभ्यासासाठीं म्हणून तुला विलायतेला पाठवण्याची योजना करण्याचा मी प्रयत्न करीन. ”

“ प्रभु येशू ख्रिस्तावर माझा पूर्ण विश्वास आहे. पवित्र शास्त्राबद्दल माझा निस्सीम आदर आहे—भगवद्गीतेइतकंच त्या ग्रंथावर माझं प्रेम आहे, पण प्रभु येशू ख्रिस्ताची भक्ति करण्यासाठीं माझ्या धर्माचा मी कां त्याग करावा हेंच समजत नाहीं मला. माझा धर्म अत्यंत उदार आहे. जगाच्या कल्याणासाठीं ईश्वरानं अनन्त अवतार घेतले असं माझा धर्म सांगतो. प्रभु येशू ख्रिस्ताचा अवतार हा त्यांतीलच एक अवतार आहे असं मला अंतःकरणापासून वाटतं. हिंदुधर्माची एक अनुयायी ह्या नात्यानं ख्रिस्त आणि कृष्ण दोन्ही मला सारखेच आहेत. माझ्या खोलींत कृष्णाच्या तसबीरीशेजारींच ख्रिस्ताची तसबीर असल्याचं तुम्हांला दिसून येईल. एकाच हातांतल्या फुलांनीं मी दोघांचीही पूजा करतें. एकाच निरांजनानं मी दोघांनाही ओवाळतें. हें एकच मस्तक त्या दोघांच्याही चरणावर ठेवतें. पण त्यामुळं मी अधर्म केला असं मला केव्हांही वाटत नाहीं. ”

स्मिथ्‌बाईच्या चेहऱ्यावर निराशेची झुळुक दिसली. फार मृदु स्वरानें त्या मला म्हणाल्या,

"थोडा वेळ विचार केलास तर तुझी कुठंतरी चूक होत आहे असं तुझं तुलाच वाटेल. ईश्वर एकच आहे आणि जगाचं तारण करणार त्याचा पुत्र प्रभू येशु ख्रिस्त एकच आहे. मी तुझ्याशीं जास्त वाद घालूं इच्छित नाहीं. कारण हा श्रद्धेचा प्रश्न आहे, जबरदस्तीचा नाहीं. अगदीं सूक्ष्म दृष्टीनं पवित्र शास्त्राचा पुन्हां अभ्यास कर म्हणजे चूक कुठं होत आहे हें तुझं तुलाच कळून येईल." एवढेंच बोलून बाई निघून गेल्या.

आपल्याशींच हंसत मी क्षणभर तशीच उभी राहिलें. बाईच्या भाषणानें माझ्या मनांत वेगवेगळ्या प्रकारचे विचार आले. आमच्या धर्मग्रंथांच्या अभ्यासानें ईश्वराविषयीं व्यापक भावना आणि हिंदुधर्माची सर्वग्राही उदारता माझ्या मनावर ह्यापूर्वीच ठसली नसती तर स्मिथबाईनें दाखवलेल्या मोहाला मी बळी पडलें असतें का, असा प्रश्नही माझ्या मनांत आला. आमच्या या संवादाचा पुन्हां पुन्हां मी मनाशीं विचार करूं लागलें असतां माझें मलाच हंसूं आलें. मी वेड्यासारखी आपल्याशींच हंसूं लागलें तोंच माझ्या कानीं शब्द आले, "हंसते आहेस कुणाबरोबर ? भांगभिंग तर घेतली नाहींस ना ? कीं संस्कृतची स्कॉलर्शिप् मिळाल्याचा कैफ चढला आहे ?"

मी दचकून समोर पाहिलें तों चन्दू समोर उभा. त्याचा तो हंसतमुख चेहरा पहातांच माझ्या हृदयाला आनंदाचें भरतें आलें. एकदम धांवत जाऊन त्याला मिठी मारावी असें मनांत आलें असतांही माझ्या नकळत माझी मान खालीं गळाली.

चंदू म्हणाला, "आम्हीं बोलायच्याही लायकीचे राहिलों नाहीं वाटतं ? नुसती पहिली परीक्षा पास होतांच जर एवढा गर्व, तर बी. ए., एम्. ए. झाल्यावर आमची ओळखसुद्धां रहाणार नाहीं—"

चंदूच्या भाषणाचा मला अगदीं राग आला. मी फणकाऱ्यानें म्हटलें, "असं हिणवायला नको कांहीं ! बी. ए., एम्. ए. होणं कांहीं मोठंसं कठीण नाहीं. नुसती इथलीच काय पण विलायतेची सुद्धां डिग्री घेऊन येईन."

चंदू मोठमोठ्यानें हंसत म्हणाला, "याल बुवा, कुणी सांगावं, तुम्हीं तशाच पंडिता आहांत !—पण विलायतेला जाणार कोणत्या जोरावर ?"

" स्वतःच्या मनगटाच्या जोरावर." मी गंभीरपणानें उत्तर दिलें.

" मनगटाच्या जोरावर ? मग ह्या बांगड्यांचं काय होणार ? "

त्याला खिजवण्यासाठीं मी म्हटलें, " मला विधवेला बांगड्याशीं काय करायचं आहे ? ह्या बांगड्या आतां जाणार."

" आणि कुंकू ? "

" तेंही जाणार." मी अगदीं गंभीरपणानें उत्तर दिलें.

चंदू अगदीं आश्चर्यचकित होऊन क्षणभर अगदीं स्तब्ध राहिला. मस्करीची कुस्करी होते कीं काय असें मला वाटत होतें तरीही मी म्हटलें, " मी ख्रिस्ती होणार–विलायतेला जाण्यासाठीं मी ख्रिस्ती होणार ! "

चंदू एकदम ओरडला, " तूं ख्रिस्ती होणार ? विलायतेला जाण्यासाठीं ख्रिस्ती होणार ? तुझ्या धर्माची तुला कांहींच का चाड नाहीं ? "

" कां असावी ? माझ्या धर्मानं माझ्यासाठीं काय केलं आहे ? धर्माबद्दलच्या तुम्हां लोकांच्या खोट्या कल्पनामुळंच माझा छळ झाला, मी सासरमाहेराला मुकलें, ताईच्या घराला मुकलें, काकांचं पितृवात्सल्य तर मला पारखं झालं. धर्माचा अभिमान मी बाळगावा असं माझ्या धर्मीयांनीं माझ्या अनाथ अपंग स्थितींत काय केंलं आहे ? माझ्या धर्माचा मला अभिमान वाटावा असे कोणते प्रसंग माझ्या आयुष्यांत घडले आहेत ? "

" खरं आहे." एक दीर्घ निश्वास टाकून चंदू म्हणाला.

चंदूचा भोळेपणा पाहून मी मनांतल्या मनांत हंसलें, पण तें हंसूं मी चेहऱ्यावर दिसूं दिलें नाहीं.

" विलायतेला जाण्यासाठींच जर तूं ख्रिस्ती होत असशील तर तसं करण्याची जरूरी नाहीं. पण खरोखरच जर तुझी हिंदुधर्मावरची श्रद्धा उडाली असेल—" एक मोठा दीर्घ निश्वास टाकून तो पुढें म्हणाला, "–तर दुर्दैव आमचं आणि आमच्या हिंदुधर्माचं ! "

" हिंदुधर्मावरची माझी निष्ठा तुमच्यासारखी डळमळीत नाहीं. वैदिक हिंदुधर्माचा मला तिटकारा आलेला नाहीं, पण आज प्रचारांत असलेल्या हिंदुधर्माची आणि तुम्हां हिंदूंची मला शिसारी आली आहे आणि तेवढ्याचसाठीं

खऱ्या हिंदुधर्माला पारखं झालेलं हें हिंदुस्थान टाकून कुठंतरी नाहींसं होण्यासाठींच मी विलायतेला जाणार आहें."

अगदीं आपल्याशींच विचार करीत असल्यासारखा चंदू म्हणाला, "असंच असेल तर ख्रिस्ती होण्याची कांहीं जरूरी नाही. एक आनंदाची बातमी सांगण्यासाठीं म्हणून मी आज आलों आणि तूं मात्र मला जबरदस्त धक्का दिलास."

मी जिज्ञासापूर्वक विचारलें, "माझ्यासारख्या दुर्दैवी माणसाच्या कानीं कसली आनंदाची बातमी येणार ?"

"काकांनीं तुला विलायतेला पाठवण्याची योजना केली आहे."

चन्दूनें सांगितलेली बातमी ऐकून मी अगदीं स्तंभित झालें.

चंदू पुढें बोलूं लागला, "आमच्या तालुक्याच्या गांवचे–म्हणजे चिपळूणचे–रावसाहेब प्रधान मामलेदार आहेत. त्यांचे एक व्याही प्रो. शंकर आबाजी भिसे विलायतेंत असतात. ते परवां चिपळूणला आले होते. काका योगायोगानं प्रधान रावसाहेबांना भेटायला गेले होते. तिथं प्रो. भिशांची आणखी त्यांची गांठ पडली. त्यावेळीं बोलतां बोलतां सहज तुझी गोष्ट निघाली. प्रो॰ भिसे ह्या खेपेला विलायतेला जातांना सहकुटुंब सहपरिवार जाणार आहेत. त्यांची बायको पहिल्यानंच विलायतेला जायची असल्यामुळं तिला कुणीतरी सोबतीण बरोबर पाहिजे आहे. भिसे फार प्रेमळ गृहस्थ आहेत. तुझी हकीगत एकून त्यांना तुझ्याबद्दल सहानुभूति उत्पन्न झाली आणि 'एक पंथ दो काज' ह्या नात्यानं त्यांनीं तुला बरोबर न्यायचं ठरवलं आहे."

मी अगदीं स्तंभित होऊन गेलें होतें. मी मनांत म्हटलें, काय हा ईश्वरी चमत्कार ? समाधानाच्या दृष्टीनें माझ्या आयुष्यांतला हा पहिला योगायोग. विलायतला जायचें मनांत येण्यापूर्वींच माझ्या विलायतेला जाण्याची तयारी सुद्धां झालेली असावी हा एक ईश्वरी चमत्कारच असला पाहिजे असें मला वाटलें.

सर्व हकीकत तपशिलवार सांगण्यास चन्दूनें सुरवात केली. मन्त्रमुग्धाप्रमाणें मी ती ऐकत राहिलें असतां स्मिथबाई तिथें आल्या. चंदूनें त्यांना ती सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून त्यांच्या चेहऱ्यावर खिन्नपणाची थोडीशी छटा आल्याचा मला भास झाला.

बळेंच हंसून त्या मला म्हणाल्या, "मी तुझें अभिनन्दन करतें. हा खरोखरच ईश्वरी योगायोग आहे. तूं विलायतेला जातांना मी कांहीं पत्रं देईन, त्यांचा तुला तिकडे फार उपयोग होईल. आमचं मिशन विलायतेंत तुला शक्य ती मदत करील अशी मी तजवीज करीन."

* * *

प्रो. भिशांची पत्नी खरोखरच फार प्रेमळ होती. मी सोबत येत आहें ह्याचाच तिला आनन्द झाला होता. प्रो. भिसे तर मला वात्सल्याची मूर्तिमन्त प्रतिमाच वाटले. शाकाहारी राहूनही विलायतेंत राहतां येतें हें कित्येक वर्षांच्या स्वानुभवानें आपण सांगूं शकतों, अशा तऱ्हेचें खात्रीपूर्वक आश्वासन प्रोफेसर मजकुरांकडून मला मिळाल्यामुळें विलायतला जाण्याचें मला दुप्पट धैर्य आलें.

मी त्यांच्याच कुटुंबांतील एक ह्या नात्यानें जाणार असल्यामुळें पासपोर्ट मिळण्याची पंचाईत पडली नाहीं.

* * *

माझ्या चरित्राचा एक विभाग इथें संपला. पुढें काय झालें ? मी परत हिंदुस्थानांत आलें का ? काकांची आणि ताईची पुन्हां गांठ पडली का ? नानासाहेबांचें काय झालें ? बनीचा आणि माझा पुन्हां संबंध आला का ? लीलेचें आणि माझें नातें कोणत्या स्वरूपांत राहिलें ?

आणि चन्दू ! चन्दूबद्दल मला कांहींच लिहितां येत नाहीं. चन्दू माझ्या जीवनाचा ध्रुवतारा. चन्दूच्याच उदयानें माझ्या जीवनसमुद्रांत निरनिराळ्या लहरी उत्पन्न झाल्या. माझ्या पुढील आयुष्यक्रमांत जें कांहीं विलक्षण रूपान्तर घडलें तें केवळ एक त्याच्याचमुळें. चन्दू माझा कोण ? मी चन्दूची कोण ? ईश्वरानें माझी प्रकृति चांगली ठेवली तर माझ्या चरित्राचा पुढला भाग मी केव्हांतरी लिहून काढीन.

* * *

दुसऱ्या दिवशीं मला हिंदुस्थान सोडायचें होतें, त्यामुळें काका आणि ताई ह्यांची भेट होणें तर अशक्य झालें. प्रो. भिशांना पोंचवायला त्यांची सर्व आप्त मंडळी आली होती. त्यांत त्यांचे जांवई नानासाहेब प्रधान हेही आले होते. ते चन्दूचे कॉलेजबन्धु असल्याचें त्याच वेळीं सर्वांना कळलें.

आम्हीं लॉंचमध्यें बसायला निघालों तेव्हां चंदूच्या डोळ्यांतून घळघळ अश्रुधारा वाहूं लागल्या. एक जोराचा हुंदका येऊन मीही ढसढसा रडूं लागलें, तें पाहून स्वतःच्या डोळ्यांतील अश्रू पुशीत असलेल्या प्रो. मिशांच्या पत्नीनें मला हृदयाशीं धरून माझें सांत्वन करण्यास सुरवात केली.

दुर्दैवानें झालेल्या माझ्या छळामुळें उत्पन्न झालेला माझा हिंदुस्थानचा तिटकारा—हिंदुस्थान सोडण्याचा प्रत्यक्ष प्रसंग येतांच—एका क्षणार्धांत मावळून गेला. हिंदुस्थान जसजसें दूर होऊं लागलें तसतसें हिंदुस्थानच्या प्रेमानें माझें हृदय भरून येऊं लागलें.

माझें हिंदुस्थान मला पुन्हां दिसेल काय, एवढा एकच विचार माझ्या हृदयांत सळसळत होता. आप्त, मित्र, गणगोत या सर्वांची मला पूर्णपणें विस्मृति झाली होती.

एकच विचार— पुन्हां पुन्हां तोच विचार—माझी ही पुण्यरूपा मातृभूमि मला पुन्हां दिसेल का ?

पुढें काय ?

सर्वसाक्षी भगवंता, पुढें काय ? आतां केव्हां परत भेट ?

ॐ तत्सत्